।। रामकृष्णहरी ।।

# ।। बापरखुमादेविवरु ।।

## संत ज्ञानदेव गाथा – शब्द अभंग चरण सूची

संकलन आणि संपादन

श्री. आदेश वसंत अत्रे

ह. भ. प. श्री. चकोर श्रीकृष्ण बाविस्कर

अद्वैत पब्लिकेशन्स्
बिल्डींग नं. ८, फ्लॅट नं. ६, आनंद पार्क सोसायटी, शंकरशेट रस्ता, पुणे ४११ ०३७.
दूरध्वनी : ०२०–२६४५७९६६ – www.advaitgroup.com - publications@advaitgroup.com
अधिक माहितीसाठी संपर्क: श्री. आदेश वसंत अत्रे – ९९२१३४५९५५

# ।। बापरखुमादेविवरु ।।

।। प्रस्तावना ।।

।। मनोगत ।।

।। प्रकाशकाचे मनोगत ।।

।। अनुक्रमणिका (अक्षरवार शब्दसंख्या) ।।

।। संत ज्ञानदेव गाथा व शब्द अभंग चरण सूची (५ भाग)।।

# ।। संत ज्ञानदेव गाथा व शब्द अभंग चरण सूची (५ भाग)।।

# ।। संत ज्ञानदेव गाथा व शब्द अभंग चरण सूची (५ भाग) ।।

## गाथा व त्याची सूची – पृष्ठ क्रमांक

# गाथा सूची कशी बघावी

''बापरखुमादेविवरु'' या संत ज्ञानदेव गाथा शब्द अभंग सूचीमध्ये एकंदरीत ५ भाग आहेत. प्रत्येक भागात मूळ गाथा (अभंग) व त्यानंतर त्या अभंगांची शब्द – चरण – सूची दिलेली आहे आणि ती विवक्षित गाथा व त्याची सूची कोणत्या पृष्ठापासून सुरू होते त्याचा पृष्ठक्रमांकही पान नं. ४ वर दिलेला आहे. प्रत्येक पानाच्या खाली – तळाशी – भाग क्रमांक व सूची असे लिहिले आहे. त्याद्वारे, आपण कोणता भाग आणि त्यातील अभंग (गाथा) किंवा सूची पाहतो हे त्वरित कळून येईल.

या गाथेची मांडणी ही पारंपारिक पद्धतीने केलेली नसून ती गाथेतील अभंग चरण क्रमांकानुसार दिसणार आहे. ज्यामुळे, त्या अभंग गाथेत संपूर्ण किती चरण आहेत  हे सुद्धा कळू शकेल.

सूचीमध्ये प्रत्येक शब्द हा आकार विल्ह्यानुसार नमूद केला असून त्यासमोर त्याचा गाथेनुसार अभंग चरण क्रमांक दिसतो आहे. शिवाय लगेच संबंधित संपूर्ण चरणही पाहता येणार आहे.

थोडक्यात म्हणजे, एखादा शब्द शोधताना त्या विशिष्ट भागाच्या अक्षरवार शब्द संख्येच्या तक्त्यामधून त्या शब्दाच्या सुरुवातीच्या वर्णाक्षराचा क्रमांक पहावा आणि त्यानंतर त्या भागातील सूची विभागात त्या शब्द क्रमांकापर्यंत जावे व तद्नंतर जो विवक्षित शब्द शोधायचा त्या शब्दापर्यंत तुम्ही त्वरित पोहोचणार आहात.

# अक्षरवार शब्दसंख्या

| भाग क्रमांक | भाग | अभंग संख्या | चरण संख्या | शब्दसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ | संत ज्ञानदेव अभंग | ११२१ | ५२९५ | ६१३६१ |
| २ | संत निवृत्तिनाथ अभंग | ३७४ | १५८० | १३०४८ |
| ३ | संत सोपानदेव अभंग | ५२ | २१४ | १८८० |
| ४ | संत मुक्ताई अभंग | ४२ | १८१ | १५२५ |
| ५ | संत चांगदेव अभंग | ७७ | २६४ | २२०२ |
| | एकुण | १६६६ | ७५३४ | ८००१६ |



रूप पाहाता लोचनीं । सुख जालें वो साजणी ।।१।।
तो हा विठ्ठल बरवा । तो हा माधव बरवा ।।२।।
बहुता सुकृतांची जोडी । म्हणुनी विठ्ठलीं आवडी ।।३ ।।
सर्व सुखाचें आगरु । बाप रखुमादेविवरु ।।४।।
***
सगुण निर्गुण दोन्ही विलक्षण। ब्रह्म सनातन विठ्ठल हा।।१।।
पतीतपावन मानसमोहन। ब्रह्म सनातन विठ्ठल हा।।२।।
ध्येय ध्याता ध्यान चित्त निरंजन। ब्रह्म सनातन विठ्ठल हा।।३।।
ज्ञानदेव म्हणे आनंद चिद्घन। ब्रह्म सनातन विठ्ठल हा।।४।।



आरती ज्ञानराजा । महाकैवल्यतेजा । सेविती साधुसंत । मनु वेधला माझा ।।धृ।।
लोपलें ज्ञान जगीं । हित नेणती कोणी । अवतार पांडुरंग । नांव ठेवियलें ज्ञानी ।।१।।
प्रगट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केलें । रामा जनार्दनीं । पायीं टकचि ठेलें ।।२।।

***

ॐ नमो ज्ञानेश्वरा । करुणाकरा दयाळा ।।१।।
तुमचा अनुग्रह लाधलों । पावन झालों चराचरीं ।।२।।
मी कळाकुसरीं कांहीच नेणे । बोलतों वचनें भाविका ।।३।।
एका जनार्दनी तुमचा दास । त्याची आस पुरवावी ।।४।।

# प्रस्तावना

।। श्रीपांडुरंग ।।

संतशिरोमणी श्रीज्ञानेश्वरमहाराजांची तत्त्वचिंतक, साहित्यविचारक व वारकरी भाविक, या सर्वांच्याच हृदयसिंहासनावर अधिष्ठित प्रतिमा, मोठी प्रसन्नगंभीर आहे. संतसम्राट, कैवल्यसाम्राज्यचक्रवर्ती इ.इ. महन्मनीय अशा विशेषणावलींनी, बिरूदावलींनी त्यांच्या स्वरुपाचा किंचिन्मात्र परिचय करून देण्याचा साधुसज्जनांचा प्रयत्न असतो. असे ते वस्तुत: अवाङ्मनसगोचर, अप्रमेयस्वरूप आहेत. एवढे असून श्रीनाथमहाराजांनीच नव्हे, तर कोणाही भाविकाने 'ज्ञानोबा माझा' म्हटल्यास त्याचा अंगिकार करण्याएवढे ऋजु व त्यांचा अपराध करणाऱ्यानेही त्यांचा आश्रय केल्यास त्याला स्वीकारण्याएवढे मृदुही ते आहेत, हे त्यांच्या चरित्रावरून स्पष्ट आहे. स्वत: श्रीज्ञानोबारायांसारखा त्यांचा वाङ्मय आविष्कारही वस्तुत: अप्रमेय आहे. 'मुह्यन्ति यत्सूरय:' असे म्हणून वेदांचे विद्वज्जनांनाही अप्रमेयत्व जसे श्रीव्यासमुनींनी सांगितले आहे, तसे 'तुका म्हणे नेणो युक्तीची ते खोली ।' असे म्हणून श्रीज्ञानराजांच्या वाङ्मयाचे अप्रमेयत्व श्रीतुकाराममहाराजांनी सांगितले आहे. 'कृष्णैकगम्यो वागर्थ:' असे म्हणून श्रीकृष्णाच्या प्रसन्नतेसाठी उच्चारलेल्या गोपीगीताचा अर्थ श्रीकृष्णच जाणू शकतात, असे श्रीधराचार्य म्हणतात; त्याचप्रमाणे श्रीगुरू निवृत्तिनाथांच्या संतोषासाठी, त्यांच्याच आज्ञेवरुन प्रवृत्त झालेली अशी श्रीज्ञानेबारायांची वचनावली आहे. म्हणून श्रीनिवृत्तिनाथांवाचून श्रीज्ञानेशोक्तीचे हार्द इतर कोणाता कळाले असेल, असे म्हणवत नाही.

श्रीज्ञानोबारायांना श्रीगुरूंच्या स्नेहार्द्र कृपादृष्टीने अधिष्ठिले असल्याने ते 'सकळ विद्याचिये सृष्टी धात्रा' झालेले आहेत. त्यामुळे त्यांच्या वाग्विलासविस्तारामध्ये नवरसाचे सागर, उचित रत्नांचे आगर, भावार्थाचे गिरिवर, साहित्यसोन्याच्या खाणी, विवेकवल्लीची सैंघ लावणी, प्रमेयांची उद्याने; यांचे वैपुल्य दिसून येते. या सर्व वाङ्मयीनमूल्यांसह त्यांनी 'मराठियेचां नगरी' 'ब्रह्मविद्येचा सुकाळु' करण्याचे जे अत्यंत महनीय कार्य केले आहे, ते पाहून 'कोणा नये युक्ती ज्ञानोबाची', असे कोणीही सुजाण म्हटल्याविना राहणार नाही. अंतरंग अधिकाऱ्याला 'परब्रह्म डोळा दाऊ' अशी प्रतिज्ञा करून ते परमानंदावर आरूढ करतात, तसेच 'येर लोकासही'आपल्या वाक्चातुर्याने परमानंदलाभ ते घडवू शकतात. श्रीज्ञानोबारायांच्या वाक्चातुरीप्रभव अशा शब्दाच्या फुलोऱ्यात गुंतणाऱ्यासही 'अंततो गत्वा' परमानंदलाभ व्हावा, असे त्यांच्या वचनांचे वैभव आहे. केवळ शब्दचातुर्यानेही स्वाश्रयीस परमानंद मिळवून द्यावा, हे श्रीज्ञानराजांच्या वचनांचे वैशिष्ट्य, त्या वचनांच्या यथार्थस्वरूपाचे अप्रमेयत्व सिध्द करणारे आहे. अशा एका वेगळ्या भावाने 'मुह्यन्ति यत्सूरय:' हे वेदांचे वर्णन त्यांच्या वचनांना लागू पडते. बड्या बड्या विद्वानांनाही अप्रेमय असणारी ही श्रीज्ञानोबारायांची वचने 'भाव धरोनिया' वाचणाऱ्यांना मात्र 'ज्ञान होय अज्ञानासी' या अवस्थेला आणून सोडतात, हे श्रीज्ञानोबारायांच्या वचनांचे आर्जव व मार्दव आहे.

वेदांचे अनंतत्व पाहता, त्याला श्रीज्ञानराज शब्दब्रह्माब्धि, वेदार्थसागर म्हणतात; ‘समुद्राहूनि खोल अर्थभरित’ असा श्रीज्ञानेश-वचनाकरही निश्चितच सागरोपम आहे. समुद्राच्या गंभीरतेसारखे अर्थगांभीर्य, जलपूरिततेसारखी भावजल-परिपूर्णता, रत्नाकरासारखे सिध्दांतरत्नाकरत्व आणि अचल प्रतिष्ठेसारखी प्रामाण्याची अचल प्रतिष्ठा, श्रीज्ञानोबारायांच्या वाङ्मय-महोदधीस प्राप्त आहे. शिवाय नवरसमिलित भक्तिरसपरिप्लुततेने या भावजलाला अतिरुच्यताही आहे. म्हणून हा नुसता महोदधी नसून क्षीरसागर आहे. क्षीरसागरामध्ये भगवंताचे शेषशय्येवर सहज शयन असावे, त्याप्रमाणे श्रीज्ञानेशवाक्-क्षीरसागरामध्ये भगवंताचे अखंड स्वरुपशय्याशयन भाविकांचा ‘पदे पदे’ प्रतीतिस येत असल्यामुळेच ‘बोली अरूपाचे रूप दावीन । अतीन्द्रिय परी भोगवीन । इंद्रियांकरवी ।।’ या त्यांच्या प्रतिज्ञा सिद्ध आहेत.

‘प्रत्यक्षेणानुमित्या वा यस्तूपायो न बुध्यते ।
एनं विदन्ति वेदेन तस्माद्वेदस्य वेदता ।।’

म्हणजे प्रत्यक्षाने अथवा अनुमानाने जो उपाय जाणला जात नाही, तो वेद जाणवून देतात, हेच वेदांचे वेदत्व आहे. त्याचप्रमाणे श्रीज्ञानोबारायांनीही आपल्या अभंगादि वाङ्मयातून प्रत्यक्षादि प्रमाणांना अप्रमेय असा परमात्मा तत्त्वज्ञांच्या व भाविकांच्या ज्ञानदृष्टीपुढे व भावदृष्टीसमोर साक्षात् उभा केला आहे. त्यामुळे ‘ज्ञानेशोक्तेश्च वेदता’ असे वाटल्याशिवाय रहात नाही. ‘क्षरां अक्षरां वेगळा’ असा स्वरुपाला प्राप्त झालेले असल्यामुळे श्रीज्ञानोबाराय क्षरपुरूष किंवा अक्षरपुरूष नाहीत. त्यामुळे त्यांची अभंगादिरूप वाणी ही एकापरीने ‘अपौरूषेय’ वाणी ठरू लागते. म्हणूनच त्यांच्या सगळ्याच वचनांना ‘वाचः संस्कृतप्राकृताः श्रुतिशिरः।’ ‘सुखे म्हणो येती वेद’ ही योग्यता आहे.

अनेकविध छंदात प्रवृत्त होणाऱ्या वेदवाणीप्रमाणे श्रीज्ञानेशवेदही अनेक छंदात प्रवृत्त झाला आहे. अनुभवामृतातले प्रारंभीचे नमनाचे श्लोक अनुष्टुप छंदातले असून सगळा सिध्दानुवादरूप अनुभवामृत, संतजनांची माहेश्वरी, ब्रह्मसाम्राज्यदीपिका असणारी ज्ञानेश्वरी, चांगदेवांच्या प्रबोधनासाठी आलेली पासष्टी; अशा या तीन ग्रंथातून हा वेद ओवीवृत्तात प्रवृत्त असून अभंगगाथेमध्ये अभंगवृत्तांत प्रवृत्त आहे. अभंगवृत्ताचे अनेक प्रकार संभवतात कारण ते अक्षरगणवृत्त किंवा मात्रावृत्ताच्या पध्दतीचे नसून गेयवृत्त आहे.

‘जनी म्हणे ज्ञानदेवा बोला अभंग।’ – अशा प्रमाणांवरुन भक्तशिरोमणी नामदेवरायांच्या निर्द्वंद्व अशा कीर्तनसमारंभात, परमात्मा पंढरीनाथाचे आनंदविभोर होऊन नृत्य चालू असताना, जनाबाईंच्या विंनतीवरून श्रीज्ञानोबारायांचे अभंगगायन अनुमित होते. त्यामुळे अभंगांचे नित्यनूतन असे चमत्कृतिपूर्ण गायन त्यांच्याकडे आहे. म्हणून अभंगांची विभिन्न पध्दतीची, रागदारीस उपयुक्त अशीही गेय रचना, जशी त्यांच्या गाथेत वैपुल्याने पहायला सापडते, तशी ती इतरत्र क्वचितच दिसून येते.

**संत ज्ञानदेव गाथा – शब्द अभंग चरण सूची**

श्रीज्ञानोबारायांच्या या अभंगादि वाङ्मयास वेदस्वरूपता, वेदतुल्यता सिध्द होत असल्यामुळे, वेदांच्या संरक्षणासाठी वैदिकांनी, क्रांतदर्शी ऋषींनी ज्या पध्दतीची उपाययोजना आजपर्यंत केली, तशाच उपायांनी याचेही जतन व्हायला हवे, याच भावनेने संतांच्या गाथा व ज्ञानेश्वरी इ. वाङ्मयाच्या विभिन्न सेवा संप्रदायात सर्वत्र रूढ आहेत. ज्ञानेश्वरीसारख्या ग्रंथाचे पारायण, प्रवचन आणि संतांच्या अभंगांचे गायन, निरूपण; हे सगळे प्रकार म्हणजे वेदांच्या सेवेने वेदरक्षणाप्रमाणे संतवाङ्मयाच्या सेवेने संतवाङ्मयाच्या संरक्षणाचेच आहेत.

'अर्थावीण पोथी वाचुनि काय ।' हे खरे असले, तरी अर्थावर जाण्यासाठी आधी नुसते शब्दांचे संरक्षणही आवश्यक असते. म्हणून वैदिक कित्येक वेळा, नव्हे, बहुश: वेदांच्या शब्दरक्षणातच गढलेले दिसतात. संतवाङ्मय जतन करणाऱ्या भाविक वारकऱ्यांनीही असेच हे अभंगादि संतवाङ्मय नुसते कंठस्थ करून, त्याची पारायणे करुन शब्दरक्षणातली आपली अभिरूची व प्रवृत्ती दाखवून दिली आहे.

वेदांची संहिता, पद, क्रम ही त्रिविध प्रकृती आणि जटा, माला, शिखा, रेखा, ध्वज, दंड, रथ व घन ही अष्टविध विकृती; या सर्व प्रकारांनी वेद कंठस्थ करणाऱ्या वैदिकांचा वेदांचे शब्द जसेच्या तसे जतन करण्याचा हेतू आहे. त्याचप्रमाणे पारंपारिक चालीत, शब्दांच्या उच्चारणाचे, आशयाला बाधा न आणण्याचे भान राखून विशिष्ट शब्दांवर थांबत, संतवाङ्मय गाणारे वारकरीही, संतांच्या शब्दांचे माहात्म्य जाणून, त्यांच्या अनुलोम-विलोम उच्चारणातून त्यांची जणु प्रकृति-विकृतिरूप पारायणेच करत असतात. हा त्यांच्या प्रयासही वैदिकांसारखा शब्दरक्षणाचाच आहे.

वेदवाङ्मयाचे किंवा संतवाङ्मयाचे हे शब्दरक्षण, अर्थ, आशय व तन्निरूपित जगत्कल्याणसाधक असे प्रयोग; यांच्या रक्षणासाठी अत्यंत आवश्यक असते. याच शब्दरक्षणभावनेने पदकोश व अर्थसंरक्षण भावनेने शब्दार्थकोश निर्माण झाले. प्रस्तुत नवीन प्रगत तंत्रज्ञानाच्या काळात संगणकाचा वापर करून अशा पद्धतीचे कोश सिध्द करून अभ्यासकांच्या हाती देण्याचे किचकट काम 'अद्वैत पब्लिकेशन्स्' ने हाती घेतले आहे. संतांच्या वाङ्मयाचा अभ्यास करणाऱ्या अभ्यासकांसाठी संतांच्या संपूर्ण ग्रंथाची शब्दसूची, ओवीसूची, श्लोकसूची, चरणसूची अशी व्यवस्था श्री.ह.भ.प. चकोर बाविस्कर, श्री. आदेश व. अत्रे व श्री. समीर कुसूरकर हे मोठ्या श्रध्देने, चिकाटीने व अविरत परिश्रमाने करत आहेत.

आता श्रीज्ञानोबारायांची गाथा, तिच्या शब्द व चरणसूचीसह 'बापरखुमादेविवरु' या नावाने अभ्यासकांच्या सेवेत प्रस्तुत होत आहे. श्रीज्ञानोबारायांचे शब्द त्यांच्याच अन्यान्य संदर्भासह व इतरही संतांच्या त्या शब्दाच्या संदर्भासह अभ्यासण्याची या निमित्ताने सोय होत आहे, हे फार आनंदावह आहे. शब्द व त्याचे अनेक संदर्भ इथे उपलब्ध होतील. त्यात काही समान अर्थी, काही भिन्न अर्थी तर काही विविध अर्थी संदर्भ असू शकतात. त्यावरून शब्दाचे व्यापकपण, त्याचा बहुआयामीपणा व आशयाभिव्यक्तीतला अचूकपणा, नेमकेपणा निश्चित होऊ शकतो. लेखकाची तब्येत अभ्यासायला या सर्वविध संदर्भांची मदत मिळते. ही सगळी सोय या प्रकाशनाने उपलब्ध होत आहे.

**।। बापरखुमादेविवरु ।।**

**संत ज्ञानदेव गाथा – शब्द अभंग चरण सूची**

श्री. बाविस्कर, श्री. अत्रे व श्री. कुसूरकर हे एका एका संतांच्या वाङ्मयवपुचे विश्वात्मकरूप अभ्यासकांसाठी सिध्द करतात. ‘येणे वाग्यज्ञे तोषावे’ अशी त्याला प्रार्थना करतात आणि यापुढे अजून एखाद्या संताच्या वाङ्मयवपुचे विश्वात्मकरूप अभ्यासकांसाठी सिध्द करण्याच्या सामर्थ्याचे पसायदान त्याला अहोरात्र मागत राहतात. हे सगळे करून

‘किंबहुना तुमचे केले । धर्मकीर्तन हे सिध्दी गेले’
येथ माझे जी उरले । पाईकपण ।।’

या विनम्र भावनेत आनंदमग्न असतात. म्हणून अभ्यासकांच्या अनंत धन्यवादाला ते पात्र आहेत. त्यांचा हा ध्यास व अभ्यास, अभ्यासकांना अशा, यासम व यातून संभाव्य अनेक प्रकारच्या अभ्यासात प्रवृत्त करो, एवढे पसायदान संतसम्राट श्रीज्ञानदेव – श्रीतुकारामप्रमुख संतांना मागून मी थांबतो.

भवदीय

चंद्रशेखर एकनाथमहाराज देगलूरकर
श्रावण शु. १५, रवि.शा. शके १९३६
दि. १० ऑगस्ट २०१४
श्रीक्षेत्र पंढरपूर

## ।। मनोगत ।।

।। श्रीराम ।।

श्रावण वद्य अष्टमी
१७/८/२०१४

‘‘तुज सगुण म्हणो की निर्गुण रे ।’’
‘‘समाधी साधन संजीवन नाम ।’’
‘‘घनु वाजे घुणघुणा, वारा वाहे रुणझुणा ।’’
‘‘पैल तो गे काऊ कोकताहे ।’’
‘‘रुप पाहतां लोचनी, सुख जाले वो ।’’
‘‘अवघाचि संसार, सुखाचा करीन।’’
‘‘आजि सोनियाचा दिनु, वर्षे अमृताचा घनु ।’’
‘‘देवाचिये द्वारी, उभा क्षणभरी ।’’
‘‘रुणझुणु रुणझुणु रे भ्रमरा ।’’
‘‘रंगा येई वो ये, विठाई ।’’
‘‘मोगरा फुलला, मोगरा फुलला ।’’
‘‘विश्वाचे आर्त माझ्रां मनी प्रकाशले ।’’
‘‘अधिक देखणे, तरी निरंजन पाहणे ।’’
‘‘अरे अरे ज्ञाना जालासी पावन ।’’

वरील सर्व भक्तीगीते म्हणून समग्र मराठी भाषिकांना ज्ञात असतातच. परंतु ही सर्व भक्तीगीते मूळचे अभंग आहेत, ते ज्ञानेश्वर माउलींचे अभंग आहेत आणि अशा अभंगांची ‘‘ज्ञानदेव गाथा’’ सुद्धा आहे हे अगदी क्वचित माहित असते. ज्ञानेश्वर माउली, निवृत्तीनाथ, सोपानदेव, मुक्ताई या दैवी

अवतारांची माहिती व चरित्र सर्वांना ज्ञात असते. माउलींची ''ज्ञानेश्वरी'' हा तर जगत्मान्य ग्रंथ आहे व त्याचा कित्येक भाषांमध्ये अनुवादही झाला आहे. ज्ञानेश्वरीप्रमाणेच माउलींचा ''हरिपाठ'' सुध्दा सर्वपरिचित आहे. (वस्तुत: हरिपाठाचे अभंग ज्ञानदेव गाथेतीलच आहेत !) माउलींच्या स्वतंत्र प्रज्ञेचा ग्रंथ म्हणून ''अमृतानुभव'' सुध्दा क्वचित परिचित आहे आणि चांगदेव महाराजांना माउलींनी पत्ररुपाने केलेला उपदेश म्हणून ''चांगदेव पासष्टी'' काही भक्तभाविकांना ज्ञात असते. परंतु, ''ज्ञानदेवी गाथा'' या ग्रंथाचा प्रचार वा प्रसार अत्यंत कमी प्रमाणात झाला आहे. खरेतर, वर निर्देशित अभंगांसारखेच कितीतरी अभंग ज्ञानदेव गाथेत समाविष्ट आहेत.

माउलींच्या शब्दाचे महात्म्य त्यांच्याच शब्दात सांगायचे तर ''जैसे बिंब तरी बचके एवढे । परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडे । शब्दाची व्याप्ती तेणे पाडे । अनुभवावी ।।'' आणि ''तो शांतुचि अभिनवेल । ते परियसा मऱ्हाठी बोल । समुद्राहूनि सखोल । अर्थभरित ।।'' तसेच ''नातरी कामितयाचिया इच्छा । फळे कल्पवृक्षु जैसा । बोलु व्यापकु होय तैसा ।'' अशा रितीने सांगता येईल. या आणि अशाच ''साहित्यसोनियाच्या खाणी'' असलेल्या शब्दांनी युक्त ज्ञानदेव गाथा सुद्धा भाविकांना ''नवरसांच्या सागरात'' सुस्नात करते.

माउलींच्या ज्ञानदेव गाथेत हरिपाठाचे अभंग, विरहिणी, गौळणी, वासुदेवाचे, काकड्याचे अभंग, बालक्रीडेचे, रुपकात्मक, उपदेशात्मक, उपासनेचे, ज्ञान–कर्म भक्तीचे, गुरु शिष्य संवादाचे असे सर्व प्रकारचे अभंग समाविष्ट आहेत, ही सुद्धा माउलींच्या ''वागविलास विस्तारु''ची साक्ष आहे. अशा या ज्ञानदेव गाथेची ''बापरखुमादेविवरु'' ही अभंग–चरण सूचीची सीडी आज माउलींच्याच अलंकापुरी प्रकाशित होत आहे.

तथापि माउलींच्या गाथेतील अभंग संख्येविषयी मात्र बरीच मतभिन्नता आढळते. सुमारे सातशेपासून अकराशे पर्यंत वेगवेगळ्या गाथेत अभंग आहेत. सूची प्रकल्पात बहुतेक सर्व अभंगांचा अभ्यास व्हावा या उद्देशाने सुमारे ११२५ अभंग समाविष्ट असलेल्या डॉ. प्रल्हाद नरहर जोशी (प्र.न.जोशी) यांची ज्ञानदेवी गाथा प्रमाणभूत मानली आहे. जेणेकरुन अन्य गाथाप्रतीतील अभंग आणि त्यांची सूची सहज उपलब्ध करता येईल. या अभंग–चरण सूचीच्या उपयोगिता आणि उपयोजन यासंबंधी प्रकाशकीय मनोगतात विस्तृत विवेचन व विवरण केले असल्याने त्याची पुनरुक्ती करीत नाही.

अद्वैत प्रकाशनाच्या परंपरेनुसार प्रत्येक प्रकल्पाला संबंधित विषयातील मान्यवरांची आशीर्वचनपर प्रस्तावना प्राप्त होत आली आहे. ज्ञानदेव गाथेच्या ''बापरखुमादेवीवरु'' या अभंग–चरण सूची प्रकल्पास हरिभक्तपरायण परमपूज्य श्री. चंद्रशेखर एकनाथमहाराज देगलूरकर यांचे आशीर्वाद आम्हास मिळाले हा मोठा भाग्याचा भाग आहे. श्री. चंद्रशेखर महाराजांनी अतिशय विद्वत्ताप्रचूर, विस्तृत, अभ्यासपूर्ण व माउलींच्या शब्द आणि साहित्याची महन्महता वर्णन

करणारी प्रस्तावना दिली आहे. प्रथम गुंडा महाराज व धुंडा महाराज नंतर वै. एकनाथमहाराज व सांप्रतचे भानुदास महाराज आणि सध्याचे ह.भ.प. श्री चंद्रशेखर व ह.भ.प.श्री. चैतन्य महाराज देगलूरकर अशी ही उत्तुंग परंपरा लाभलेल्या श्री. चंद्रशेखर महाराज यांचे ठायी ज्ञान,कर्म,भक्ती,वैराग्य, ऐश्वर्य किंबहुना सर्व दैवी गुणसंपत्तीचा समन्वय आढळून येतो. ''ऐसे जे महानुभाव । जे दैविये प्रकृतीचे दैव । जे जाणोनिया सर्व । स्वरुप माझे '' (ज्ञा ९/१९४) याच शब्दांत त्यांचे यथार्थ वर्णन करता येईल. श्री विठ्ठल सहस्रनामावर अत्यंत विद्वतापूर्ण संस्कृत भाष्य श्री. चंद्रशेखर महाराजांनी लिहिले आहे. ज्ञानेश्वर माउलींच्या पसायदानावर आधारित ''पसाय पायस'' ही अशीच अभूतपूर्व रचना महाराजांनी केली आहे. तद्वतच, तुकाराम महाराजांच्या सदेह वैकुंठगमनाचा अन्वयार्थ सांगणारा ग्रंथही श्री. चंद्रशेखर महाराजांनी सिध्द केला आहे. अशा ''बाळपणीच सर्वज्ञता । वरी तयाते ।'' (ज्ञा. ६/४५३) असलेल्या आणि ''गाथामूर्ती'' म्हणून नामाभिमान लाभलेल्या श्रीमन चंद्रशेखर महाराज देगलूरकर यांना आमचे साष्टांग दंडवत!

प्रकाशकीय मनोगतात वै.पी.व्ही. कुलकर्णी, श्री. समीर कुसूरकर व श्री. अत्रे ही अद्वैत प्रकाशनाची प्रस्थान त्रयी असल्याचा उल्लेख केला आहे. वै.श्री.पी.व्ही. आज हयात नसले तरी श्रीमन बाविस्कर महाराजांच्या सहर्ष आणि सक्रिय सहभागाने अद्वैत प्रकाशनाची श्री. कुसूरकर, श्री. बाविस्कर व श्री. अत्रे अशी नवीन प्रस्थानत्रयी झाली आहे हे मी आत्मविश्वासाने सांगू इच्छितो. ''मनुष्याणां सहस्रेषु कंश्चिद्यतति सिध्दये।।'' या (गीता ७।३) गीतावचनाचे साक्षात मूर्तिमंत रुपडे असलेले श्री. बाविस्कर महाराज सहा-सात पिढ्यांपासून कीर्तन प्रवचनाचा वारसा चालवित आहेत. श्री. बाविस्कर महाराजांच्या अभ्यासाचा, ज्ञानाचा, तपश्चर्येचा अद्वैत प्रकाशनाला अनमोल लाभ होत आहे. या प्रकल्पास ह.भ.प. श्रीमन् चंद्रशेखर महाराजांचे आशीर्वचन सुद्धा श्री. बाविस्कर महाराजांच्या सहकार्याने मिळाले आहे. ''कैसें माझां गुणी धाले । देशकाळातें विसरले । कीर्तनसुखें झाले । आपणपांचि ।।'' (ज्ञा ९।२०९) या ओवीची प्रचिती ज्यांच्या कीर्तन प्रवचनात येते त्या ह.भ.प.श्री. बावीस्कर महाराजांचा सहवास आम्हाला मिळतो आहे हे आमचे परमभाग्यच आहे.

''इवलेसे रोप लावियले द्वारी । तयाचा वेलू गेला गगनावरी ।'' सुमारे सात-आठ वर्षांपूर्वी वै. पमाकाका (श्री.पी.व्ही. कुलकर्णी) आणि मी यांच्या सहभागातून ज्ञानेश्वरीची ''तो वाग्यज्ञु म्हणिजे।'' ही शब्द ओवी सूची प्रकाशित झाली. पमाकाकांच्या ''पाऊलांचा मागोवा घेतु'' - त्यांच्या पश्चात प्रथम हरिपाठाची ''तयाचे बिसाट शब्द।'' ही शब्द ओवी सूची पुस्तकरुपात प्रकाशित झाली. पमाकाकांच्या आणि माझ्याही इच्छेखातर ग्रंथराज ज्ञानेश्वरीची ''ऐसी नानावर्णे रुपडी ।'' ही दृष्टांत सिध्दान्तरुप चतुरंगातील पारायण प्रतही ग्रंथरुपाने सिध्दीस गेली. तत्पश्चात, पमाकाकांनी ज्याची पायाभरणी केली त्या तुकाराम महाराजांच्या गाथेची ''तुका झालासे कळस।'' ही शब्द-अभंग-चरणसूची श्री. बाविस्कर महाराजांच्या सहकार्याने प्रकाशित झाली. संपूर्ण भगवद्गीता दृक-श्राव्य माध्यमातून उपलब्ध करुन देणारा ''हे गीतासागरतरंग।'' हा अभिनव प्रकल्पही तद्नंतर पूर्णत्वास गेला.

।। बापरखुमादेविवरु ।।

संत ज्ञानदेव गाथा - शब्द अभंग चरण सूची

समर्थ रामदास स्वामींच्या दासबोध ग्रंथाची ''हे शब्दरत्नाचे सागर ।'' ही शब्द ओवी सूची अद्वैत प्रकाशनाने प्रसिद्ध केली. माउली ज्ञानेश्वर, तुकाराम महाराज व समर्थ रामदास यांचे पाठोपाठ संतश्रेष्ठ नामदेव महाराज (आणि कुटुंबीय) यांच्या नामदेव गाथेची ''नाचू कीर्तनाचे रंगी।'' ही शब्द-अभंग-चरण सूचीसुद्धा नुकतीच नामदेव पुण्यतिथीला पंढरपुर क्षेत्री प्रकाशित झाली. आणि आज ज्ञानेश्वरांच्या जन्मदिनी अलंकापुरीतच माउलींच्या ''अमृतानुभव'' आणि ''चांगदेवपासष्टी'' या ग्रंथांची ''अनुभवामृते येणे ।'' ही शब्द ओवी सूची प्रकाशित होत आहे. त्यासमवेतच परिच्छेदाच्या प्रारंभी उद्धृत केलेल्या ''इवलेसे रोप, लावियले द्वारी ।'' या अभंगाचा समावेश असलेली माउलींच्या ज्ञानदेव गाथेची ''बापरखुमादेविवरु ।'' ही अभंग-चरण-सूची सुद्धा प्रकाशित होत आहे. म्हणजे माउलींच्या ज्ञानेश्वरीच्या सूचीच्या रुपाने लावलेले अद्वैत प्रकाशनाचे रोप आज माउलींच्याच अभंग गाथेच्या सूचीच्या निमित्ताने तो रोपाचा वेलू गगनावरी गेला असे सार्थकतेने म्हणता येईल. ''बापरखुमादेवीवरु'' या सीडीमध्ये ज्ञानेश्वर महाराजांच्या सर्व अभंगांसमवेत संत निवृत्तीनाथ, संत सोपानदेव, संत मुक्ताई आणि संत चांगदेव महाराज या प्रभृतींचे अभंग आणि त्या अभंगांची चरण सूची अभ्यासक व भक्त भाविक जिज्ञासूंना उपलब्ध होणार आहे.

मागे वर्णन केल्याप्रमाणे अद्वैत प्रकाशनाची जशी प्रस्थानत्रयी आहे तसाच इथे त्रिवेणीसंगम सुध्दा आहे. पमाकाकांचे पश्चात् श्रीमती प्रफुल्ला (काकू) पद्माकर कुलकर्णी या आमच्या सर्वच प्रकल्पांच्या प्रेरणास्थान म्हणून अग्रणी आहेत. तसेच त्यांनी हरिपाठ आणि ज्ञानेश्वरीच्या पुस्तकांचे प्रकल्प प्रमुख म्हणूनही सहभाग दिला. सौ. अंजली शशिकांत कुसूरकर या दासबोध ग्रंथाच्या सूचीच्या प्रकल्प प्रमुख आहेत. अजूनही सौ. अंजलीताई समग्र समर्थ साहित्याचा अभ्यास करीत आहेत. अद्वैत प्रकाशनाच्या सर्व प्रकल्पांचा जमा-खर्च, ताळेबंद, हिशोब इत्यादी अंगांचे एकहाती काम करणारी सौ. रेणूका समीर कुसूरकर हिचाही उल्लेख करावाच लागेल. अशा प्रकारे अद्वैत प्रकाशनाचा हा त्रिवेणी संगमही भूषणास्पद कार्य करीत आहे आणि अद्वैत प्रकाशनाच्या प्रत्येक प्रकल्पात, प्राणपणाने, प्राण भरणारे श्री. समीर शशिकांत कुसूरकर हे जणू प्रकाशनाचे एकखांबी तंबूच आहेत. अद्वैत प्रकाशनाचा कोणताही प्रकल्प श्री. समीर यांच्या सहकार्याविना पूर्णत्वास जाऊ शकला नसता हे म्हणणे जरी समीर कुसूरकरांना अतिशयोक्तीयुक्त वाटले तरी वस्तुस्थितीनिदर्शक आहे.

ज्ञानदेव गाथेची संहिता संगणकमुद्रित करण्याचे काम श्री. विनायक भिडे, पुणे यांनी अचूकपणे करुन दिले आहे. आम्ही त्यांचे आभारी आहोत. या सूचीचा प्रकल्प नयन मनोहर करण्यासाठी सर्वतोपरी सहाय्य करणारे सौ. दीक्षित (आर्टिस्ट), श्री. सुरेंद्र रानडे, श्री. अविनाश कढे, डी.जी. कॉपियर्सचे श्री. मोघे आणि सौ. आसावरी श्रीपाद अत्रे या सर्व कलाकार तंत्रज्ञांचे आम्ही मनापासून ऋणी आहोत.

माउली ज्ञानेश्वरांच्या अभंग गाथेच्या सूचीचे हे मनोगत माउलींच्याच अभंगाने पूर्ण करतो –

‘‘पाहे पां ध्वजेचें चिरगुट । राया जतन करिता कष्ट ।।
तैसा मी एक पतीत । परी तुझा मुद्रांकित ।।
मसीपत्र ते केवढें । रावो चालवी आपुल्या पाडें ।।
बाप रखुमादेविवरदा । सांभाळावें आपुल्या ब्रीदा ।।

– परी तुझा मुद्रांकित
श्री. आदेश वसंत अत्रे

## ।। प्रकाशकीय मनोगत ।।

श्रावण वद्य अष्टमी
गोकुळअष्टमी रविवार
शके एकोणिसशे छत्तीस
दिनांक १७.०८.२०१४

ॐ नमो ज्ञानेश्वरा । करुणाकरा दयाळा ।।१।।
तुमचा अनुग्रह लाधलों । पावन झालों चराचरीं ।।२।।

श्रीकृष्ण परमात्मा आणि श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराज यांच्या अवताराच्या तिथीवर, म्हणजेच गोकुळाष्टमी या पुण्यपावन पर्वावर, श्रीसंत ज्ञानेश्वर माउली, श्रीगुरु श्रीमन्निवृत्तीनाथ, श्रीसंत सोपानकाका, श्रीसंत मुक्ताई या संतमांदियाळीसोबतच श्रीसंत चांगदेवमहाराज या संतपंचकाच्या स्वतंत्र अभंगगाथ्यांतील सर्वच अभंगांतील सर्व चरणांतील म्हणजेच सर्व कडव्यांतील सर्वच शब्दांची समग्र एकत्रित सूची पण पाच वेगवेगळ्या प्रकरणांत/भागांत 'बापरखुमादेवीवरु' या नावाने 'अद्वैत प्रकाशन, पुणे' तर्फे आज रोजी श्रीक्षेत्र आळंदी येथे प्रकाशित होत आहे, हा खचितच मोठा भाग्ययोग आहे.

अद्वैत प्रकाशन, पुणे तर्फे आजवर प्रकाशित झालेली संतसेवा या क्षेत्रातील जाणकारांस आताशा सुपरिचित झालेली आहे. संतसाहित्यातील शब्दा–शब्दाच्या सूचीकरणाच्या मालिकेतील आणखी एक भाग म्हणजे आज प्रकाशित होत असलेली ही सूची होय.

श्रीसंत ज्ञानेश्वरमाउली हे नाव व त्यांच्या भावंडांची नावे आणि त्यांचे लौकिक चरित्र थोडेफार का होईना, माहिती नाही, असा मराठी माणूसच सापडणार नाही. मराठी परिप्रेक्ष्याच्या बाहेरही तत्त्वज्ञानाच्या, अध्यात्माच्या, परमार्थाच्या क्षेत्रातील जाणकारांसही श्रीमाउलींचा परिचय आहे. श्रीमाउलींच्या 'ज्ञानेश्वरी' या ग्रंथाची तर बावीस–चोवीस वेगवेगळ्या भाषांत भाषांतरे झाली आहेत आणि ज्ञानेश्वरी, अनुवादित रुपांत का होईना, जगभर पोहोचली

आहे आणि त्या–त्या ठिकाणी स्वाभाविकपणेच विद्वन्मान्य अन् रसिकमान्यही झाली आहे. त्या तुलनेत श्रीमाउलींच्या अभंगगाथेचा प्रसारप्रचार तसा कमी आहे.

वारकरी संप्रदायात अगदी अनिवार्यरित्या दैनंदिन स्वाध्यायसंध्येचे स्थान असलेला माउलीकृत हरिपाठ, हाही खरेतर माउलींच्या अभंगगाथेचाच भाग आहे. तथापि, तो हरिपाठ इतका सर्वजनपरिचित आहे की, तो हरिपाठ जणू एक लहानसा स्वतंत्र प्रकरणग्रंथ म्हणून प्रचलित झाला आहे. अर्थात्, त्यात वावगे काहीच नाही.

हरिपाठाचे अभंग, गौळणी, विरहिणी, आंधळे–पांगळे–वासुदेवाचे अभंग, भूपाळ्या, काकड्याचे अभंग, बाळक्रीडेचे अभंग, बाळछंद, कूट अभंग, रुपकात्मक अभंग अशा अनेकानेक प्रकारात श्रीमाउलींनी भरपूर अभंगरचना केली आहे. त्या अभंगांतही भगवंताचे सगुणवर्णन, निर्गुणवर्णन, स्थितिपर, पंढरिमाहात्म्यपर, काला, नामपर, संतपर, उपदेशपर, एकविध, उपासनापर, करुणापर, मागणीपर – हे आणि असे अनेक प्रकार माउलींच्या अभंगगाथेत आहेत.

वारकरी संप्रदायातील भक्त भाविक, संतसाहित्याचे अभ्यासक अन् ज्ञाते–जाणते या अभंगांचा आस्वादही घेत असतात, हे खरे. तरी देखील, पाठांतील ठरावीक अभंग वगळता इतर अभंगांचा वापर विनियोग तसा कमीच आहे. यामागील कारणांची मीमांसा यास्थानी करण्याचे कारण नाही. पण ज्या कारणासाठी, ज्या उपयोजनासाठी, ज्या विषयासाठी माउलींचा अभंग हवा आहे, त्यासाठी माउलींच्या अभंगगाथेतून अभंग शोधण्याची अन् त्याक्षणी अभंग सापडण्याची अडचण अजूनही आहे, हे मात्र बरीक खरे. ती अडचण या प्रस्तूतच्या, अकारविल्ह्यानुसार असलल्या शब्द–कडवे–अभंग सूचीमुळे बरीचशी दूर होईल, असे वाटते.

‘बरीचशी’, असा हातचा राखून शब्दप्रयोग करण्याचे कारण आहे. ज्ञानेश्वरीतील, अमृतानुभवातील, चांगदेवपासष्टी मधील ओव्यांच्या संबंधाने या ग्रंथांच्या वेगवेगळ्या संपादकांत, अभ्यासकांत, संशोधकांत काही मतभिन्नता असली तरी, तशी बरीच एकवाक्यता आहे. या ग्रंथांतील ओव्या किती आहेत, कोणत्या आहेत, अस्सल किती, प्रक्षिप्त किती, कोणत्या इत्यादी संदर्भाने असलेल्या तफावती कमी आणि संख्येच्या, प्रमाणाच्या दृष्टीने तर किरकोळ म्हणता येतील, अशा आहेत. या ग्रंथांच्या वेगवेगळ्या संपादित प्रतींत अर्थभेद करणारे पाठभेद आहेत, त्या पाठांबाबत मतभेदही आहेत आणि आपापले पाठ प्रमाण मानण्याची परंपरा देखील आहे. पण तरीदेखील, एकूण ओव्यांच्या संख्येच्या तुलनेत ते पाठभेदही अगदी भरपूर म्हणता येणार नाहीत आणि

अर्थभेदांच्या दृष्टीनेही त्यांची संख्या भरपूर म्हणता येणार नाही. शिवाय, हळूहळू का होईना, ज्ञानेश्वरीतील व अमृतानुभवातील ओव्यांचे पाठ स्थिरावण्याची प्रक्रिया कालौघात सुरु झाल्याचे स्पष्ट दिसतेही आहे. अर्थात् हा देखील एक वेगळाच स्वतंत्र अभ्यासविषय आहे आणि त्याचाही उहापोह करण्याचे हे स्थळ नाही. मात्र तरीही याचा उल्लेख आवश्यक ठरला, तो, ओव्यांच्या या संदर्भांनी अभंगांच्या तुलनेकरिता. श्रीमाउलींच्या ओवीवाङ्मयाच्या वेगवेगळ्या संपादित प्रतींमध्ये असणाऱ्या तफावतींपेक्षा श्रीमाउलींच्याच अभंगवाङ्मयाच्या वेगवेगळ्या संपादित प्रतींमध्ये असणाऱ्या तफावती खूप म्हणजे खूपच जास्त आहेत.

श्रीमाउलींचा हरिपाठ वगळता (हरिपाठातही अभंग २७ की २८ असा केवळ अभंगसंख्येच्या दृष्टीने का होईना, तसा किरकोळ, पण मतभेद आहेच.) श्रीमाउलींच्या अभंगांबाबत वेगवेगळ्या संपादित गाथ्यांत पराकोटीच्या तफावती आहेत. अभंग, अभंगांची संख्या, अभंगांचे पाठ, त्या पाठांचे प्रामाण्य, त्यांची (म्हणजे अभंगांची व पाठांचीही) स्वीकारार्हता, क्षेपकत्त्व आदीकरून कोणत्याही मुद्यांवर श्रीमाउलींची एक संपादित गाथा दुसऱ्या संपादित गाथेपेक्षा खूपच वेगळी वाटते.

ही सर्व पूर्वपीठिका एवढ्या विस्ताराने मांडण्याचे कारण म्हणजे, या प्रस्तुतच्या सूचीतील अभंगांची संख्या, अभंगांचा क्रम व अभंगांचा पाठ हा श्रीमन् प्रल्हाद नरहर जोशी (म्हणजेच श्री.प्र.न. जोशी) यांनी संपादित केलेल्या श्रीमाउलींच्या अभंगगाथेनुसार आहे. या सूचीसाठी आम्ही ही गाथा घेण्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे, श्रीमाउलींच्या उपलब्ध इतर संपादित अभंगगाथ्यांपेक्षा या गाथेत अभंगसंख्या बरीच जास्त आहे.

सकलसंतसाहित्याच्या शब्दाशब्दाची सूची करणे, हे अद्वैत प्रकाशनाचे विहित–निहित ध्येय आहे. तेव्हा, सूची करावयाचीच आहे, तर कमी अभंग असलेली संपादित गाथा घेण्यापेक्षा ज्या संपादित गाथेत जास्तीत जास्त अभंग असतील, ती गाथा घ्यावी, असा सुज्ञ व प्रोक्त विचार श्री समीर कुसूरकर यांनी केला. श्रीमाउलींचे अभंग किती, कोणते, प्रमाण कोणते, क्षेपक कोणते याबाबत ज्यांना संशोधन करावयाचे असेल, त्यांनाही तुलनेकरिता, अभ्यासाकरिता (व होय, वादाकरिताही !) जास्तीत जास्त मजकूर अनायासेच उपलब्ध होईल, हाही आनुषंगिक लाभ जास्त अभंग असलेली गाथा घेण्यात आहे.

तेव्हा, श्रीमाउलींच्या अभंग संख्येच्या निश्चितीकरिता, अभंगांच्या पाठांकरिता, पाठांच्या प्रामाण्याकरिता ही सूची नाही. आमच्या प्रकाशनाच्या सर्वच प्रकल्पांचे उद्देश व उपयोजन प्रत्येक प्रकल्पात आम्ही विस्ताराने मांडले आहेत, ते याही प्रकल्पास लागू आहेत. श्री.प्र.न. जोशी यांनी संपादित

केलेल्या श्रीसंत ज्ञानेश्वरमाउलींच्या अभंगगाथेतील सर्व अभंगांतील एकूण एक शब्दांची ही सूची आहे. इतर सर्व प्रकल्पांप्रमाणेच श्रीमाउलींच्या या अभंगगाथेतील सर्व शब्दांची अकारविल्ह्यानुसार सूची, त्या–त्या प्रत्येक शब्दासमोर तो–तो शब्द ज्या–ज्या कडव्यात आहे, ती सर्व कडवी आणि त्या त्या कडव्याआधी, ते कडवे कोणत्या क्रमांकाच्या अभंगात कोणत्या क्रमांकाने आहे, ते क्रमांक दिले आहेत. सूचीच्या आधी दिलेल्या संपूर्ण गाथेत त्या क्रमांकावर तो अभंग संपूर्ण पाहाता येईल.

अशाप्रकारे संतसाहित्यातील शब्दांची सूची करण्याचा ओंनामा हरिभक्तिपरायण वैकुंठवासी श्रीमन् पद्माकर विठ्ठल कुलकर्णी (उपाख्य : श्री.पीव्ही) आणि श्रीमन् आदेश वसंत अत्रे (उपाख्य : श्री.शेखरकाका) या उभयतांनी ज्ञानेश्वरीच्या 'तो वाग्यज्ञु म्हणिजे' या शब्द–ओवी–सूचीच्या रुपाने केला. पैकी श्री.पीव्ही हे आज त्यांच्या पांचभौतिक देहाच्या रुपाने अस्तित्वात नाहीत, हे आपले दुर्दैव. लौकिकात शासनाच्या आयकर विभागात वरिष्ठ हुद्यावर असलेल्या श्री. पीव्हींनी विहित उपजीविका म्हणून नोकरी केली पण त्याचबरोबर अंगीकृत जीविका म्हणून ज्ञानेश्वरीची उपासना केली ! मात्र, ज्ञानेश्वरीची श्री. पीव्हींनी केलेली विविधांगी सेवा म्हणजे केवळ निष्काम कर्मयोगाचे शुध्द रूप आहे. कर्तृत्वाहंकार आणि फलासक्ती तर दूरच, पण देहाहंकार आणि कर्मासक्तीही श्री. पीव्हींना कधी स्फुरली असल्याचे दूरन्वयेही जाणवले नाही. तरीही (म्हणूनच?) श्री.पीव्हींनी ज्ञानेश्वरीच्या शब्द–ओवी–सूचीचे आणि चतुरंगातील ज्ञानेश्वरीचे प्रकल्प, श्री. शेखर काका आणि श्री. समीरजी यांच्या सहकार्याने पूर्णत्वास नेले. ही त्रयी म्हणजे अद्वैत प्रकाशनाची प्रस्थानत्रयीच !

अद्वैत प्रकाशनाच्या प्रत्येक प्रकल्पाचा अविभाज्य भागच नव्हे, तर आधारस्तंभही असलेले श्रीमन् आदेश अत्रे, म्हणजेच श्री. शेखरकाका, हे एक अद्भूत रसायन आहे. कोणताही हेतू न ठेवता केवळ संतांवरील सहज आंतरिक उमाळ्यापोटी प्रत्येक प्रकल्पात श्री. शेखरकाका स्वत:स झोकून देतात. संतसिद्धांत आपसूकच त्यांचे अंगी बाणले असल्याने लौकिकाची चाड तर श्री. शेखरकाकांना कधी नव्हतीच, पण स्वत:च्या देहधारणेबाबतही ते उदासीन असतात. 'आत्मन्येवात्मना तुष्ट:' अशा लक्षणांपासून श्री. शेखरकाका ढळत नाहीत आणि आपले संतसाहित्यसेवेचे निष्काम व्रत टाळतही नाहीत. या सूचीच्या संपादनाचा–संकलनाचा संपूर्ण भार श्री. शेखरकाकांनी लीलया पेलला आहे. तसेच प्रत्येक बाबतीत 'त्याची इच्छा' मानून व समजून कर्तव्यरत रहाणारे श्री. समीर कुसूरकर, यांच्या संगणक तंत्रकौशल्याची साथ नसती, तर अद्वैत प्रकाशनाचा कुठलाच प्रकल्प सिध्दिस गेला नसता, हे वास्तव आहे.

श्री.पीव्ही, श्री. शेखरकाका आणि श्री. समीरजी हे तिघे म्हणजे 'तुका म्हणे एका देहाचे अवयव', अशी अद्वैत प्रकाशनाची अभिन्न अंगे आहेत. कुणी कुणाचे आभार मानायचे आणि कसे ? पण औपनिषदिक भाषेत मात्र आपणच आपल्या अंगांबाबत प्रार्थना करु शकतो. ॐ आप्यायन्त ममाङ्गानि

वाक् प्राणश्चक्षु: श्रोत्रमथो बलमिन्द्रियाणिच सर्वाणि । म्हणजे, हे भगवंता, 'ममाङ्गानि सर्वाणि इन्द्रियाणिच बलम् आप्यायन्तु', माझ्या सर्वेन्द्रियांना, वाचेला, प्राणांना, चक्षुंना, श्रोत्राला बळ दे, शक्ती दे. अंगांना, गात्रांना स्थिर कर. पुष्ट-तुष्ट कर. का ? अरे, तीच तर माझ्या परमार्थाची सामुग्री आहे. 'कथेची सामुग्री । देह अवसानावरी ।।१।। नको जाऊं देऊं भंगा । गात्रें माझी पांडुरंगा ।।२।।' केनोपनिषदातील प्रार्थनेस जर श्रीतुकाराम महाराजही अनुसरत असतील, तर आपणच आपल्याच अंगांबद्दल कृतज्ञता बाळगून त्यांच्यासाठी प्रार्थना करण्यात काय वावगे आहे ? म्हणून श्री.पीव्ही, श्री. शेखरकाका व श्री. समीरजी या अद्वैत त्रिदलास त्रिवार वंदन.

अद्वैत प्रकाशनाच्या प्रत्येक प्रकल्पास त्या-त्या अभ्यासक्षेत्रातील उत्तुंग मानबिंदू असलेल्या विभूतींचे कृपा आशीर्वाद लाभले आहेत. आज प्रकाशित होत असलेल्या 'बापरखुमादेवीवरु' या प्रकल्पास आशीर्वाद लाभले आहेत, ते, हरिभक्तिपरायण परमपूज्य श्रीमन् चंद्रशेखर एकनाथमहाराज देगलूरकर, या विभूतींचे.

वारकरी संप्रदायात पायापासून कळसापर्यन्त असलेले ज्ञान, भक्ति, कर्म, ऐश्वर्य, वैराग्य हे सांप्रतकाली ज्यांच्यामुळे अधिक आगळ्या तेजाने झळाळून उठले आहे, अशा फडांपैकी अग्रणी म्हणजे देगलूरकर फड. परमपूज्य सद्गुरु पितामह वैकुंठवासी गुंडा महाराज आणि वै. धुंडा महाराज, प.पू. तीर्थरूप वै. एकनाथमहाराज आणि विद्यमान श्रीमन् प.पू. भानुदासमहाराज आणि आता पुढच्या पिढीतील श्रीमन् चंद्रशेखर महाराज आणि श्रीमन् चैतन्य महाराज - या तापहीन मार्तंडांच्या अन् अलांछन चंद्रम्यांच्या जोड्या प्रत्येक पिढीत उदित होत आहेत, हे खरोखर वारकरी संप्रदायाचे मोठेच वैभव आहे. वारकरी संप्रदायाचे सर्व ओज-तेज, सत्व-स्वत्व, बल-फल काय आहे, आणि कसे आहे, आणि किती आहे, हे जर कुणास जाणून घ्यायचे असेल, त्याने श्रीमन् चंद्रशेखर महाराजांचे दर्शन घ्यावे. आज संप्रदायातील प्रत्येक बाबीचा पूर्णोद्गार आणि पूर्णविराम म्हणजे श्री. चंद्रशेखर महाराज होत. श्रीविठ्ठल सहस्रनामावार महाराजांनी संपूर्ण संस्कृतात भाष्य लिहिले आहे. श्रीमाउलींच्या पसायदानावर 'पसायपायस' ही अपूर्व, विविधांगी रचना केली आहे. जगद्गुरु श्रीतुकाराम महाराजांच्या सदेह वैकुंठगमनाची शास्त्रीय प्रक्रिया साधार मांडणारा ग्रंथ सिद्ध केला आहे. श्री तुकोबारायांच्या अभंगगाथेशी श्रीचंद्रशेखर महाराजांचे इतके विलक्षण अभिन्न तादात्म्य आहे, की संप्रदायात त्यांना 'गाथामूर्ती' असे नामाभिधान आहे !

प्रकांड पांडित्य आणि प्रगाढ श्रध्दा यांचा अविश्वसनीय अविरोधच नव्हे, तर चेतोहर संगम श्रीमन् चंद्रशेखर महाराज देगलूरकर यांचे ठायी दिसून येतो. त्यांचे कृपाशीर्वाद या प्रकल्पास लाभले, हे आमचे केवळ भाग्य. त्यांचा लोभ आमच्यावर असाच कायम रहावा, ही प्रार्थना.

या प्रकल्पासाठी अभंगगाथेच्या संगणक मुद्रणाचे काम करणारे श्री. विनायक भिडे यांचे आभार. वेष्टण मुखपृष्ठ, सुबक–सुंदर करून देणाऱ्या सौ. दीक्षित (आर्टिस्ट), श्री. सुरेंद्र रानडे, श्री. अविनाश कढे, डी.जी. कॉपियर्सचे श्री. मोघे आणि सौ. आसावरी श्रीपाद अत्रे सर्व कलाकार–तंत्रज्ञांचे आभार. ज्या–ज्या ज्ञात–अज्ञात व्यक्ती–शक्तींचे साहाय्य या प्रकल्पास लाभले, त्या–त्या सर्वांचे आम्ही कृतज्ञ अंत:करणाने ऋण व्यक्त करतो.

या मनोगताच्या सुरुवातीस श्रीसंत एकनाथ महाराज यांच्या, श्रीमाउलीपर अभंगातील पहिली दोन कडवी आम्ही उद्धृत केली आहेत. त्याच अभंगातील शेवटची दोन कडवी या मनोगताच्या शेवटासही सयुक्तिक आहेत.

मी कळाकुसरीं कांहीच नेणे । बोलतों वचनें भाविका ।।३।।
एका जनार्दनी तुमचा दास । त्याची आस पुरवावी ।।४।।

हे माउलीमहावैष्णव ज्ञानेश्वर महाराजा, हे करूणाकरा दयाळा, तुमचा अनुग्रह आजवर आम्हास लाभत राहिला. त्याने आम्ही पावन होत आलो. तुम्हावरील भक्तिभावा व्यतिरिक्त आम्ही दुसरे कांही कांही जाणत नाही. आजपर्यन्त या दासांची प्रत्येक आस तुम्ही पुरविलीत. पुढेही परवा, ही तुमच्या पार्यी पसायपायस प्रार्थना.

***

अद्वैत पब्लिकेशन्स्

# प्रकल्प

‘ऐसीं नानावर्णे रूपडीं’ –श्री ज्ञानेश्वरी – दृष्टांत सिद्धांत रूप चतुरंगातील पारायण प्रत
‘तो वाग्यज्ञु म्हणिजे’ – श्री ज्ञानेश्वरी – शब्द ओवी सूची
‘ते हे मंत्ररहस्य गीता’ –श्रीमद् भगवद्गीता – शब्द श्लोक सूची
‘हे गीतासागर तरंग’ – श्रीमद् भगवद्गीता पठण – दृक श्राव्य प्रकल्प
‘तुका झालासे कळस’ – श्री तुकाराम गाथा – शब्द अभंग सूची
‘हे शब्द रत्नांचे सागर’ – श्रीमद् दासबोध – शब्द ओवी सूची
‘बापरखुमादेविवरु’ – श्री ज्ञानदेव गाथा – शब्द अभंग सूची
‘नाचू कीर्तनाचे रंगी’ – श्री नामदेव गाथा – शब्द अभंग सूची
‘श्रीकृष्णकीर्तीचे एकेक अक्षर’ – श्री एकनाथी भागवत – शब्द ओवी सूची
‘तयाचे बिसाट शब्द’ – श्री ज्ञानदेव हरिपाठ – शब्द अभंग सूची

# अक्षरवार शब्दसंख्या

| भाग क्रमांक | भाग | अभंग संख्या | चरण संख्या | शब्दसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ | संत ज्ञानदेव अभंग | ११२१ | ५२९५ | ६१३६१ |
| २ | संत निवृत्तिनाथ अभंग | ३७४ | १५८० | १३०४८ |
| ३ | संत सोपानदेव अभंग | ५२ | २१४ | १८८० |
| ४ | संत मुक्ताई अभंग | ४२ | १८१ | १५२५ |
| ५ | संत चांगदेव अभंग | ७७ | २६४ | २२०२ |
| | एकुण | १६६६ | ७५३४ | ८००१६ |

।। बापरखुमादेविवरु ।।

संत ज्ञानदेव गाथा – शब्द अभंग चरण सूची

# अक्षरवार शब्दसंख्या भाग १

# ।। संत ज्ञानदेव गाथा – संत ज्ञानदेव अभंग – शब्द अभंग चरण सूची ।।

| भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या | भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या | भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | अ | १ | ६६९२ | १२ | ड | १८३६१ | १६२ | २३ | म | ३९५४१ | ४३९९ |
| २ | क | ६६९३ | ३८९९ | १३ | ढ | १८५२३ | १९ | २४ | य | ४३९४० | ९३६ |
| ३ | ख | १०५९२ | ३३६ | १४ | त | १८५४२ | ४८२४ | २५ | र | ४४८७६ | २५५५ |
| ४ | ग | १०९२८ | ११७४ | १५ | थ | २३३६६ | ९६ | २६ | ल | ४७४३१ | ७८५ |
| ५ | घ | १२१०२ | ६२८ | १६ | द | २३४६२ | २६६८ | २७ | व | ४८२१६ | ३८२२ |
| ६ | च | १३५३० | १०८६ | १७ | ध | २६१३० | ७८६ | २८ | श | ५२०३८ | १०४३ |
| ७ | छ | १४६१६ | ७० | १८ | न | २६९१६ | ४५९९ | २९ | ष | ५३०८१ | १४ |
| ८ | ज | १४६८६ | २९३१ | १९ | प | ३१५१५ | ४२३२ | ३० | स | ५३०९५ | ५०२८ |
| ९ | झ | १७६१७ | २४० | २० | फ | ३५७४७ | २१६ | ३१ | ह | ५८१२३ | २२९१ |
| १० | ट | १७८५७ | ८३ | २१ | ब | ३५९६३ | २२४४ | ३२ | क्ष | ६०४१४ | १३८ |
| ११ | ठ | १७९४० | ४२१ | २२ | भ | ३८२०७ | १३३४ | ३३ | ज्ञ | ६०५५२ | ८१० |
|  |  |  |  |  |  |  |  |  |  | एकुण | ६१३६१ |

# अक्षरवार शब्दसंख्या भाग २

## ।। संत ज्ञानदेव गाथा – संत निवृत्तिनाथ अभंग – शब्द अभंग चरण सूची ।।

| भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या | भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या | भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | अ | १ | १५३२ | १२ | ड | ३७८२ | १९ | २३ | म | ८४९३ | ६१० |
| २ | क | १५३३ | ६९१ | १३ | ढ | ३८०१ | ६ | २४ | य | ९१०३ | १७३ |
| ३ | ख | २२२४ | १३५ | १४ | त | ३८०७ | ८४२ | २५ | र | ९२७६ | ३९२ |
| ४ | ग | २३५९ | ५३६ | १५ | थ | ४६४९ | ११ | २६ | ल | ९६६८ | १०४ |
| ५ | घ | २८९५ | १३० | १६ | द | ४६६० | ५६७ | २७ | व | ९७७२ | ७४२ |
| ६ | च | ३०२५ | २२२ | १७ | ध | ५२२७ | २१७ | २८ | श | १०५१४ | २१८ |
| ७ | छ | ३२४७ | २० | १८ | न | ५४४४ | १४७० | २९ | स | १०७३२ | १३६७ |
| ८ | ज | ३२६७ | ४३० | १९ | प | ६९१४ | ८६६ | ३० | ह | १२०९९ | ८५८ |
| ९ | झ | ३६९७ | २५ | २० | फ | ७७८० | २७ | ३१ | क्ष | १२९५७ | ४८ |
| १० | ट | ३७२२ | १८ | २१ | ब | ७८०७ | ३६७ | ३३ | ज्ञ | १३००५ | ४४ |
| ११ | ठ | ३७४० | ४२ | २२ | भ | ८१७४ | ३१९ | | | एकुण | १३०४८ |

।। बापरखुमादेविवरु ।।

संत ज्ञानदेव गाथा – शब्द अभंग चरण सूची

# अक्षरवार शब्दसंख्या भाग ३

## ।। संत ज्ञानदेव गाथा – संत सोपानदेव अभंग – शब्द अभंग चरण सूची ।।

| भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या | भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या | भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | अ | १ | १९४ | १२ | ड | ४७८ | २ | २३ | य | १२८१ | १५ |
| २ | क | १९५ | ५७ | १३ | त | ४८० | १३५ | २४ | र | १२९६ | ७२ |
| ३ | ख | २५२ | १६ | १४ | थ | ६१५ | १ | २५ | ल | १३६८ | ८ |
| ४ | ग | २६८ | ५२ | १५ | द | ६१६ | ९० | २६ | व | १३७६ | १०९ |
| ५ | घ | ३२० | १५ | १६ | ध | ७०६ | २९ | २७ | श | १४८५ | ३० |
| ६ | च | ३३५ | ३३ | १७ | न | ७३५ | १९० | २८ | स | १५१५ | २३१ |
| ७ | छ | ३६८ | २ | १८ | प | ९२५ | १३७ | २९ | ह | १७४६ | १२३ |
| ८ | ज | ३७० | ८८ | १९ | फ | १०६२ | ३ | ३० | क्ष | १८६९ | ६ |
| ९ | झ | ४५८ | ३ | २० | ब | १०६५ | ६४ | ३१ | ज्ञ | १८७५ | ६ |
| १० | ट | ४६१ | ४ | २१ | भ | ११२९ | ४१ | | | एकुण | १८८० |
| ११ | ठ | ४६५ | १३ | २२ | म | ११७० | १११ | | | | |

।। बापरखुमादेविवरु ।।

संत ज्ञानदेव गाथा – शब्द अभंग चरण सूची

# अक्षरवार शब्दसंख्या भाग ४

## ।। संत ज्ञानदेव गाथा – संत मुक्ताई अभंग – शब्द अभंग चरण सूची ।।

| भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या | भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या | भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | अ | १ | २०८ | ११ | ड | ४४४ | १ | २१ | म | ९४६ | १६१ |
| २ | क | २०९ | ७० | १२ | त | ४४५ | ७७ | २२ | य | ११०७ | १६ |
| ३ | ख | २७९ | ३ | १३ | थ | ५२२ | २ | २३ | र | ११२३ | ३२ |
| ४ | ग | २८२ | २१ | १४ | द | ५२४ | ७५ | २४ | ल | ११५५ | ५ |
| ५ | घ | ३०३ | १९ | १५ | ध | ५९९ | २० | २५ | व | ११६० | ८३ |
| ६ | च | ३२२ | ५१ | १६ | न | ६१९ | १४० | २६ | श | १२४३ | २६ |
| ७ | छ | ३७३ | २ | १७ | प | ७५९ | १३० | २७ | स | १२६९ | १६६ |
| ८ | ज | ३७५ | ५५ | १८ | फ | ८८९ | ५ | २८ | ह | १४३५ | ८३ |
| ९ | झ | ४३० | ८ | १९ | ब | ८९४ | १९ | २९ | क्ष | १५१८ | ३ |
| १० | ठ | ४३८ | ६ | २० | भ | ९१३ | ३३ | ३० | ज्ञ | १५२१ | ५ |
| | | | | | | | | | | एकुण | १५२५ |

।। बापरखुमादेविवरु ।।

संत ज्ञानदेव गाथा – शब्द अभंग चरण सूची

# अक्षरवार शब्दसंख्या भाग ५

# ।। संत ज्ञानदेव गाथा – संत चांगदेव अभंग – शब्द अभंग चरण सूची ।।

| भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या | भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या | भाग | अक्षर | शब्दक्रमांक | शब्दसंख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | अ | १ | १९९ | १२ | ड | ६४२ | १६ | २३ | म | १४७१ | १७९ |
| २ | क | २०० | ११४ | १३ | ढ | ६५८ | १ | २४ | य | १६५० | १८ |
| ३ | ख | ३१४ | १५ | १४ | त | ६५९ | १५८ | २५ | र | १६६८ | ३८ |
| ४ | ग | ३२९ | ५३ | १५ | थ | ८१७ | १ | २६ | ल | १७०६ | ३५ |
| ५ | घ | ३८२ | २५ | १६ | द | ८१८ | ८१ | २७ | व | १७४१ | १६२ |
| ६ | च | ४०७ | १०४ | १७ | ध | ८९९ | १८ | २८ | श | १९०३ | ४० |
| ७ | छ | ५११ | ५ | १८ | न | ९१७ | २०८ | २९ | ष | १९४३ | २ |
| ८ | ज | ५१६ | ९७ | १९ | प | ११२५ | १५७ | ३० | स | १९४५ | १८९ |
| ९ | झ | ६१३ | १२ | २० | फ | १२८२ | १८ | ३१ | ह | २१३४ | ५५ |
| १० | ट | ६२५ | ५ | २१ | ब | १३०० | ११४ | ३२ | क्ष | २१८९ | ६ |
| ११ | ठ | ६३० | १२ | २२ | भ | १४१४ | ५७ | ३३ | ज्ञ | २१९५ | ८ |
| | | | | | | | | | | एकुण | २२०२ |

| | | |
|---|---|---|
| १ | ।।ज्ञा.गा.०००१.०१।। | रूप पाहातां लोचनीं । सुख जालें वो साजणी |
| २ | ।।ज्ञा.गा.०००१.०२।। | तो हा विठ्ठल बरवा । तो हा माधव बरवा |
| ३ | ।।ज्ञा.गा.०००१.०३।। | बहुता सुकृतांची जोडी । म्हणुनी विठ्ठलीं आवडी |
| ४ | ।।ज्ञा.गा.०००१.०४।। | सर्व सुखाचें आगरु । बाप रखुमादेविवरु |
| ५ | ।।ज्ञा.गा.०००२.०१।। | सकळ मंगळनिधी। श्रीविठ्ठलाचें नाम आधीं |
| ६ | ।।ज्ञा.गा.०००२.०२।। | म्हण कां रे म्हण कां रे साचें । श्रीविठ्ठलाचें नाम वाचें |
| ७ | ।।ज्ञा.गा.०००२.०३।। | पतितपावन साचें । श्रीविठ्ठलाचें नाम वाचें |
| ८ | ।।ज्ञा.गा.०००२.०४।। | बाप रखुमादेविवरु साचें । श्रीविठ्ठलाचें नाम वाचें |
| ९ | ।।ज्ञा.गा.०००३.०१।। | आरंभीं आवडीं आदरें आलें नाम । तेणें सकळ सिद्धि जगीं जालें पूर्ण काम |
| १० | ।।ज्ञा.गा.०००३.०२।। | रामकृष्ण गोविंद  गोपाळा । तूं माय माऊली जिवींचा जिव्हाळा |
| ११ | ।।ज्ञा.गा.०००३.०३।। | तुझियेनि नामें सकळ संदेहो फिटला । बाप रखुमादेविवरा श्रीविठ्ठला |
| १२ | ।।ज्ञा.गा.०००४.०१।। | अनुपम्य मनोहर । कांसे शोभे पितांबर । चरणीं ब्रीदाचा तोडर । देखिला देवो |
| १३ | ।।ज्ञा.गा.०००४.०२।। | योगियांचा कसवटी । दावितसे नेत्रपुटीं । उभा भीवरेच्या तटीं । देखिला देवो |
| १४ | ।।ज्ञा.गा.०००४.०३।। | बाप रखुमादेविवरु । पुंडलिका अभयकरु । परब्रह्म साहाकारु। देखिला देवो |
| १५ | ।।ज्ञा.गा.०००५.०१।। | सत्य ज्ञानानंत गगनाचें प्रावर्ण । नाहीं रूप गुण वर्ण जेथें |
| १६ | ।।ज्ञा.गा.०००५.०२।। | तो हा रे श्रीहरी पाहिला डोळेभरी । पाहते पाहणें दुरी सारोनियां |
| १७ | ।।ज्ञा.गा.०००५.०३।। | ज्ञानदेव म्हणे ज्योतीची निजज्योती । ते हे उभी मूर्ति विटेवरी |
| १८ | ।।ज्ञा.गा.०००६.०१।। | दोही देहाचे चर्म श्रवण । भक्ति उपदेश दोन श्रवण । पांचवां अगम्य श्रवण । तो गजानन आतां पूजूं |
| १९ | ।।ज्ञा.गा.०००६.०२।। | ध्यान मनन दोन्ही करा । देता बोधिता चतुष्टवरा । मंगलदायक वटेश्वरा । पूजूं आतां |
| २० | ।।ज्ञा.गा.०००६.०३।। | भजन दोंदिल विद्याधरा । सकळशुंडास्वरूपाकारा । चिदानंद दिगंबरा । पूजूं आतां |
| २१ | ।।ज्ञा.गा.०००६.०४।। | मुकुट माथां निवृत्तिसार । विद्या अभ्यासितां ज्ञानेश्वर । सकळ अभ्यासाचा नरकुंजर । पूजूं आतां |
| २२ | ।।ज्ञा.गा.०००६.०५।। | पुण्यपावन दोन्ही चरण । वैराग्य अनुष्ठान सव्य साधन । अनेक भूषणें गजानन । सार निधान पूजूं आतां |
| २३ | ।।ज्ञा.गा.०००७.०१।। | सरस्वतीचा गणाधीशा । महामतीचा पूर्ण प्रकाशा । रिद्धिसिद्धिचा जगदीशा । पूजूं आतां |
| २४ | ।।ज्ञा.गा.०००७.०२।। | नागेश वेढा चक्राकार । शेंदूर पिवळा सारंगा सार । श्रुतिगुजाचा महेश्वर । निवृत्ति पूजूं आतां |
| २५ | ।।ज्ञा.गा.०००७.०३।। | कृतांत दंता काळेश्वरा । नीळ निवृत्ति ज्ञानेश्वरा। सिद्धि विनायका आदि ईश्वरा । पूजूं आतां |
| २६ | ।।ज्ञा.गा.०००८.०१।। | मुक्तमाळा भव्यभूषणा । श्रुति नेति गजानना । तुझिया अंगीच्या नाना भूषणा । कोण वर्णी |

| | | |
|---|---|---|
| २७ | ।।ज्ञा.गा.०००८.०२।। | प्रेमळपुष्पें दुर्वांकुरना । आभासनयना अगम्य दर्शना । मुंगिमात्राचिया प्राणा । फरशधरा |
| २८ | ।।ज्ञा.गा.०००८.०३।। | सद्गुरु बोध प्रांजळा । मोदक बोध कृपाळा । गौरीनंदना घननीळा । मेघशामा |
| २९ | ।।ज्ञा.गा.०००८.०४।। | निवृत्तिगुह्याचिया महामंत्रा । ज्ञानेश्वराचा करुणाकरा । तुझिया अगोचर उपचारा । काय वर्णू |
| ३० | ।।ज्ञा.गा.०००९.०१।। | अविनाशा अक्षयीं विधि । प्रेमळाच्या साधक सिद्धि । तुझे जाणतेपण वेदीं । नेणविजे |
| ३१ | ।।ज्ञा.गा.०००९.०२।। | तूं श्रेष्ठांचें मंगलध्यान । तुझियानें पठण पुराण । तुझें नाम आम्हां पावन । तिन्ही लोकीं |
| ३२ | ।।ज्ञा.गा.०००९.०३।। | तुझियानें भक्ति मुक्ति । तुझियानें चाले स्फूर्ति । तुझें नाम त्रिजगती । पावन आम्हां |
| ३३ | ।।ज्ञा.गा.०००९.०४।। | तुझियानें आम्हां संसार। तुझियानें तारक विचार । तुझियानें हा संसार । सार जाला |
| ३४ | ।।ज्ञा.गा.०००९.०५।। | गुरुकुळस्वामिया गणपति । ज्ञानेश्वराची मंगळमूर्ति । तुझिया कृपेनें तटस्थ पावती । समाधान |
| ३५ | ।।ज्ञा.गा.००१०.०१।। | अविट अमला नभभूषणा । अनंत लोचना गजानना । पतितपावना दर्शना । योग्य तुझिया |
| ३६ | ।।ज्ञा.गा.००१०.०२।। | तोडर घंटा विविध विमळा । समाधि समाधानाच्या स्थळां । निर्विकार निर्गुण निर्मळा । सार तूंचि |
| ३७ | ।।ज्ञा.गा.००१०.०३।। | दयाळ अनाथनाथा । जंगम स्थावर गुह्य धूपा । पूर्ण व्यापक प्रकाशदीपा । ब्रह्मा तूंचि |
| ३८ | ।।ज्ञा.गा.००१०.०४।। | निवृत्तिगमनाच्या सिद्धिपंथा । ज्ञानेश्वराची उन्मनी अवस्था । तुझिया स्वरूपाची कुसुमकांता । झळको लागे |
| ३९ | ।।ज्ञा.गा.००११.०१।। | प्रथम नमूं तो गुरुदेवो । जेथें निमाले भावाभावो । अनादि स्वरूप स्वयमेवो । तो आदिदेवो नमियेला |
| ४० | ।।ज्ञा.गा.००११.०२।। | जें हें मनाचें पैं मूळ । जेथें द्वैताचा दुष्काळ । स्वरूपीं स्वरूप केवळ । तो अढळ नमियेला |
| ४१ | ।।ज्ञा.गा.००११.०३।। | हें जग जेणेंसि संचलें । परी कोठेंही नाहीं नाडलें । जेवीं हालिया अंतराळें । तैसा सर्व मेळे असतांही |
| ४२ | ।।ज्ञा.गा.००११.०४।। | ऐसा सर्वां अतीत । परी ऐसा जगभरीत । कनक कांकणीं रहात । तैसा अविकृत निरंतर |
| ४३ | ।।ज्ञा.गा.००११.०५।। | जो मनबुद्धिसी अगोचर । तोचि झाला चराचर । हा आत्मसुखाचा विचार । अपविस्तार केला जेणें |
| ४४ | ।।ज्ञा.गा.००११.०६।। | तो जाणावा ज्ञप्तिरूप । निवृत्तिनाथाचें स्वरूप । एकदंत नामें ज्ञानदीप । बोधस्वरूप ज्ञानदेवा |
| ४५ | ।।ज्ञा.गा.००१२.०१।। | गुरु हा संतकुळीचा राजा । गुरु हा प्राणविसांवा माझा । गुरुवीण देव दुजा । पाहतां नाहीं त्रिलोकीं |
| ४६ | ।।ज्ञा.गा.००१२.०२।। | गुरु हा सुखाचा सागरु । गुरु हा प्रेमाचा आगरु । गुरु हा धैर्याचा डोंगरु । कदाकाळीं डळमळीना |
| ४७ | ।।ज्ञा.गा.००१२.०३।। | गुरु वैराग्याचें मूळ । गुरु हा परब्रह्म केवळ । गुरु सोडवी तत्काळ । गांठ लिंगदेहाची |
| ४८ | ।।ज्ञा.गा.००१२.०४।। | गुरु हा साधकाशी साह्य । गुरु हा भक्तालागीं माय । गुरु हा कामधेनु गाय । भक्तांघरीं दुभतसे |
| ४९ | ।।ज्ञा.गा.००१२.०५।। | गुरु घाली ज्ञानांजन । गुरु दाखवी निजधन । गुरु सौभाग्य देऊन । साधुबोध नांदवी |
| ५० | ।।ज्ञा.गा.००१२.०६।। | गुरु मुक्तीचें मंडन । गुरु दुष्टाचें दंडन । गुरु पापाचें खंडन । नानापरी वारितसे |
| ५१ | ।।ज्ञा.गा.००१२.०७।। | काया काशी गुरु उपदेशी । तारक मंत्र दिला आम्हांशीं । बाप रखुमादेविवराशी । ध्यान मानसीं लागलें |
| ५२ | ।।ज्ञा.गा.००१३.०१।। | गुरुज्ञान नाहीं ज्यासी । तरुणोपाय नाहीं त्याशी । तो नावडे ऋषीकेशी । व्यर्थ जन्मासी तो आला |

| | | |
|---|---|---|
| ५३ | ।।ज्ञा.गा.००१३.०२।। | देव धर्म नेणें कांहीं । धरी प्रपंचाची सोई । त्या कोठेंही थारा नाहीं । हें वेद बोलिलासे |
| ५४ | ।।ज्ञा.गा.००१३.०३।। | कृष्णकथा जो नायके । रामनाम न म्हणे मुखें । तया सोस कोटी दु:खें । जन्म योनी भोगूं लागेल |
| ५५ | ।।ज्ञा.गा.००१३.०४।। | ज्ञानदेवीं अभ्यास केला । सर्व संसार हा तारिला । रामकृष्णें भवपाश तोडिला । सर्व पितरांसहित |
| ५६ | ।।ज्ञा.गा.००१४.०१।। | नित्य धर्म नामपाठ । तेचि वैकुंठींची वाट । गुरुभजनीं जो विनट । तोचि हरिभक्तु जाणावा |
| ५७ | ।।ज्ञा.गा.००१४.०२।। | धन्य धन्य त्याचा वंश । धन्य तो आला जन्मास । तयाजवळी हृषीकेश । सर्वकाळ नांदतु असें |
| ५८ | ।।ज्ञा.गा.००१४.०३।। | रामकृष्णस्मरण जप । तेंची तयाचें अमूप तप । तो वास करील कोटी कल्प । वैकुंठपीठ नगरीशी |
| ५९ | ।।ज्ञा.गा.००१४.०४।। | ज्ञानदेवीं जप केला । हरि समाधीसी साधिला । हरिमंत्रें प्रोक्षिला । सर्व संसार निर्धारें |
| ६० | ।।ज्ञा.गा.००१५.०१।। | आदिनाथें बीज सांगितलें कानीं । सोहं हे शिराणी कैवल्याची |
| ६१ | ।।ज्ञा.गा.००१५.०२।। | मच्छेंद्र, गोरक्ष पावले या सुखा । उजळिल्या आशंका ज्ञानाचिया |
| ६२ | ।।ज्ञा.गा.००१५.०३।। | निवृत्तीनें गूज स्वतंत्र ओतिलें । अपार पावले सिद्धपंथें |
| ६३ | ।।ज्ञा.गा.००१५.०४।। | सोहं या मंत्राचा वेदाचा गव्हर । म्हणे ज्ञानेश्वर राजयोगी |
| ६४ | ।।ज्ञा.गा.००१६.०१।। | चित्रीं सूर्यबिंब काढूं येईल चांग । प्रकाशाचें अंग काढितां नये |
| ६५ | ।।ज्ञा.गा.००१६.०२।। | संन्यासाचें सोंग आणूं येईल सांग । अनुभवाचें अंग दावितां नये |
| ६६ | ।।ज्ञा.गा.००१६.०३।। | ब्रह्मज्ञान मुखें बोलूं येईल सांग । वैराग्याचें अंग आणितां नये |
| ६७ | ।।ज्ञा.गा.००१६.०४।। | ज्ञानदेव म्हणे गुरुकृपा सांग । तरीच हें भाग्य येईल हातां |
| ६८ | ।।ज्ञा.गा.००१७.०१।। | बरवा वो हरि बरवा वो । गोविंद गोपाळ गुण गरुवा वो |
| ६९ | ।।ज्ञा.गा.००१७.०२।। | सांवळा वो हरि सांवळा वो । मदनमोहन कान्हो गोवळा वो |
| ७० | ।।ज्ञा.गा.००१७.०३।। | पाहातां वो हरि पाहातां वो । ध्यान लागलें या चित्ता वो |
| ७१ | ।।ज्ञा.गा.००१७.०४।। | पढिये वो हरि पढिये वो । बाप रखुमादेविवरु घडिये वो |
| ७२ | ।।ज्ञा.गा.००१८.०१।। | तुज सगुण म्हणों कीं निर्गुण रे । सगुण निर्गुण एकु गोविंदु रे |
| ७३ | ।।ज्ञा.गा.००१८.०२।। | अनुमाने ना अनुमाने ना । श्रुति नेति नेति म्हणती एकु गोविंदु रे |
| ७४ | ।।ज्ञा.गा.००१८.०३।। | तुज स्थूळ म्हणों कीं सूक्ष्म रे । स्थूळ सूक्ष्म एकु गोविंदु रे |
| ७५ | ।।ज्ञा.गा.००१८.०४।। | तुज आकारु म्हणों कीं निराकारु रे । आकारु निराकारु एकु गोविंदु रे |
| ७६ | ।।ज्ञा.गा.००१८.०५।। | तुज दृश्य म्हणों कीं अदृश्य रे । दृश्य अदृश्य एकु गोविंदु रे |
| ७७ | ।।ज्ञा.गा.००१८.०६।। | तुज व्यक्त म्हणों कीं अव्यक्त रे। व्यक्त अव्यक्त एकु गोविंदु रे |
| ७८ | ।।ज्ञा.गा.००१८.०७।। | निवृत्तिप्रसादें ज्ञानदेव बोले । बाप रखुमादेविवरु विठ्ठलु रे |

| | | |
|---|---|---|
| ७९ | ।।ज्ञा.गा.००१९.०१।। | त्रिभंगी देहुडा ठाण मांडूनिया माये । कल्पद्रुमातळीं वेणु वाजवितु आहे |
| ८० | ।।ज्ञा.गा.००१९.०२।। | गोविंदु वो माये गोपाळु वो । सबाह्य अभ्यंतरीं अवघा परमानंदु वो |
| ८१ | ।।ज्ञा.गा.००१९.०३।। | सांवळें सगुण सकळां जिवांचें जीवन । घनानंद मूर्ति पाहतां हारपलें मन |
| ८२ | ।।ज्ञा.गा.००१९.०४।। | शून्य स्थावर जंगम व्यापुनी राहिला अकळ । बाप रखुमादेविवरु विठ्ठलु सकळ |
| ८३ | ।।ज्ञा.गा.००२०.०१।। | पांडुरंगकांती दिव्य तेज झळकती । रत्नकीळा फांकती प्रभा । अगणित लावण्य तेज पुंजाळलें । न वर्णवे तेथींची शोभा |
| ८४ | ।।ज्ञा.गा.००२०.०२।। | कानडा हो विठ्ठलु कर्नाटकु । येणें मज लावियला वेधु । खोळ बुंथी घेऊनि खुणाची पालवी । आळविल्या नेदी सादु |
| ८५ | ।।ज्ञा.गा.००२०.०३।। | शब्देंविण संवादु दुजेवीण अनुवादु । हें तव कैसेंनि गमे । परेही परतें बोलणें खुंटलें । वैखरी कैसेंनि सांगें |
| ८६ | ।।ज्ञा.गा.००२०.०४।। | पाया पडूं गेलें तंव पाउलचि न दिसे । उभाचि स्वयंभु असे । समोर कीं पाठमोरा न कळे । ठकचि पडिलें कैसें |
| ८७ | ।।ज्ञा.गा.००२०.०५।। | क्षेमालागीं जीव उतावीळ माझा । म्हणवूनि स्फुरताती बाहो । क्षेम देऊं गेलें तंव मीचि मी एकली । आसावला जीव राहो |
| ८८ | ।।ज्ञा.गा.००२०.०६।। | बाप रखुमादेविवरु हृदयींचा जाणुनी । अनुभवु सौरसु केला । दृष्टीचा डोळां पाहों मी गेलीये । तंव भीतरीं पालटु झाला |
| ८९ | ।।ज्ञा.गा.००२१.०१।। | चिदानंद रूप चेतवितें एक । एकपणें गुणागुणीं दावी अनेक |
| ९० | ।।ज्ञा.गा.००२१.०२।। | आदीं अंतीं गुण सर्वत्र निर्गुण । गुणासी अगुण भासती ना |
| ९१ | ।।ज्ञा.गा.००२१.०३।। | कैसें जालें अरूपीं गुणीं गुणवृत्ति । सगुण पाहतां अंतरलें गती |
| ९२ | ।।ज्ञा.गा.००२१.०४।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलु नंदानंदु । आदिअंतु एकु पूर्ण सनातनु गे माये |
| ९३ | ।।ज्ञा.गा.००२२.०१।। | तुरे कांबळा डांगेवरी विषाण वेणु घेऊनि करीं । वैजयंती रुळे कैशी वक्षस्थळावरी |
| ९४ | ।।ज्ञा.गा.००२२.०२।। | गोविंदु वो पैल गोपाळु माये । सुरतरु तळवटीं देखे कैसा उभा राहे |
| ९५ | ।।ज्ञा.गा.००२२.०३।। | आडत्रिपुंड्र शोभत द्रुमिळ भारेंसि जात । नागर केशरीचीं पुष्पें कैसी पैं मिरवत |
| ९६ | ।।ज्ञा.गा.००२२.०४।। | हिरिया ऐशा दंतपंक्ति अधर पोंवळ वेली । श्रवणींचीं  कुंडलें ब्रह्मरसाचीं वोतलीं |
| ९७ | ।।ज्ञा.गा.००२२.०५।। | विश्वाचें जीवन तें म्यां सार देखियेलें । योगी ध्याती ध्यानीं ब्रह्म तेंचि गोकुळासी आलें |
| ९८ | ।।ज्ञा.गा.००२२.०६।। | आजि धन्य धन्य जालें राया कृष्णासी देखिलें । निवृत्तिमुनिरायप्रसादें ध्यान तें हृदयासी आलें |
| ९९ | ।।ज्ञा.गा.००२३.०१।। | सुंदर सुरेख वोतिलें । परब्रह्म तेज फांकलें । तें व्योमीं व्योम सामावलें । नयनीं वो माय |
| १०० | ।।ज्ञा.गा.००२३.०२।। | कमलनयन सुमन फांकलें । त्या परिमळा आथिलें । मकरंदीं वो माय |
| १०१ | ।।ज्ञा.गा.००२३.०३।। | संकोचला संसार । पारुषला व्यवहार । ब्रह्मानंद अपार । जहाला वो माय |
| १०२ | ।।ज्ञा.गा.००२३.०४।। | मधुर वेदवाणी । न पवे ज्याच्या गुणीं । तें ठकावलें निर्वाणीं । नेति मुखें वो माय |
| १०३ | ।।ज्ञा.गा.००२३.०५।। | यापरतें बोलणें । न बोलणें होणें । तें म्यां आपुल्या अंगवणें । केलें वो माय |
| १०४ | ।।ज्ञा.गा.००२३.०६।। | ऐसियातें वोठी । लागलें तयाचे पाठीं । रखुमादेविवरा भेटी । विठ्ठलीं वो माय |

| | | |
|---|---|---|
| १०५ | ।।ज्ञा.गा.००२४.०१।। | देवो आहे जैसा तैसा नेणवे सहसा । भांबावला कैसा विश्वजनु । तया रूप ना रेखा लय ना लक्षण । ते प्रतिमेसी आणून वासनारूपें |
| १०६ | ।।ज्ञा.गा.००२४.०२।। | देव सर्वगत निराळा अद्वैत । तया मूर्तिमंत ध्याईजेतु । तिहीं देवासी आकारु जेथुनी विस्तारु । तो ध्वनि ओंकारु त्या आरुता । तेथें नाद ना बिंदु कळा ना छंदु । अक्षय परमानंदु सदोदितु |
| १०७ | ।।ज्ञा.गा.००२४.०३।। | अवतरे तैसाच नव्हे होय तें न संभवे । आहे हें आघवें लाघव रया । तो एकवट एकला रचला ना वेचला । आदिअंतीं संचला अनंतपणें । पृथ्वी आप तेज वायु आकाश । ही सकळही हारपती प्रळयांतीं । तीं निरशून्य निरूपम निरंजन निर्वाण । ते दशा पाषाण केवीं पावती |
| १०८ | ।।ज्ञा.गा.००२४.०४।। | पाहतां या डोळां न दिसे कांहीं केल्या । व्यापूनियां ठेला बाहिजु भीतरीं । तो पदपिंडा अतीतु भावाभावविरहितु । बाप रखुमादेविवरु विठ्ठलु हृदयांआतु रया |
| १०९ | ।।ज्ञा.गा.००२५.०१।। | पैल सुखाचेनि माये सुकाळु । नवल पाहिजे हा गोपाळु । म्हणोनि योग याग तप साधन । व्रत दान उद्यापन । पंचाग्नी गोरांजन अनुष्ठान । परी पद निर्वाण न कळे हें |
| ११० | ।।ज्ञा.गा.००२५.०२।। | तुझ्या नामाचेनि आनंदें । गातांवातां जोडसी विनोदें रया |
| १११ | ।।ज्ञा.गा.००२५.०३।। | या गोंवळेनि जग । न दिसे जगपण भाग । पाहें पां सकळीं योग । तुझा तूंचि |
| ११२ | ।।ज्ञा.गा.००२५.०४।। | अर्थूनि पाहे दृष्टी । तंव तुझ्यापायीं पडे मिठी । आवडी नोसंडी गांठी । तुझिया पायांची |
| ११३ | ।।ज्ञा.गा.००२५.०५।। | आतां जरी निरुतें । तूंचि आत्मा तूंतें । सुखी सुखाचेनि निजप्राप्ति रया |
| ११४ | ।।ज्ञा.गा.००२५.०६।। | तुझें स्वरूप अदृश्य । तो मुनिमानसींचा प्रकाश । इंदु तूं पूर्णांश । चैतन्यघन |
| ११५ | ।।ज्ञा.गा.००२५.०७।। | बाप रखुमादेविवरा । विठ्ठला पाहतां उघडा डोळा । दाविलें निधान रया |
| ११६ | ।।ज्ञा.गा.००२६.०१।। | लाउनी मनगणीची दोरी । विपरीत तयाची कुसरी । अकळु न कळे श्रीहरि । अवघड ओडंबर तुझें |
| ११७ | ।।ज्ञा.गा.००२६.०२।। | अष्टदळकमळाची वोवरी। विपरीत तयाची कुसरी । एकवीस खणांचे उपरी। बाहिजु कां हरि दाखविली |
| ११८ | ।।ज्ञा.गा.००२६.०३।। | तेथें रात्रीं दिवस नेणिजे। सोहं प्रकाश सहजे। नाचविसी पंचभूतें वोजें। कवतुक तुझें तूं पाहसी |
| ११९ | ।।ज्ञा.गा.००२६.०४।। | भानु निसियेचा कुवासा। येक राहिलें याचिया आशा। येक म्हणती अढळ धुरु कैसा। तयाचा भरंवसा त्यांसी नाहीं |
| १२० | ।।ज्ञा.गा.००२६.०५।। | ऐसी तयाची बोलणीं। अंगीं राहिली खेळणीं। साही पाठवणी करुनी। सातावरि घातु मांडिला |
| १२१ | ।।ज्ञा.गा.००२६.०६।। | करीं घेऊनि आळवणी। करूं नेणें वोवाळणी। बाप रखुमादेविवरा विठ्ठला चरणीं। चौघी जणी निमालिया |
| १२२ | ।।ज्ञा.गा.००२७.०१।। | एकांतीं बाळा। कीं सोहंसुखशयन वेळा। पाहे चरणकमळा। सुंदराचें। तेथें अरुण उदेला। कीं सुमनीं प्रगटला। कमळणी जाला। अंतरीं विकासु। तें चरणकमळ केवळ। भक्ता आळिउळ। सेविती सकळ। योगिजन। तेणें तृप्त जालें। कीं हृदयीं वोसंडलें। म्हणोनि वाहावलें। ज्ञानडोहीं। तेचि ते परमानंद गे माय |

| | | |
|---|---|---|
| १२३ | ।।ज्ञा.गा.००२७.०२।। | न संगवे माय परा पारुषली। दोंदिल दृष्टि जाली देखणेपणें। मनाचा अंकुर उगमींच मुराला। तो कृष्णचि होऊनि ठेला अनुभविया |
| १२४ | ।।ज्ञा.गा.००२७.०३।। | तये पदांघ्रीचे रज। तेणें तृप्ति वो सहज। वरी त्रिवेणी ऊर्ध्ववज्र। मज पाहतां। तंव ते रेखा। वरी सखोल देखा। त्यावरी वोळलें । पियूषपाणी। तियेचेनि मार्गे। उद्धरणें जगें। म्हणोनि संतसंगे। तया सोई। ते दोहों भागीं। विस्तारलें जगीं। म्हणोनि तया भागीं। चरणांगुष्ठ। दृष्टीचा डोळा। न निवडेच बाळा। तेथें जाला एकवळा। मुनिजनां गे माये |
| १२५ | ।।ज्ञा.गा.००२७.०४।। | तेथें बिंबलीं नखें। कीं विवळणी विशेखें। काळेपणाचेनि द्वेषें। वाहावलीं पुढां। उगमीं न संचलें । कीं वियोगें वाहावले। पुनरपि जडले। कृष्णपदीं। गंगा अंगुष्ठधार। कीं वांकीचा बडिवार। तेथें सप्तही स्वर। उमटताती। स्वरूपीं रमली। म्हणोनि अधोमुख जाली। शोभती घाघुरली। पायीं प्रभावळी गे माये |
| १२६ | ।।ज्ञा.गा.००२७.०५।। | तंव तें निजानंद भरितें। नेणती आणिकांतें। विसरली आपणातें। हास्यवदनें। म्हणती नेति नेति गर्जना। कीं माणिका खेवणा। घोट्या अनुमाना । बाळसूर्यो। पोटरिया निवाळा। कीं उभलिया सरळा। जानुद्वय सोज्वळा। उच्च स्तंभ। उंच युगळ कटीं। माज सामावे मुष्टीं। सोहंभाव समदृष्टि। दोहीं भागीं गे माये |
| १२७ | ।।ज्ञा.गा.००२७.०६।। | वरि वेढिला पिंवळा। कीं मिरवे सोनसळा। कीं कल्पतरु फुलला। नाभिस्थानीं। तेथें वेधु गोपिबाळा। कीं अंतरीं सांवळा। पालवी मेखळा। अभिळाखिया। तेथें मदनु गूढपणें। रतिशयें रमणें। दुजे अनुभऊ अनुभवणें। न निवडे कहीं। सखोल नाभिमंडळ। तें ब्रह्मस्थान केवळ। कैसें पाहले विवळ। तेथें जगामाजीं गे माये |
| १२८ | ।।ज्ञा.गा.००२७.०७।। | रोमराजवेळा। कीं वेणी एकवळा। दावी निराळा। उदरामध्यें। हृदय निर्मळ। तेथें ध्येय ध्यान केवळ। वरी चरणकमळ। द्विजोत्तम। वैजयंती माळा। शोभतसे गळां। उभलेनि वक्षस्थळा। उभारली। सरळ बाहुदंड। न कळे कानवड। अंगोळिया धडफुड। खुणा दावितो गे माये |
| १२९ | ।।ज्ञा.गा.००२७.०८।। | ऐशा खुणा दावितसे एका। तंव दावी अनेकां। अंगोळिया देखा। दशावतारी। नखांची मांडणी। तेथें तेज तारांगणीं। होत असे प्रवणीं। तिमिर द्वैत। शुक्लपक्ष। कीं अंतरीं लक्ष। सारूनियां साक्ष। दृशादि सर्वी। एकाएकीं संचरे। कीं माजिघरीं दुसरें । स्वयें येसरे। नवल चोज गे माये |
| १३० | ।।ज्ञा.गा.००२७.०९।। | तेथ सानुसानु स्वर। दोहिलें अंबर। हास्यवदन सुंदर। पावया छंदें । निमासुरा नेटका। न कळे ब्रह्मादिकां । वेधुनी गोपिका। मोहियलें जग। समदृष्टी नासापुटीं। नेत्रद्वय निघाले भेटी। रविशशी कोटी। लोपले तेथें। मना मारुनी मेळा। कीं कुंडलें शोभे किळा। तेथें जाला एकवळा। योगिजनां गे माये |
| १३१ | ।।ज्ञा.गा.००२७.१०।। | व्योमींचा मणी। तया तळीं सहस्रफणी। तो लाधला निर्वाणीं। आराधितां। शेष वर्णितां श्रमला। म्हणोनि शरण आला। शयन होऊनि ठेला। तया तळीं। ऐसी सुमन सेजा। कीं मवाळपण बरविया वोजा। तेथें रातली रमा भाजा। न निवडे केही। ऐसा झाला एकवळा। शेष म्हणे दैव आलें फळा। आतां पाहेन सुनिळा। काय सेजेमाजीं |

| | | |
|---|---|---|
| १३२ | ।।ज्ञा.गा.००२७.११।। | ऐसयाचें ध्यान। जरी हें न करी मन। तरीच पतन । जन्ममरण। चिंता सारी फेडी। कीं उभारूनियां गुढी। स्वयें सुखाचिया आवडी। कां सांडितोसी। आतां करूं पाहे ध्यान। तरी सहजचि उन्मन। म्हणोनि समाधान। होय जीवा। तीर्थ व्रत तप दान । जरी न करी हें मन। तरी सहजचि साधन। गोपिनाथु |
| १३३ | ।।ज्ञा.गा.००२७.१२।। | तीर्थां जातां सायासीं। तूं काय एक देसी। म्हणोनि स्तविलासी। बहुतांपरी। तंव परा पश्यंती मध्यमा वैखरी। या युक्ति न बोलवेसी। निवृत्ति म्हणें लीळा। विश्वव्यापक निराळा। पाहे उघडा डोळां। परब्रह्म। ज्ञानदेवा मीपणीं। निवृत्ति ऐक्य चरणीं। सरो दुजेपणीं। हांव जीवा |
| १३४ | ।।ज्ञा.गा.००२८.०१।। | नभ नभाचेनि सळे। क्षोभु वाहिजे काळिंदीजळें। सासिन्नले जगाचे डोळे। तें रूप पाहावया। भलतैसी हांव। मना न पुरे तेथींची थाव। लावण्यसिंधु शीव। सांडुनी जातो गे माये |
| १३५ | ।।ज्ञा.गा.००२८.०२।। | सुलभ गे माये परमात्मा। मन मुरोनी देखणेपणा उरी। याचि कारणें उभा भिवरेतीरीं। अनुपम्य जयाची थोरी गे माये |
| १३६ | ।।ज्ञा.गा.००२८.०३।। | काळिंदी जळाचा भोंवरा। कीं माजीं वेढूनि इंदिरावरा। माळ बांधोनियां मधुकरा। मधें रोमामाजी |
| १३७ | ।।ज्ञा.गा.००२८.०४।। | सकल सिद्धींचा मेळा। तेवीं विभूति शोभे भाळा। मुगुटीं रत्नकिळा। लिंग अनुपम्य गे माये |
| १३८ | ।।ज्ञा.गा.००२८.०५।। | क्षीरसागरीचें निवांत सुख। असो हें निमासुरें मुख। श्रियेचें मनोहर देख। टवकारलें दो भागीं। पहावया उरूंची शोभा। सकळ तेजाची प्रभा। तेथें तारांगणें कैची नभा। लेइला गे माये |
| १३९ | ।।ज्ञा.गा.००२८.०६।। | कटावरी ठेवूनि हात। जनां दावी संकेत। भवजलाब्धीचा अंत। इतुलाची। सम चरणींच्या खुणा। उभा पंढरीचा राणा। तो आवडे जनांमना। दुर्लभ गे माये |
| १४० | ।।ज्ञा.गा.००२८.०७।। | कैवल्याचा गाभा। कीं ब्रह्मविद्येचा वालभा। निकटपणाचिया लोभा। कैसा उभा असे। देव पायींची वीट। तेचि माये नीट। वरी येऊनि भीमातट। वोळग दावी गे माये |
| १४१ | ।।ज्ञा.गा.००२८.०८।। | नेति नेतिचेनि विचारें। उभऊनियां श्रीकराकरें। शृंगाराचेनि पडिभरें। चराचरें वोळगती। हा मेखळेचा मध्यमणि। उदो केला ग्रहगणीं। मध्य नायकु तरणीं किरणीं। विराजितु गे माये |
| १४२ | ।।ज्ञा.गा.००२८.०९।। | आमुची हृदयींची श्रीमूर्ति। घेऊनि विठ्ठलवेषाची बुंथी। आतां चाळविसी किती। बापा पालटु नेघे। बाप रखुमादेविवरा विठ्ठला। त्वां मजसीं कां अबोला धरिला। जीवीं जीव आहे उरला। तो निघों पाहे |
| १४३ | ।।ज्ञा.गा.००२९.०१।। | वेद प्रमाण करावया गोकुळासी आला। कीं नाटळीचा कुवांसा जाला। ब्रह्म आणि गोवळु। ब्रह्मादिकां वंद्यु। ऐसा निगमु पैं लाजविला। गणिका स्वीकारी राहो मांडला। दशरथ पतनीं चुकविला। एकातें म्हणे जागा। एकातें म्हणे रे निजा। तैसा मुचकुंदा पैं काळयवनु आणिला रया |
| १४४ | ।।ज्ञा.गा.००२९.०२।। | विरोचनसुत। बळी बांधोनि जेणें। निगड निबद्ध गजा सोडविलें। एकाचीं बालकें काळापासूनियां हिरे। एका बाळाचे बाप विदारिले। शिशुपाळासी जैत देऊनियां शेखीं पाहे पां आपणचि जिंकिलें रया |

| | | |
|---|---|---|
| १४५ | ।।ज्ञा.गा.००२९.०३।। | गुरु दुर्वास याचिये भक्ति आणि त्याचियेचि रथीं। देविरुख्मिणीसहित खांदु चालविला। तो तेणें मानें फुंदो पाहे तंव कोलतिया भेणें त्रैलोक्य हिंडविला। हें पैज सारूनि हातीं सुदर्शन वसविलें कीं भीष्मपण साचू केला। जितुकाचि कौरवां तितुकाची पांडवां अचोज हा अंबुला रया |
| १४६ | ।।ज्ञा.गा.००२९.०४।। | जमदग्नी जनकाचा बोल भूमीं न पडावा। हा ठावो वरी पितृभक्तिची आवडी। जेणें साचपणा कारणें माता वधिली। कीं पुराणें खोंचिलीं तोंडीं। असुरदैत्य संहारितां बापु तयांची पातकें दवडी। प्रजासी रायाची आण रायासी कवण नेमु हे तो संतपणाची प्रौढी रया |
| १४७ | ।।ज्ञा.गा.००२९.०५।। | या परी चराचरींचे दानव गिंवसूनि पुसिले परोपरी। तंव यादवांसि अंबुलेपणाची आस जाली थोरी। प्रभास क्षेत्रीं अवघियातें केली एकसरी। देवकी पुतना नोळखिजे वैरभक्तिसी एकिची वोवरी। पवनु काय पंथु शोधूनियां चाले समर्थु करील तें उजरी रया |
| १४८ | ।।ज्ञा.गा.००२९.०६।। | या गोविंदाची माव। हे तों ब्रह्मादिकांसी कुवाडें । तो हा मायेचेनि साचपणें न घेपवे। प्रकृतीचे गुण ते याचिये गांवींचे तो करील तें अनुचित बरवें। लाघवियाचे भ्रमु लाघवीच जाणें यासी कांहीं नवल नव्हे। बाप रखुमादेविवरु जाणितला तरी उकलेल हें आघवें रया |
| १४९ | ।।ज्ञा.गा.००३०.०१।। | साति बारी दोन्ही आपणचि होउनी। सुरतरुमाझारीं ओळगे। तळीं त्रिभंगी मांडूनि ठाण घेऊनि मेघाचें मान। विजु एकी वेढून बरवें गर्जतु गे माये |
| १५० | ।।ज्ञा.गा.००३०.०२।। | नवलावो गे माये न्याहाळितां कैसे मनाचे नयन उमळताती। तीही एक दृष्टि जिव्हा लाभती तरी सुलभु देखतां बोलती गे माये |
| १५१ | ।।ज्ञा.गा.००३०.०३।। | पाहों याचें पाय। शंभूचिया माथां माये। सासिन्नली चंद्रदाहें गंगेतें। तेथ असुरांची शिरें। येथ सकळ शरीरें। तोडराचेनि बडिवारें। गर्जतु गे माये |
| १५२ | ।।ज्ञा.गा.००३०.०४।। | तेज सांवळें। रूप लाधलें परिमळें। अनंगाचेनि सळें। कासें कासियेला। तो पालऊ पांढर गळे। होतु कां जगाचे डोळे। दुरूनियां सुनिळें रोविलें गे माये |
| १५३ | ।।ज्ञा.गा.००३०.०५।। | उपनिषदाचा गाभा। माजीं सौंदर्याची शोभा। मांडिला दो खांबा। तैसा दिसे देखा। वेगळालिया कुंभस्थळा। परी हातु सरळा। पालटु बांधिला माळा। मेखळामिसें गे माये |
| १५४ | ।।ज्ञा.गा.००३०.०६।। | भलतेउती वाहे न वाहे नदी। जेवीं स्थिरावे अगाधीं। तैसी पुंजाळता हे मांदी। दोंदी वेदांची। वरिलिया वक्षस्थळा। नुपुरे स्थानीचा डोळा। मागू न निघे कमळा। नव्हे रोमराजी |
| १५५ | ।।ज्ञा.गा.००३०.०७।। | लावण्य उदधी वेळा। तेंचि पैं वैजयंती माळा। वरी शोभतसे सोहळा। साकारवेचा। म्हणो प्रेम पुष्कळां। थडिये लाभे सकळां। नयनसुखाच्या सुकाळा। जग मेळवितु गे माये |
| १५६ | ।।ज्ञा.गा.००३०.०८।। | भोंवतीं तारांगणें पुंजु। माजीं अचळ सुरिजु। आला वक्षस्थळा उजु। कैसा दिसे देखा। जेवणेंनि अंगें उभऊनि श्रीकरायोगें। योगनादातटीं रंगें। नभु दुमदुमित वो माये |

| | | |
|---|---|---|
| १५७ | ।।ज्ञा.गा.००३०.०९।। | इंद्रधनुष्य काढिलें। तया तळीं बहुडलें। तेंचि कुरळी वेढिले। समाधिसुख देखा। आधरीचा गुणु। श्रुतींगर्भी समवर्णु दोही स्वरीं गोडी वेणु। जग निववीतु वो माये |
| १५८ | ।।ज्ञा.गा.००३०.१०।। | या वेधितां कांहींच नुरे। रूपा आलें हेंचि खरें। वरी दावितां हें माजिरें। गोपवेशाचें। तमावरी हातियेरे। रविकाज काईये रे। तैसा रखुमादेविवरें। वीरें घेतलें गे माये |
| १५९ | ।।ज्ञा.गा.००३१.०१।। | मदनमूर्ति विश्वीं अळंकारली। ते डोळ्यां असुमाया जाली। पाहतां मनाची वृत्ति नपुरे तेथींची सोय। तेथें भरोनी वोसंडली गे माये |
| १६० | ।।ज्ञा.गा.००३१.०२।। | अभिनव रूप कैसें मना अगोचर अरूप रूपासी आलें। तें हें कल्पद्रुमातळीं ठाण मांडूनि देहुडें। तेणें आनंदघनें निववीलें गे माये |
| १६१ | ।।ज्ञा.गा.००३१.०३।। | चिदानंदाची मांदुस किंचिद्घन चिदाकाश। तेज:पुंज प्रकाश चरणीं शोभा। निडारलें दृष्टी पाहतां रूपाचा एकवळा। कैसा साकार सोहळा भोगीतसे गे माये |
| १६२ | ।।ज्ञा.गा.००३१.०४।। | सकळ तीर्थे आर्तलीं। तीं ऋषिवृंदें घेऊनि बैसली । पावन झालीं चरणांगुष्टीं। वाकी तोडरु गजरीं। गर्जतुसे नानापरी। तो श्रुतिनादु अंबरीं। सांठवला गे माये |
| १६३ | ।।ज्ञा.गा.००३१.०५।। | उपनिषदांचा गाभा। परी हा देहुडा पाउलीं उभा। जानुजघनींच्या प्रभा। नभ धवळलें। सुरंग सोनसळा। वरी वेढिला पिंवळा। त्यावरी गाढियला मेखळा। रत्नखचित गे माये |
| १६४ | ।।ज्ञा.गा.००३१.०६।। | हा जगडंबरु जगदाभासु। कीं ठसावला आभासु। नाभिकमळीं प्रकाशु। चतुरानना। पाहतां तेथींची हाव। मना न पुरे तेथींची धांव। म्हणउनी सगुण ध्यान। करितुसे गे माये |
| १६५ | ।।ज्ञा.गा.००३१.०७।। | ब्रह्मांडाचिया कोडी। रोमरंध्रीं उतरडी। मदन सांडूनियां प्रौढी। उदरा आला। सुघटित वक्षस्थळ। निरोपम केवळ। वरी पदयुगुळ। द्विजोत्तम गे माये |
| १६६ | ।।ज्ञा.गा.००३१.०८।। | चहूं पुरुषार्थांचें साधन। तेंचि आयुधें मंडन। बाहीं बाहुवटे मंडण। मंडण जालें। वीर कंकण मनगटीं। कांडोकांडीं मुद्रा दाटी। कैसा अलोहित नखें बोटीं। वेणु वाहे वो माये |
| १६७ | ।।ज्ञा.गा.००३१.०९।। | ब्रह्मरसें घनु आतला। कीं सुधारसु मुराला। तोचि नादु सुस्वर आला। पावया छंदें। अधरींचें अमृत। पिकलेंसे ब्रह्मरसु। तेणें जाला सौरसु। गोपिजनां गे माये |
| १६८ | ।।ज्ञा.गा.००३१.१०।। | नयनींचे तारे। दो पक्षीं प्रेम पुरे। द्वैताद्वैत एकसरे। ठकलें ठेलें। कुंडलाचिये दीप्तीं। लोपला गभस्ती। सुखस्वरूपाची शांती। येणें सुखें गे माये |
| १६९ | ।।ज्ञा.गा.००३१.११।। | आतां पाहतां पाहतया दृष्टी नपुरे। ध्यातां तरी मनचि नुरे। आंत बाहेरी पुरे। व्यापूनि ठेलें। मावळलिया दृष्टि पाहतां देखणें ठसावले। निर्गुण गुणासी आलें सदोदित गे माये |
| १७० | ।।ज्ञा.गा.००३१.१२।। | आतां हा केवीं पाहावा पाहतयेचि दृष्टि। मन मनेंचि दिधली मिठी। तेथील ते गोडी रूपा आली म्हणे निवृत्ति। ज्ञानदेवा पाहे चित्तीं। आतां जागृतीच्या अंतीं। सुखशांती रया |

| | | |
|---|---|---|
| १७१ | ।।ज्ञा.गा.००३२.०१।। | ब्रह्मादिकां आठकु तो। शिवध्यान ध्यानकु तो गे बाई |
| १७२ | ।।ज्ञा.गा.००३२.०२।। | गौरी जाप्य सहस्रनामीं तो। पुण्यपावन त्रैलोक्य तो गे बाई |
| १७३ | ।।ज्ञा.गा.००३२.०३।। | रखुमादेविवरु तो। सहजपूर्ण बोधु तो गे बाई |
| १७४ | ।।ज्ञा.गा.००३३.०१।। | सर्वादि सर्वसाक्षी तो। विश्वंभर खल्विद तो गे बाई |
| १७५ | ।।ज्ञा.गा.००३३.०२।। | आनंदा आनंदु तो। प्रबोधा प्रबोध तो गे बाई |
| १७६ | ।।ज्ञा.गा.००३३.०३।। | रखुमादेविवरु तो। विटेवरी उभा तो गे बाई |
| १७७ | ।।ज्ञा.गा.००३४.०१।। | श्रुतिस्मृति वचन तो। गुह्यागुह्य तो गे बाई |
| १७८ | ।।ज्ञा.गा.००३४.०२।। | जागता निजता तो। निज चेवविता तो गे बाई |
| १७९ | ।।ज्ञा.गा.००३४.०३।। | परात्परा तो । रखुमादेविवरु तो गे बाई |
| १८० | ।।ज्ञा.गा.००३५.०१।। | निजगुजा गुज तो। मोहना मोहन तो गे बाई |
| १८१ | ।।ज्ञा.गा.००३५.०२।। | बोधाबोध बोधविता तो। द्वैताद्वैत अद्वैत तो गे बाई |
| १८२ | ।।ज्ञा.गा.००३५.०३।। | रखुमादेविवरु तो। सर्वादि सर्वेश्वरू तो गे बाई |
| १८३ | ।।ज्ञा.गा.००३६.०१।। | जरासंदुमल्लमर्दनु तो। गजपित्राहटणु तो गे बाई |
| १८४ | ।।ज्ञा.गा.००३६.०२।। | कुब्जकपान तो। सुदाम्या अनुसंधान तो गे बाई |
| १८५ | ।।ज्ञा.गा.००३६.०३।। | रखुमादेविवरु तो। कंसचाणुरमर्दन तो गे बाई |
| १८६ | ।।ज्ञा.गा.००३७.०१।। | कांहीं नव्हे तो। मूर्ताऽमूर्त तो गे बाई |
| १८७ | ।।ज्ञा.गा.००३७.०२।। | सहजा सहज तो। सहज सुखनिधान तो गे बाई |
| १८८ | ।।ज्ञा.गा.००३७.०३।। | रखुमादेविवरु तो। पुंडलीकवरद तो गे बाई |
| १८९ | ।।ज्ञा.गा.००३८.०१।। | निज ब्रह्मा ब्रह्म तो। ब्रह्मादिकां वंद्य तो गे बाई |
| १९० | ।।ज्ञा.गा.००३८.०२।। | अचिंतचिंतन तो। सारासार गुह्य तो गे बाई |
| १९१ | ।।ज्ञा.गा.००३८.०३।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलु तो। जनीं वनीं कृपाळु तो गे बाई |
| १९२ | ।।ज्ञा.गा.००३९.०१।। | सारंगधरु तो। चक्रा आधारु हरि तो गे बाई |
| १९३ | ।।ज्ञा.गा.००३९.०२।। | सुलभा सुलभु तो। आटकु नटके तो गे बाई |
| १९४ | ।।ज्ञा.गा.००३९.०३।। | रखुमादेविवरु तो। द्वैताद्वैतातीत तो गे बाई |
| १९५ | ।।ज्ञा.गा.००४०.०१।। | विश्व भुलवी योगमाया तो। गोकुळीं रहिवासु तो गे बाई |
| १९६ | ।।ज्ञा.गा.००४०.०२।। | वसुदेवकुमरु तो। देवकीनंदनु तो गे बाई |

| | | |
|---|---|---|
| १९७ | ।।ज्ञा.गा.००४०.०३।। | रखुमादेविवरु तो। शुकादिकां चिंतन तो गे बाई |
| १९८ | ।।ज्ञा.गा.००४१.०१।। | पैल गोल्हाटमंडळ तो। त्रिकुटा वेगळा तो गे बाई |
| १९९ | ।।ज्ञा.गा.००४१.०२।। | सहजबोधीं अनुभव तो। परमतत्त्वीं अनुराग तो गे बाई |
| २०० | ।।ज्ञा.गा.००४१.०३।। | रखुमादेविवरु तो। ब्रह्म विटेवरी तो गे बाई |
| २०१ | ।।ज्ञा.गा.००४२.०१।। | राम बरवा कृष्ण बरवा। सुंदर बरवा बाइयांनों |
| २०२ | ।।ज्ञा.गा.००४२.०२।। | केशव बरवा माधव बरवा। गोपाळ बरवा बाइयांनों |
| २०३ | ।।ज्ञा.गा.००४२.०३।। | बापरखुमादेविवरु त्रिभुवनीं गरुवा। विठ्ठलु बरवा बाइयांनों |
| २०४ | ।।ज्ञा.गा.००४३.०१।। | आतसिकुसुमकोशशामघनु। तुळशीवृंदावनामाजीं। मुनीमनोपद्मदळविशाळजी रे आयो |
| २०५ | ।।ज्ञा.गा.००४३.०२।। | जलधिशयनकमलायजीवनु। बापरखुमादेविवरु विठ्ठलु घनानंदुमूर्ति |
| २०६ | ।।ज्ञा.गा.००४४.०१।। | ज्याचें गुणनाम आठवितां मनचि नाहीं होय। अनुभवाचे पाय पुढें चालती |
| २०७ | ।।ज्ञा.गा.००४४.०२।। | निर्गुण गे माय गुणवंत जाला। प्रतिबिंबीं बिंबतसे चैतन्याचे मुसें । प्रति ठसावत तें वृंदावनीं। ब्रह्म असे गे माये |
| २०८ | ।।ज्ञा.गा.००४४.०३।। | बाप रखुमादेविवरु डोळसु सांवळा। द्वैत अद्वैत सोहळा भोगवी गे माये |
| २०९ | ।।ज्ञा.गा.००४५.०१।। | ऐसा अवतार नरहरि स्तंभामाझारीं। भक्तां परोपरी धरी रूपें |
| २१० | ।।ज्ञा.गा.००४५.०२।। | धरूनियां महत्त्व झाला नृसिंहरूप। वेदशास्त्रांसी अमूर्त मूर्तीस आला |
| २११ | ।।ज्ञा.गा.००४५.०३।। | बाप रखुमादेविवरु नरहरी अवतारु। वर्ण शारङ्गधरु निजरूप |
| २१२ | ।।ज्ञा.गा.००४६.०१।। | दोहीं बाही संतांची सभा। सिंहासनीं उभा श्रीविठ्ठल |
| २१३ | ।।ज्ञा.गा.००४६.०२।। | गाती नारद तुंबर प्रेमें। हरीचीं नामें गर्जती |
| २१४ | ।।ज्ञा.गा.००४६.०३।। | बापरखुमादेविवरु विठ्ठलु उभा। त्रैलोक्याची शोभा शोभतसे |
| २१५ | ।।ज्ञा.गा.००४७.०१।। | आजि देखिलें रे आजि देखिलें रे |
| २१६ | ।।ज्ञा.गा.००४७.०२।। | सबाह्य अभ्यंतरीं। अवघा व्यापकु मुरारी |
| २१७ | ।।ज्ञा.गा.००४७.०३।। | दृढ विटें मन मुळीं। विराजित वनमाळी |
| २१८ | ।।ज्ञा.गा.००४७.०४।। | आजि सोनियाचा दिनु। वरी अमृतातें वरिषे घनु |
| २१९ | ।।ज्ञा.गा.००४७.०५।। | बरवा संतसमागमु। प्रगटला आत्मारामु |
| २२० | ।।ज्ञा.गा.००४७.०६।। | बाप रखुमादेविवरु। कृपासिंधु करुणाकरु |
| २२१ | ।।ज्ञा.गा.००४८.०१।। | देवाचिया द्वारीं उभा क्षणभरी। तेणें मुक्ति चारी साधियेल्या |
| २२२ | ।।ज्ञा.गा.००४८.०२।। | हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा। पुण्याची गणना कोण करी |

| | | |
|---|---|---|
| २२३ | ।।ज्ञा.गा.००४८.०३।। | असोनी संसारीं जिव्हे वेगु करी। वेदशास्त्र उभारी बाह्या सदा |
| २२४ | ।।ज्ञा.गा.००४८.०४।। | ज्ञानदेव म्हणे व्यासाचिये खुणें। द्वारकेचे राणे पांडवां घरीं |
| २२५ | ।।ज्ञा.गा.००४९.०१।। | चहू वेदीं जाण साही शास्त्रीं कारण। अठराही पुराणें हरिसी गाती |
| २२६ | ।।ज्ञा.गा.००४९.०२।। | मंथुनि नवनीता तैसें घे अनंता। वायां व्यर्थ कथा सांडीं मार्गु |
| २२७ | ।।ज्ञा.गा.००४९.०३।। | एक हरि आत्मा जीवशिवसमा। वायां तूं दुर्गमा न घालीं मन |
| २२८ | ।।ज्ञा.गा.००४९.०४।। | ज्ञानदेवा पाठ हरि हा वैकुंठ । भरला घनदाट हरि दिसे |
| २२९ | ।।ज्ञा.गा.००५०.०१।। | त्रिगुण असार निर्गुण हें सार। सारासार विचार हरिपाठ |
| २३० | ।।ज्ञा.गा.००५०.०२।। | सगुण निर्गुण गुणाचें अगुण। हरिवीण मन व्यर्थ जाय |
| २३१ | ।।ज्ञा.गा.००५०.०३।। | अव्यक्त निराकार नाहीं त्या आकार। जेथोनि चराचर हरिसी भजे |
| २३२ | ।।ज्ञा.गा.००५०.०४।। | ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण मनीं। अनंत जन्मोनी पुण्य होय |
| २३३ | ।।ज्ञा.गा.००५१.०१।। | भावेंवीण भक्ति भक्तिवीण मुक्ति। बळेंवीण शक्ति बोलूं नये |
| २३४ | ।।ज्ञा.गा.००५१.०२।। | कैसेंनि दैवत प्रसन्न त्वरीत। उगा राहे निवांत शिणसी वायां |
| २३५ | ।।ज्ञा.गा.००५१.०३।। | सायास करिसी प्रपंच दिननिशीं। हरिसी न भजसी कवण्या गुणें |
| २३६ | ।।ज्ञा.गा.००५१.०४।। | ज्ञानदेव म्हणे हरिजप करणें। तुटेल धरणें प्रपंचाचें |
| २३७ | ।।ज्ञा.गा.००५२.०१।। | योग याग विधी येणें नव्हे सिद्धी। वायांचि उपाधि दंभ धर्म |
| २३८ | ।।ज्ञा.गा.००५२.०२।। | भावेंवीण देव न कळे निःसंदेह। गुरुवीण अनुभव कैसा कळे |
| २३९ | ।।ज्ञा.गा.००५२.०३।। | तपेंवीण दैवत दिधल्यावीण प्राप्त। गुजेंवीण हित कोण सांगे |
| २४० | ।।ज्ञा.गा.००५२.०४।। | ज्ञानदेव सांगे दृष्टांताची मात। साधूचे संगती तरणोपाय |
| २४१ | ।।ज्ञा.गा.००५३.०१।। | साधुबोध झाला तो नुरोनिया ठेला। ठायींच मुराला अनुभव |
| २४२ | ।।ज्ञा.गा.००५३.०२।। | कापुराची वाती उजळली ज्योती। ठायींच समाप्ती झाली जैशी |
| २४३ | ।।ज्ञा.गा.००५३.०३।। | मोक्ष रेखे आला भाग्यें विनटला। साधूंचा अंकिला हरिभक्त |
| २४४ | ।।ज्ञा.गा.००५३.०४।। | ज्ञानदेवा गोडी संगती सज्जनीं। हरि दिसे जनीं वनीं आत्मतत्त्वीं |
| २४५ | ।।ज्ञा.गा.००५४.०१।। | पर्वताप्रमाणें पातक करणें। वज्रलेप होणें अभक्तांसी |
| २४६ | ।।ज्ञा.गा.००५४.०२।। | नाहीं ज्यासी भक्ति तो पतित अभक्त। हरिसी न भजत दैवहत |
| २४७ | ।।ज्ञा.गा.००५४.०३।। | अनंत वाचाळ बरळती बरळ। त्या कैसेनि दयाळ पावे हरि |
| २४८ | ।।ज्ञा.गा.००५४.०४।। | ज्ञानदेवा प्रमाण आत्मा हा निधान। सर्वांघटीं संपूर्ण एक नांदे |

| | | |
|---|---|---|
| २४९ | ।।ज्ञा.गा.००५५.०१।। | संतांचे संगती मनोमार्ग गती। आकळावा श्रीपती येणें पंथें |
| २५० | ।।ज्ञा.गा.००५५.०२।। | रामकृष्ण वाचा भाव हा जिवाचा। आत्मा जो शिवाचा रामजप |
| २५१ | ।।ज्ञा.गा.००५५.०३।। | एकतत्त्व नाम साधिती साधन। द्वैताचें बंधन न बाधिजे |
| २५२ | ।।ज्ञा.गा.००५५.०४।। | नामामृत गोडी वैष्णवां लाधली। योगियां साधली जीवनकळा |
| २५३ | ।।ज्ञा.गा.००५५.०५।। | सत्वर उच्चार प्रल्हादीं बिंबला। उद्धवा लाधला कृष्णदाता |
| २५४ | ।।ज्ञा.गा.००५५.०६।। | ज्ञानदेव म्हणे नाम हें सुलभ। सर्वत्र दुर्लभ विरळा जाणें |
| २५५ | ।।ज्ञा.गा.००५६.०१।। | विष्णुवीण जप व्यर्थ त्याचें ज्ञान। रामकृष्णीं मन नाहीं ज्याचें |
| २५६ | ।।ज्ञा.गा.००५६.०२।। | उपजोनी करंटा नेणें अद्वैत वाटा। रामकृष्णीं पैठा कैसेंनि होय |
| २५७ | ।।ज्ञा.गा.००५६.०३।। | द्वैताची झाडणी गुरुवीण ज्ञान। तया कैचें कीर्तन घडेल नामीं |
| २५८ | ।।ज्ञा.गा.००५६.०४।। | ज्ञानदेव म्हणे सगुण हें ध्यान। नामपाठ मौन प्रपंचाचें |
| २५९ | ।।ज्ञा.गा.००५७.०१।। | त्रिवेणी संगमीं नाना तीर्थे भ्रमीं। चित्त नाहीं नामीं तरी तें व्यर्थ |
| २६० | ।।ज्ञा.गा.००५७.०२।। | नामासी विन्मुख तो नर पापिया। हरिवीण धांवया न पवे कोणी |
| २६१ | ।।ज्ञा.गा.००५७.०३।। | पुराणप्रसिद्ध बोलिले वाल्मिक। नामें तिन्ही लोक उद्धरती |
| २६२ | ।।ज्ञा.गा.००५७.०४।। | ज्ञानदेव म्हणे नाम जपा हरीचें। परंपरा त्याचें कुळ शुद्ध |
| २६३ | ।।ज्ञा.गा.००५८.०१।। | हरि उच्चारणीं अनंत पापराशी। जातील लयासी क्षणमात्रें |
| २६४ | ।।ज्ञा.गा.००५८.०२।। | तृण अग्निमेळें समरस झालें। तैसें नामें केलें जपतां हरि |
| २६५ | ।।ज्ञा.गा.००५८.०३।। | हरि उच्चारण मंत्र हा अगाध। पळे भूतबाध भेणें तेथें |
| २६६ | ।।ज्ञा.गा.००५८.०४।। | ज्ञानदेव म्हणे हरि माझा समर्थ। न करावें अर्थ उपनिषदां |
| २६७ | ।।ज्ञा.गा.००५९.०१।। | तीर्थ व्रत नेम भावेंवीण सिद्धी। वायांचि उपाधी करिसी जना |
| २६८ | ।।ज्ञा.गा.००५९.०२।। | भावबळें आकळे येऱ्हवीं नाकळे। करतळीं आंवळे तैसा हरि |
| २६९ | ।।ज्ञा.गा.००५९.०३।। | पारियाचा रवा घेतां भूमिवरी। यत्न परोपरी साधन तैसें |
| २७० | ।।ज्ञा.गा.००५९.०४।। | ज्ञानदेव म्हणे निवृत्ति निर्गुण। दिधलें संपूर्ण माझे हातीं |
| २७१ | ।।ज्ञा.गा.००६०.०१।। | समाधी हरीची समसुखेंवीण। न साधेल जाण द्वैतबुद्धी |
| २७२ | ।।ज्ञा.गा.००६०.०२।। | बुद्धीचें वैभव अन्य नाहीं दुजें। एका केशीराजें सकळ सिद्धी |
| २७३ | ।।ज्ञा.गा.००६०.०३।। | ऋद्धि सिद्धि निधी अवघीच उपाधी। जंव त्या परमानंदीं मन नाहीं |
| २७४ | ।।ज्ञा.गा.००६०.०४।। | ज्ञानदेवीं रम्य रमलें समाधान। हरीचें चिंतन सर्वकाळ |

| | | |
|---|---|---|
| २७५ | ।।ज्ञा.गा.००६१.०१।। | नित्य सत्यामित हरिपाठ ज्यासी। कळिकाळ त्यासी न पाहे दृष्टी |
| २७६ | ।।ज्ञा.गा.००६१.०२।। | रामकृष्ण उच्चार अनंत राशी तप। पापाचे कळप पळती पुढें |
| २७७ | ।।ज्ञा.गा.००६१.०३।। | हरि हरि हरि हा मंत्र शिवाचा। म्हणती जे वाचा तया मोक्ष |
| २७८ | ।।ज्ञा.गा.००६१.०४।। | ज्ञानदेवा पाठ नारायण नाम। पाविजे उत्तम निजस्थान |
| २७९ | ।।ज्ञा.गा.००६२.०१।। | एक नाम हरि द्वैत नाम दुरी। अद्वैत कुसरी विरळा जाणे |
| २८० | ।।ज्ञा.गा.००६२.०२।। | समबुद्धि घेतां समान श्रीहरि। शम दमा वैरी हरि झाला |
| २८१ | ।।ज्ञा.गा.००६२.०३।। | सर्वांघटीं राम देहादेहीं एक। सूर्य प्रकाशक सहस्ररश्मीं |
| २८२ | ।।ज्ञा.गा.००६२.०४।। | ज्ञानदेवा चित्तीं हरिपाठ नेमा। मागिलिया जन्मा मुक्त झालों |
| २८३ | ।।ज्ञा.गा.००६३.०१।। | हरि बुद्धि जपे तो नर दुर्लभ। वाचेसी सुलभ रामकृष्ण |
| २८४ | ।।ज्ञा.गा.००६३.०२।। | रामकृष्ण नामीं उन्मनीं साधिली। तयासी लाधली सकळ सिद्धी |
| २८५ | ।।ज्ञा.गा.००६३.०३।। | सिद्धी बुद्धि धर्म हरिपाठीं आले। प्रपंचीं निवाले साधुसंगें |
| २८६ | ।।ज्ञा.गा.००६३.०४।। | ज्ञानदेवीं नाम रामकृष्ण ठसा। येणें दशदिशा आत्माराम |
| २८७ | ।।ज्ञा.गा.००६४.०१।। | हरिपाठ कीर्ति मुखें जरी गाय। पवित्रचि होय देह त्याचा |
| २८८ | ।।ज्ञा.गा.००६४.०२।। | तपाचे सामर्थ्यें तपिन्नला अमूप। चिरंजीव कल्प वैकुंठीं नांदे |
| २८९ | ।।ज्ञा.गा.००६४.०३।। | मातृ पितृ भ्राता सगोत्र अपार। चतुर्भुज नर होऊनि ठेले |
| २९० | ।।ज्ञा.गा.००६४.०४।। | ज्ञान गूढ गम्य ज्ञानदेवा लाधलें। निवृत्तीनें दिलें माझ्या हातीं |
| २९१ | ।।ज्ञा.गा.००६५.०१।। | हरिवंश पुराण हरिनाम संकीर्तन। हरिवीण सौजन्य नेणें कांहीं |
| २९२ | ।।ज्ञा.गा.००६५.०२।। | तया नरा लाधलें वैकुंठ जोडलें। सकळही घडलें तीर्थाटण |
| २९३ | ।।ज्ञा.गा.००६५.०३।। | मनोमार्गें गेला तो येथें मुकला। हरिपाठीं स्थिरावला तोचि धन्य |
| २९४ | ।।ज्ञा.गा.००६५.०४।। | ज्ञानदेवा गोडी हरिनामाची जोडी। रामकृष्णीं आवडी सर्वकाळ |
| २९५ | ।।ज्ञा.गा.००६६.०१।। | नामसंकीर्तन वैष्णवांची जोडी। पापें अनंत कोडी गेलीं त्यांचीं |
| २९६ | ।।ज्ञा.गा.००६६.०२।। | अनंत जन्मांचें तप एक नाम। सर्व मार्ग सुगम हरिपाठ |
| २९७ | ।।ज्ञा.गा.००६६.०३।। | योग याग क्रिया धर्माधर्म माया। गेले ते विलया हरिपाठीं |
| २९८ | ।।ज्ञा.गा.००६६.०४।। | ज्ञानदेवीं यज्ञयाग क्रिया धर्म। हरिवीण नेम नाहीं दुजा |
| २९९ | ।।ज्ञा.गा.००६७.०१।। | वेदशास्त्र प्रमाण श्रुतीचें वचन। एक नारायण सार जप |
| ३०० | ।।ज्ञा.गा.००६७.०२।। | जप तप कर्म हरिवीण धर्म। वाउगाचि श्रम व्यर्थ जाय |

| | | |
|---|---|---|
| ३०१ | ।।ज्ञा.गा.००६७.०३।। | हरिपाठीं गेले ते निवांतचि ठेले। भ्रमर गुंतले सुमनकळिके |
| ३०२ | ।।ज्ञा.गा.००६७.०४।। | ज्ञानदेवीं मंत्र हरिनामाचें शस्त्र। यमें कुळ गोत्र वर्जियेलें |
| ३०३ | ।।ज्ञा.गा.००६८.०१।। | काळ वेळ नाम उच्चारितां नाहीं। दोन्ही पक्ष पाहीं उद्धरती |
| ३०४ | ।।ज्ञा.गा.००६८.०२।। | रामकृष्ण नाम सर्व दोषां हरण। जड जीवां तारण हरि एक |
| ३०५ | ।।ज्ञा.गा.००६८.०३।। | नाम हरि सार जिव्हा या नामाची। उपमा त्या दैवाची कोण वानी |
| ३०६ | ।।ज्ञा.गा.००६८.०४।। | ज्ञानदेवा सांग झाला हरिपाठ। पूर्वजां वैकुंठ मार्ग सोपा |
| ३०७ | ।।ज्ञा.गा.००६९.०१।। | नित्य नेम नामीं तो प्राणी दुर्लभ। लक्ष्मीवल्लभ तयाजवळीं |
| ३०८ | ।।ज्ञा.गा.००६९.०२।। | नारायण हरि नारायण हरि। भुक्ति मुक्ति चारी घरीं त्यांच्या |
| ३०९ | ।।ज्ञा.गा.००६९.०३।। | हरिवीण जन्म तो नरकचि पैं जाणा। यमाचा पाहुणा प्राणी होय |
| ३१० | ।।ज्ञा.गा.००६९.०४।। | ज्ञानदेव पुसे निवृत्तीसी चाड। गगनाहुनी वाड नाम आहे |
| ३११ | ।।ज्ञा.गा.००७०.०१।। | सात पांच तीन दशकांचा मेळा। एकतत्त्वीं कळा दावी हरि |
| ३१२ | ।।ज्ञा.गा.००७०.०२।। | तैसें नव्हे नाम सर्वमार्गांवरिष्ठ। येथें कांहीं कष्ट न लगती |
| ३१३ | ।।ज्ञा.गा.००७०.०३।। | अजपा जपणें  उलट प्राणाचा। तेथें या मनाचा निर्धारू असे |
| ३१४ | ।।ज्ञा.गा.००७०.०४।। | ज्ञानदेवा जिणें नामेंवीण व्यर्थ। रामकृष्णीं पंथ क्रमीयेला |
| ३१५ | ।।ज्ञा.गा.००७१.०१।। | जप तप कर्म क्रिया नेम धर्म। सर्वांघटीं राम भावशुद्ध |
| ३१६ | ।।ज्ञा.गा.००७१.०२।। | न सोडी रे भावो टाकी रे संदेहो। रामकृष्णीं टाहो नित्य फोडी |
| ३१७ | ।।ज्ञा.गा.००७१.०३।। | जात वित्त गोत कुळ शीळ मात। भजे कां त्वरित भावनायुक्त |
| ३१८ | ।।ज्ञा.गा.००७१.०४।। | ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण मनीं। वैकुंठभुवनीं घर केलें |
| ३१९ | ।।ज्ञा.गा.००७२.०१।। | जाणीव नेणीव भगवंतीं नाहीं। उच्चारणीं पाहीं मोक्ष सदा |
| ३२० | ।।ज्ञा.गा.००७२.०२।। | नारायण हरि उच्चार नामाचा। तेथें कळिकाळाचा रीघ नाहीं |
| ३२१ | ।।ज्ञा.गा.००७२.०३।। | तेथील प्रमाण नेणवे वेदांसी। ते जीव जंतूंसी केवीं कळे |
| ३२२ | ।।ज्ञा.गा.००७२.०४।। | ज्ञानदेवा फळ नारायण पाठ। सर्वत्र वैकुंठ केलें असे |
| ३२३ | ।।ज्ञा.गा.००७३.०१।। | एकतत्त्व नाम दृढ धरीं मना। हरीसी करुणा येईल तुझी |
| ३२४ | ।।ज्ञा.गा.००७३.०२।। | तें नाम सोपे रे रामकृष्ण गोविंद। वाचेसी सद्गद जपे आधीं |
| ३२५ | ।।ज्ञा.गा.००७३.०३।। | नामापरतें तत्त्व नाहीं रे अन्यथा। वायां आणिक पंथा जाशी झणी |
| ३२६ | ।।ज्ञा.गा.००७३.०४।। | ज्ञानदेवा मौन जपमाळ अंतरीं। धरोनी श्रीहरि जपे सदा |

| | | |
|---|---|---|
| ३२७ | ।।ज्ञा.गा.००७४.०१।। | सर्व सुख गोडी सर्व शास्त्र निवडी। रिकामा अर्धघडी राहू नको |
| ३२८ | ।।ज्ञा.गा.००७४.०२।। | लटिका व्यवहार सर्व हा संसार। वायां येरझार हरिवीण |
| ३२९ | ।।ज्ञा.गा.००७४.०३।। | नाम मंत्र जप कोटी जाईल पाप। रामकृष्णीं संकल्प धरुनी राहे |
| ३३० | ।।ज्ञा.गा.००७४.०४।। | निजवृत्ति काढीं सर्व माया तोडीं। इंद्रिया सवडी लपों नको |
| ३३१ | ।।ज्ञा.गा.००७४.०५।। | तीर्थव्रतीं भावना धरी रे करुणा। शांती दया पाहुणा हरि करीं |
| ३३२ | ।।ज्ञा.गा.००७४.०६।। | ज्ञानदेवा प्रमाण निवृत्तिदेवीं ज्ञान। समाधि संजीवन हरिपाठ |
| ३३३ | ।।ज्ञा.गा.००७५.०१।। | सोनियाचा दिवस आजि अमृतें पाहाला। नाम आठवितां रूपीं प्रकट पैं झाला |
| ३३४ | ।।ज्ञा.गा.००७५.०२।। | गोपाळा रे तुझें ध्यान लागो मना। आनु न विसंबे हरि जगत्रजीवना |
| ३३५ | ।।ज्ञा.गा.००७५.०३।। | तनु मनु शरण विनटलों तुझ्या पायीं। बाप रखुमादेविवरावाचुनि आनु नेणें कांहीं |
| ३३६ | ।।ज्ञा.गा.००७६.०१।। | दसविये द्वारीं वोहट पडिला। नेणता पैं गेला पाहावया |
| ३३७ | ।।ज्ञा.गा.००७६.०२।। | अवचिती वाट सांपडली पंथें। ब्रह्मनाम तेथें आलें हातां |
| ३३८ | ।।ज्ञा.गा.००७६.०३।। | ज्ञानदेव गीतीं निशाणी नाम। समाधि संजीवनी तारक हरि |
| ३३९ | ।।ज्ञा.गा.००७७.०१।। | भावाचेनि बळें घेतलें वैकुंठ। हरिनाम नीट वैकुंठ मार्ग |
| ३४० | ।।ज्ञा.गा.००७७.०२।। | सोपें हो साधन साधावयालागीं। नलगे उपाधि नाना मतें |
| ३४१ | ।।ज्ञा.गा.००७७.०३।। | ज्ञानेसहित ज्ञान विज्ञानें धन। वृत्तींचें समाधान निवृत्ति करी |
| ३४२ | ।।ज्ञा.गा.००७७.०४।। | शांति दया क्षमा करुणानिधि प्रेम। नेउनी परब्रह्म भावें मिळती |
| ३४३ | ।।ज्ञा.गा.००७७.०५।। | ज्ञानदेवो सांगे भावो मीनला गंगे। सुस्नात सर्वांगें हरि गंगा |
| ३४४ | ।।ज्ञा.गा.००७८.०१।। | आलिया जवळा भक्तिसुख देखे। पालव पोखे वाणिव भोगी |
| ३४५ | ।।ज्ञा.गा.००७८.०२।। | तें सुख आम्हां विठ्ठलचरणीं। निवृत्ति करणी व्यासाचिये |
| ३४६ | ।।ज्ञा.गा.००७८.०३।। | जप तप ज्ञान क्रिया कर्म धर्म। रामकृष्ण नेम गुरुभजनें |
| ३४७ | ।।ज्ञा.गा.००७८.०४।। | ज्ञानदेवो म्हणे संसार निरसी। अखंड मानसीं विठ्ठल हरि |
| ३४८ | ।।ज्ञा.गा.००७९.०१।। | अभाव संगती नाना भूत व्यक्ती। संसार पंगती मेळवी त्यासी |
| ३४९ | ।।ज्ञा.गा.००७९.०२।। | हरिनामें शोक करी अभाव कामारी। यातें दुरी करी हरिपाठें |
| ३५० | ।।ज्ञा.गा.००७९.०३।। | संतांची संगती वेदश्रुतीची मती। घेऊनियां हातीं ब्रह्मशास्त्र |
| ३५१ | ।।ज्ञा.गा.००७९.०४।। | ज्ञानदेव म्हणे नारायण नाणें। घेऊनि पारखणें भक्तिपेठे |
| ३५२ | ।।ज्ञा.गा.००८०.०१।। | यश कीर्ति वानूं नेणें मी वाखाणूं। रामकृष्णनाम आम्हां सणू नित्य दिवाळी |

| | | |
|---|---|---|
| ३५३ | ।।ज्ञा.गा.००८०.०२।। | नरहरी रामा नरहरी रामा। पुराणपुरुषोत्तमा हरि गोपाळा |
| ३५४ | ।।ज्ञा.गा.००८०.०३।। | या नेमीं अक्रूर बोधला परीक्षिति उपदेशिला। अर्जुनासी जाला साहाकारी |
| ३५५ | ।।ज्ञा.गा.००८०.०४।। | ज्ञानदेव म्हणे नामेंवीण जो नरु। तो होय भूमिभारु ये संसारीं |
| ३५६ | ।।ज्ञा.गा.००८१.०१।। | प्राप्तीवीण फळ केवीं लाहे प्राणी। जैसा चातक धरणीं उपवासु |
| ३५७ | ।।ज्ञा.गा.००८१.०२।। | ओळलिया मेघु सावधु बोभाये। बिंदुमात्र घेई जीवन देखा |
| ३५८ | ।।ज्ञा.गा.००८१.०३।। | तैसें केवीं घडे संसारिया चित्तें। प्राप्तीच्या अर्थातें साहे संत |
| ३५९ | ।।ज्ञा.गा.००८१.०४।। | सगुण निर्गुण समरस आहे। विरुळा येथ साहे समता बुद्धी |
| ३६० | ।।ज्ञा.गा.००८१.०५।। | जंववरी समान शांति बुद्धि हे ठेली। तंववरी ये भुली बोली कैसी घडे |
| ३६१ | ।।ज्ञा.गा.००८१.०६।। | दिन काळ पळपळ स्मरण नामाचें। विरुळा या मंत्राचें करी पठण |
| ३६२ | ।।ज्ञा.गा.००८१.०७।। | ज्ञानदेव म्हणे नामया हें तूं गा जाणसी। भजन केशवासी तूंचि तुझा |
| ३६३ | ।।ज्ञा.गा.००८२.०१।। | कापुरीं परिमळु दिसे वो अळुमाळु। हळू हळू सुढाळू पवनपंथें |
| ३६४ | ।।ज्ञा.गा.००८२.०२।। | पवनीं न धाये पवनही धाये। परतला खाये आपणांसी |
| ३६५ | ।।ज्ञा.गा.००८२.०३।। | मुखवात नाहीं तरतसे बाहीं। नावें दिशा दाही आप घोषें |
| ३६६ | ।।ज्ञा.गा.००८२.०४।। | ज्ञानदेवा मौन्य नामाचे तारण। तारक हरिवीण दुजा नाहीं |
| ३६७ | ।।ज्ञा.गा.००८३.०१।। | श्रवण त्वचा चक्षु जिव्हा घ्राण। दशहि इंद्रियें जाण हरीच्या ठायीं |
| ३६८ | ।।ज्ञा.गा.००८३.०२।। | अवघा हा गोविंदु अवघा हा मुकुंदु। अवघा हा विद्गदु भरला दिसे |
| ३६९ | ।।ज्ञा.गा.००८३.०३।। | पतीतपावन नामें दिनोद्धारण। स्मरलिया आपण वैकुंठ देतु |
| ३७० | ।।ज्ञा.गा.००८३.०४।। | ज्ञानदेव म्हणे हें पुंडलीक जाणें। अंतकाळीं पेणें साधियेलें |
| ३७१ | ।।ज्ञा.गा.००८४.०१।। | अनंत नामाचें पाठांतर। रामकृष्णनाम निरंतर। सर्व सुखाचें भांडार। हरि श्रीधर नाम वाचे |
| ३७२ | ।।ज्ञा.गा.००८४.०२।। | हरिनाम गजर खरा। येणें तूं तरसील सैरा। जन्म जुगाच्या येरझारा। खंडती एक्या हरिनामें |
| ३७३ | ।।ज्ञा.गा.००८४.०३।। | अनंत तीर्थांचे मेळ। साधलिया हरिनाम कल्लोळ। पूर्वजांसहित अजामेळ। उद्धरिला सहपरिवारें |
| ३७४ | ।।ज्ञा.गा.००८४.०४।। | कोटिजन्मांचे दोष। हरतील पातकें जातील नि:शेष। अंतीं होईल वैकुंठवास। कोटि कुळांसी उद्धार |
| ३७५ | ।।ज्ञा.गा.००८४.०५।। | हें योगियांचे निजजीवन। रामकृष्ण नारायण। येणें जगत्रय होय पावन। हरिस्मरण जिवांसी |
| ३७६ | ।।ज्ञा.गा.००८४.०६।। | ज्ञानदेवीं घर केले। हरि ऐसें रत्न सांठविलें। शेखीं कोटिकुळां उद्धरिलें। हरिहरि स्मरिलें निशिदिनीं |
| ३७७ | ।।ज्ञा.गा.००८५.०१।। | पदपदार्थसंपन्नता। व्यर्थ टवाळी कां सांगतां। हरिनामीं नित्य अनुसरतां। हें सार सर्वार्थीं |
| ३७८ | ।।ज्ञा.गा.००८५.०२।। | हरिनाम सर्व पंथीं। पाहावें नलगे ये अर्थीं। जे अनुसरलें ते कृतार्थी। भवपंथा मुकलें |

| | | |
|---|---|---|
| ३७९ | ।।ज्ञा.गा.००८५.०३।। | कुळ तरले तयांचें। जीहीं स्मरण केलें नामाचें। भय नाहीं त्या यमाचें। सर्व ग्रंथीं बोलियेलें |
| ३८० | ।।ज्ञा.गा.००८५.०४।। | नलगे धन नलगे मोल। न लगती कष्ट बहुसाल। कीर्तन करितां काळ वेळ। नाहीं नाहीं सर्वथा |
| ३८१ | ।।ज्ञा.गा.००८५.०५।। | हरि सर्व काळ अविकळ। स्मरे तो योगिया धन्य केवळ। त्याचेनि दर्शन सर्व काळ। सुफळ संसार होतसे |
| ३८२ | ।।ज्ञा.गा.००८५.०६।। | ज्ञानदेवीं जप केला। मन मुरडुनी हरि ध्याईला। तेणें सर्वांगीं निवाला। हरिच जाला निजांगें |
| ३८३ | ।।ज्ञा.गा.००८६.०१।। | सर्वव्यापक सर्व देहीं आहे। परि प्राणियांसी सोय न कळे त्याची |
| ३८४ | ।।ज्ञा.गा.००८६.०२।। | परमार्थ तो कडु विषय तो गोडु। तया अवघडु संसार |
| ३८५ | ।।ज्ञा.गा.००८६.०३।। | नामाचें साधन जिव्हे लावी बाण। तया अनुदिन जवळी असे |
| ३८६ | ।।ज्ञा.गा.००८६.०४।। | धारणा धीट जरी होय विनट। तया प्रेमें वैकुंठ जवळी असे |
| ३८७ | ।।ज्ञा.गा.००८६.०५।। | सुलभ आणि सोपारें केलेंसे दातारें। आम्हीं एकसरें उच्चारिलें |
| ३८८ | ।।ज्ञा.गा.००८६.०६।। | ज्ञानियासि ज्ञान ज्ञानदेवीं ध्यान। कलिमलछेदन नाम एक |
| ३८९ | ।।ज्ञा.गा.००८७.०१।। | तिहीं त्रिगुणीं ओतिलें। त्रिपुटिसी गोविलें। आणुनी बांधिलें। चर्मदेहीं |
| ३९० | ।।ज्ञा.गा.००८७.०२।। | न सुटतां शिणतां हे। भवति वास पाहे। प्रपंच मोहता हे। काय करूं |
| ३९१ | ।।ज्ञा.गा.००८७.०३।। | कृष्णनाम मंत्रु सुटे। विषय प्रपंचु तुटे। मोहनमुद्रा निघोटे। वैकुंठ रया |
| ३९२ | ।।ज्ञा.गा.००८७.०४।। | सावधपणें विरुळा। जाणें तेथींची कळा। विज्ञानपणें सोहळा। निमथा गातूं |
| ३९३ | ।।ज्ञा.गा.००८७.०५।। | ज्ञानदेव सांगतु । हरिपंथें मुक्तिमातु। एकतत्त्व सांगातु। जनींवनीं |
| ३९४ | ।।ज्ञा.गा.००८८.०१।। | अळुमाळु सोय रातलीची धाय। सत्त्वतेजीं माये एकतत्त्वीं |
| ३९५ | ।।ज्ञा.गा.००८८.०२।। | तें तत्त्वसाधन मुक्तामुक्त धन । कृष्णनाम पूर्ण तेजीं माये |
| ३९६ | ।।ज्ञा.गा.००८८.०३।। | सोकरी पापपुण्या ठायीं आपा। आयुष्याच्या मापा हरि धावे |
| ३९७ | ।।ज्ञा.गा.००८८.०४।। | ज्ञानदेव गीत गातसे नित्य। कृष्णकृष्ण सत्य इतुकें सार |
| ३९८ | ।।ज्ञा.गा.००८९.०१।। | जन्मजन्मांतरीं। असेल पुण्यसामुग्री। तरीच नाम जिव्हाग्रीं। येईल श्रीरामाचें |
| ३९९ | ।।ज्ञा.गा.००८९.०२।। | धन्य कुळ तयाचें। रामनाम हेंचि वाचें। दोष हरतील जन्माचे। श्रीराम म्हणतांची |
| ४०० | ।।ज्ञा.गा.००८९.०३।। | कोटिकुळाचें उद्धरण। मुखीं राम नारायण। रामकृष्ण स्मरण। धन्य जन्म तयाचे |
| ४०१ | ।।ज्ञा.गा.००८९.०४।। | नाम तारक सांगडी। नाम न विसंबे अर्धघडी। तप केलें असेल कोडी। तरीच नाम येईल |
| ४०२ | ।।ज्ञा.गा.००८९.०५।। | ज्ञानदेवीं अभ्यास मोठा। नामस्मरण मुखावाटा। पूर्वज गेले वैकुंठा। हरिहरि स्मरतां |
| ४०३ | ।।ज्ञा.गा.००९०.०१।। | अढळ सप्रेम उपरती पावो। हरिहरि घेवों तारक नाम |
| ४०४ | ।।ज्ञा.गा.००९०.०२।। | संवगडे वागणें हरिपंथीं चालों। हरि हरि बोलों दिननिशीं |

| | | |
|---|---|---|
| ४०५ | ।।ज्ञा.गा.००९०.०३।। | पाहाते निमते सरे हंसगती। हरीची पंगती जेऊं बैसो |
| ४०६ | ।।ज्ञा.गा.००९०.०४।। | ज्ञानदेव सांगे रामकृष्ण आशा। संसारपिपासा दुरी करी |
| ४०७ | ।।ज्ञा.गा.००९१.०१।। | कापुराचें कलेवर घातलें करंडां। सेखीं नुरेचि उंडा पहावया |
| ४०८ | ।।ज्ञा.गा.००९१.०२।। | मा ज्योती मेळे कैसा उरेल कोळिसा । भावें हृषिकेशा भजतां ऐसें |
| ४०९ | ।।ज्ञा.गा.००९१.०३।। | ज्ञानदेव म्हणे वासना हे खोटी। नामयज्ञें मिठी दिधलिया विरे |
| ४१० | ।।ज्ञा.गा.००९२.०१।। | सुकुमार वेल्हाळ रूपें पैं सुंदर। तोचि पैं आगर नंदाघरीं |
| ४११ | ।।ज्ञा.गा.००९२.०२।। | अवघ्या सुख देतु अवघ्या विदटे। अवघेची पेठे हरिनाम |
| ४१२ | ।।ज्ञा.गा.००९२.०३।। | यापरी आगरु कृष्णनाम ठसा। ओतला सरिसा भाग्ययोगें |
| ४१३ | ।।ज्ञा.गा.००९२.०४।। | बाप निवृत्तिराज उपदेशिती आम्हां। ज्ञानदेवा महिमा नामें आला |
| ४१४ | ।।ज्ञा.गा.००९३.०१।। | ज्याचेनि तेजें तेजस रविग्रह। त्याचेनि मोह निरसती |
| ४१५ | ।।ज्ञा.गा.००९३.०२।। | तें नाम परिकर कृष्णचि सुंदर। वैकुंठींचें घर आम्हीं केलें |
| ४१६ | ।।ज्ञा.गा.००९३.०३।। | जपतां नाम स्मरतां पैं हरिहरि। प्रपंच बोहरी कृष्णनामें |
| ४१७ | ।।ज्ञा.गा.००९३.०४।। | निवृत्ति सांगे ज्ञाना कृष्णचि नयना। सर्वां सर्वत्र पान्हा कृष्णरूपें |
| ४१८ | ।।ज्ञा.गा.००९४.०१।। | समरसें घटु विराला विनटु। एकरूपें पाटु गेला सांगसी |
| ४१९ | ।।ज्ञा.गा.००९४.०२।। | कृष्ण कृष्ण वाट सांपडली नीट। जिव्हेसी घडघडाट इंद्रियेंसहित |
| ४२० | ।।ज्ञा.गा.००९४.०३।। | मनाच्या भोवनीं समाधीच्या ध्यानीं। चिंतिला पद्मासनीं आत्मराजु |
| ४२१ | ।।ज्ञा.गा.००९४.०४।। | ज्ञानदेवा चित्त कृष्णध्यानीं रत। जन्मजरामृत्यु हारपली |
| ४२२ | ।।ज्ञा.गा.००९५.०१।। | सर्वत्र समान भावयुक्त पूर्ण। धृति धारणा धन वर्ते जया |
| ४२३ | ।।ज्ञा.गा.००९५.०२।। | सामान्यत्व हरि समसेज करी। चित्त वित्त घरीं हरिपाठें |
| ४२४ | ।।ज्ञा.गा.००९५.०३।। | आकार निराकारीं त्रिपथ शेजारीं। हरि भरोवरी घेतु विरुळा |
| ४२५ | ।।ज्ञा.गा.००९५.०४।। | ज्ञानदेवा जिणें अवघें ज्ञान होणें। विज्ञानीं राहणें गुरुकृपा |
| ४२६ | ।।ज्ञा.गा.००९६.०१।। | सांवळिये तेजीं भक्ति पसु ओल। इंद्रियां शरण चरणरजीं |
| ४२७ | ।।ज्ञा.गा.००९६.०२।। | निवालों वो माये अमृतरसनें। रामनामपेणें वैकुंठींचें |
| ४२८ | ।।ज्ञा.गा.००९६.०३।। | आळवितां सगुणनिर्गुण रूपडें। वचनें फाडोवाडें हातां येत |
| ४२९ | ।।ज्ञा.गा.००९६.०४।। | ज्ञानांजन लेवों ज्ञानदेवीं निज। निवृत्तीनें गुज सांगितलें |
| ४३० | ।।ज्ञा.गा.००९७.०१।। | समाधि साधन संजीवन नाम। शांति दया सम सर्वांभूतीं |

| | | |
|---|---|---|
| ४३१ | ।।ज्ञा.गा.००९७.०२।। | शांतीची पैं शांति निवृत्ति उतारू। हरिनाम उच्चारु दिधला तेणें |
| ४३२ | ।।ज्ञा.गा.००९७.०३।। | शम दम कळा विज्ञान सज्ञान। परतोनी अज्ञान नये घरा |
| ४३३ | ।।ज्ञा.गा.००९७.०४।। | ज्ञानदेवा सिद्धि साधन अवीट। भक्तिमार्ग नीट हरिपंथीं |
| ४३४ | ।।ज्ञा.गा.००९८.०१।। | परेसी परतें स्वरूप या हरीचें । भक्तिमार्ग साचे विरुढे रूप |
| ४३५ | ।।ज्ञा.गा.००९८.०२।। | चला जाऊं पाहूं आत्मराज घटीं। नामें नेतु तटीं वैकुंठीचिया |
| ४३६ | ।।ज्ञा.गा.००९८.०३।। | समाधि विधान हरिपाठगुण। उगियाची मौन असिजे रया |
| ४३७ | ।।ज्ञा.गा.००९८.०४।। | ज्ञानदेव निवृत्ति पुसों जाय भाव। तंव तेणें स्वयमेव दाविलें डोळां |
| ४३८ | ।।ज्ञा.गा.००९९.०१।। | त्रिभुवनीचें सुख एकतत्त्व विठ्ठल। नलगे आम्हां मोल उच्चारितां |
| ४३९ | ।।ज्ञा.गा.००९९.०२।। | विठ्ठल उघडा मंत्र कळिकाळा त्रास। घालुनियां कांस जपों आधीं |
| ४४० | ।।ज्ञा.गा.००९९.०३।। | सत्वर सत्वाचे जपती नामावळी। नित्यता आंघोळी घडे रया |
| ४४१ | ।।ज्ञा.गा.००९९.०४।। | बाप रखुमादेविवरु जिव्हाळा हृदयीं। जीवाचा जीव ठायीं एक पाही |
| ४४२ | ।।ज्ञा.गा.०१००.०१।। | कां रे स्फुंदतोसी। कां रे स्फुंदतोसी। न भजतां विठ्ठलासी। नरकीं पडसी |
| ४४३ | ।।ज्ञा.गा.०१००.०२।। | पुण्यपाप बाधा। न पवसी गोविंदा। पावशील आपदा। स्मर परमानंदा |
| ४४४ | ।।ज्ञा.गा.०१००.०३।। | पुण्य करितां स्वर्ग । पाप करितां भोग। नाम जपतां सर्वांग। होईल पांडुरंग |
| ४४५ | ।।ज्ञा.गा.०१००.०४।। | देहीं आत्मा जंव आहे। तंव करूनियां पाहे। अंतीं कोणी नोव्हे। धरीं वैष्णवाची सोय |
| ४४६ | ।।ज्ञा.गा.०१००.०५।। | जाईल हें आयुष्य। न सेवीं विषयविष। पडतील यमशाप। वेगीं करी सौरस |
| ४४७ | ।।ज्ञा.गा.०१००.०६।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलीं। मन चरणीं गोंवीं। हारपला देहभावीं। जालासे गोसावी एकरूप |
| ४४८ | ।।ज्ञा.गा.०१०१.०१।। | सहज कर्म भक्ति घडावया कोडें। ज्ञानघन निवाडें नाम जपों |
| ४४९ | ।।ज्ञा.गा.०१०१.०२।। | नाम मात्र नमन ज्ञानघन पूर्ण। रामनामें कर्ण भरूं रया |
| ४५० | ।।ज्ञा.गा.०१०१.०३।। | सत्त्वाचे सागरीं उतरों पैलथडीं। रीति अर्धघडी जावो नेदी |
| ४५१ | ।।ज्ञा.गा.०१०१.०४।। | ज्ञानदेवा चित्त अवघें धन गोत। रामनामें तृप्त सकळ जीव |
| ४५२ | ।।ज्ञा.गा.०१०२.०१।। | अष्टांगयोगें न शिणिजे। यम नेम निरोध न किजे रया |
| ४५३ | ।।ज्ञा.गा.०१०२.०२।। | वाचा गीत गाईजे वा गीत गाईजे। गातां वातां श्रवणीं ऐकिजे रया |
| ४५४ | ।।ज्ञा.गा.०१०२.०३।। | गीताछंदें अंग डोलिजे। लीला विनोदें संसार तरिजे रया |
| ४५५ | ।।ज्ञा.गा.०१०२.०४।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलु नामें । जोडे हा उपावो किजे रया |
| ४५६ | ।।ज्ञा.गा.०१०३.०१।। | अंडज जारज स्वेदज उद्भिज आटे। हरिनाम नाटे तें बरवें |

| | | |
|---|---|---|
| ४५७ | ।।ज्ञा.गा.०१०३.०२।। | जें नाटे तें नाम चित्तीं। रखुमादेवीपति श्रीविठ्ठलाचें |
| ४५८ | ।।ज्ञा.गा.०१०३.०३।। | शरीर आटे संपत्ति आटे। हरिनाम नाटे तें बरवें |
| ४५९ | ।।ज्ञा.गा.०१०३.०४।। | बाप रखुमादेविवराचें नाम नाटे। युगें गेलीं परी उभा विटे |
| ४६० | ।।ज्ञा.गा.०१०४.०१।। | रामनाम वाट हेंचि पैं वैकुंठ। ऐसी भगवद्गीता बोलतसे |
| ४६१ | ।।ज्ञा.गा.०१०४.०२।। | अठरा साक्षी साही विवादत। चौघाचेनि मतें घेईन भागु |
| ४६२ | ।।ज्ञा.गा.०१०४.०३।। | शेवटीले दिवसीं धरणें घेईन। बाप रखुमादेविवरा बळेंचि साधीन |
| ४६३ | ।।ज्ञा.गा.०१०५.०१।। | कर्म आणि धर्म आचरिजे जयालागीं। साधक शिणले साधन साधितां अभागी |
| ४६४ | ।।ज्ञा.गा.०१०५.०२।। | गोड तुझें नाम विठोबा आवडतें मज। दुजें उच्चारितां मना वाटतसे लाज |
| ४६५ | ।।ज्ञा.गा.०१०५.०३।। | भुक्ति आणि मुक्ति नामापासीं प्रत्यक्ष। चार्‍ही वेद साही शास्त्रें वदताती साक्ष |
| ४६६ | ।।ज्ञा.गा.०१०५.०४।। | बाप रखुमादेविवरा विठ्ठला तुझी आण। काया वाचा चित्त चरणीं ठेविलेंसे गहाण |
| ४६७ | ।।ज्ञा.गा.०१०६.०१।। | प्रेमाचा जिव्हाळा नाम मुखाशीं आलें। सार्थक पैं जालें संसाराचें |
| ४६८ | ।।ज्ञा.गा.०१०६.०२।। | केशव नाम सार विठ्ठल उच्चार। राम निरंतर ह्रदयीं वसे |
| ४६९ | ।।ज्ञा.गा.०१०६.०३।। | पाहतां हा भाव तो लीळा तो विग्रह। तेथींचा अनुभव विरळा जाणे |
| ४७० | ।।ज्ञा.गा.०१०६.०४।। | बाप रखुमादेविवरु पाहतां विस्तारु। नामाचा बडिवारु न बोलवे |
| ४७१ | ।।ज्ञा.गा.०१०७.०१।। | रामकृष्ण नामें ये दोन्ही साजिरीं। ह्रदयमंदिरीं स्मरां कां रे |
| ४७२ | ।।ज्ञा.गा.०१०७.०२।। | आपुली आपण करा सोडवण। संसारबंधन तोडा वेगीं |
| ४७३ | ।।ज्ञा.गा.०१०७.०३।। | ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण माळा। ह्रदयीं जिव्हाळा श्रीमूर्ति रया |
| ४७४ | ।।ज्ञा.गा.०१०८.०१।। | आठवितां विसरलें आपुलिया गोता। हरिनामें त्वरितां मोक्ष जाला |
| ४७५ | ।।ज्ञा.गा.०१०८.०२।। | त्याचें नामचि त्वरित प्रल्हादें केलें प्रसन्न। तेणें संजीवन जाले त्याचे देह |
| ४७६ | ।।ज्ञा.गा.०१०८.०३।। | बाप रखुमादेविवरु नृसिंहरूपें देखे। दैत्य हरिखे धरी जानु |
| ४७७ | ।।ज्ञा.गा.०१०९.०१।। | विठ्ठल नाम नुच्चारिसी। तरी तूं रवरव कुंडीं पडसी |
| ४७८ | ।।ज्ञा.गा.०१०९.०२।। | विठ्ठल नाम उच्चारीं। आळसु न करीं क्षणभरी |
| ४७९ | ।।ज्ञा.गा.०१०९.०३।। | विठ्ठल नाम तीन अक्षरें। अमृतपान केलें शंकरें |
| ४८० | ।।ज्ञा.गा.०१०९.०४।। | रखुमादेविवरा विठ्ठलें। महापातकी उद्धरिले |
| ४८१ | ।।ज्ञा.गा.०११०.०१।। | भ्रम धरिसी या देहाचा। विठ्ठल म्हणे कां रे वाचा |
| ४८२ | ।।ज्ञा.गा.०११०.०२।। | पडोन जाईल कलेवर। विठ्ठल उच्चारीं पां सार |

| | | |
|---|---|---|
| ४८३ | ।।ज्ञा.गा.०११०.०३।। | रखुमादेविवरु अभयकरु। मस्तकीं ठेविला हा निर्धारु |
| ४८४ | ।।ज्ञा.गा.०१११.०१।। | विठ्ठल विठ्ठल न म्हणसी। पुनरपि पडसी गर्भवासीं |
| ४८५ | ।।ज्ञा.गा.०१११.०२।। | अंतकाळीं स्मरे। स्मरे विठ्ठल राणा |
| ४८६ | ।।ज्ञा.गा.०१११.०३।। | रखुमादेविवरु निर्धारी। पडों नेदी चराचरीं |
| ४८७ | ।।ज्ञा.गा.०११२.०१।। | एक मूर्ख नेणती। नाम हरीचें न घेती। मुखें भलतेंचि जल्पती। ते पावती अध:पंथा |
| ४८८ | ।।ज्ञा.गा.०११२.०२।। | नामेंवीण सुटका नाहीं। ऐसी वेदशास्त्रीं ग्वाही। जो वेद मस्तकीं पाही। ब्रह्मयानें वंदिला |
| ४८९ | ।।ज्ञा.गा.०११२.०३।। | नित्य नामाची माळा। जिव्हे घे तूं गळाळा। तो नर कर्मावेगळा। ऐसें बोलती पुराणें |
| ४९० | ।।ज्ञा.गा.०११२.०४।। | नयनीं श्रवणीं हरी। आणिक काम न करी। तो साधु भक्त निर्धारीं। हरिचा आवडता |
| ४९१ | ।।ज्ञा.गा.०११२.०५।। | ज्ञानदेवीं पाहिलें। हरिनाम साधुनी घेतलें। तें समाधीस केलें। पुष्पशयनीं आसन |
| ४९२ | ।।ज्ञा.गा.०११३.०१।। | नाममाला घे पवित्र। अंतीं हेंचि शस्त्र। राम हा महामंत्र। सर्व बाधा निवारी |
| ४९३ | ।।ज्ञा.गा.०११३.०२।। | भवकर्मविख। रामनामीं होय चोख। हरेल भवव्यथा दु:ख। पुढें सुख उपजेल |
| ४९४ | ।।ज्ञा.गा.०११३.०३।। | माळा घाली हेचि गळां। घे अमृताचा गळाळा। होईल वैकुंठीं सोहळा। रामकृष्ण उच्चारणीं |
| ४९५ | ।।ज्ञा.गा.०११३.०४।। | ज्ञानदेवीं माळा केली। सुखाची समाधी साधिली। जिव्हा उच्चारणीं केली। अखंड हरिनाम |
| ४९६ | ।।ज्ञा.गा.०११४.०१।। | समाधीचें साधन। तें रामनाम चिंतन । चित्ता सुखसंपन्न। हर्ष जीवनीं केला |
| ४९७ | ।।ज्ञा.गा.०११४.०२।। | कोटि तपाचिया राशी। जोडती रामनामापाशी। नाम जपतां अहर्निशीं। वैकुंठपद पाविजे |
| ४९८ | ।।ज्ञा.गा.०११४.०३।। | हेंचि धुरूसी आठवलें। उपमन्यें हेंचि घोकिलें। अंबऋषीनें साधिलें। रामकृष्ण उच्चारणीं |
| ४९९ | ।।ज्ञा.गा.०११४.०४।। | पांडवांसि सदा काळीं। कृष्ण राहिला जवळी। ज्ञानदेव हृदयकमळीं। तैसाचि स्थिरावला |
| ५०० | ।।ज्ञा.गा.०११५.०१।। | निरंतर ध्याता हरि। सर्व कर्माची बोहरी। दोष जाती दिगंतरीं। रामकृष्णउच्चारणीं |
| ५०१ | ।।ज्ञा.गा.०११५.०२।। | जप तीर्थ हेंचि नाम। जपव्रत हेंचि नेम। ऐसें धरोनियां प्रेम। तोचि भक्त तरेल |
| ५०२ | ।।ज्ञा.गा.०११५.०३।। | जीव शिव एक करी। शांति क्षमा जरी धरी। त्यापाशीं नित्य श्रीहरि। प्रत्यक्ष आपण उभा असे |
| ५०३ | ।।ज्ञा.गा.०११५.०४।। | ज्ञानदेव म्हणे नित्य। त्याचें वचन तेंचि सत्य। त्याचें वचन सर्व कृत्य। सिद्धी पावेल सर्वथा |
| ५०४ | ।।ज्ञा.गा.०११६.०१।। | जन्म जरा दु:ख बाधा। स्मरतां नाहीं गोविंदा। ऐसा जयासि नित्य धंदा। तोचि सदा सुखरूप |
| ५०५ | ।।ज्ञा.गा.०११६.०२।। | धन्य कुळ धन्य याती।धन्य जन्म पुढती पुढती। भक्तिवीण नाहीं गती। मुखीं हरिनाम उच्चार |
| ५०६ | ।।ज्ञा.गा.०११६.०३।। | विश्वीं विश्व जो व्यापकु। तोचि माझा हरि एकु। त्यासी भक्तिवीण साधकु। नोळखे पैं दुर्बुद्धि |
| ५०७ | ।।ज्ञा.गा.०११६.०४।। | ज्ञानरंजनीं रंजला। ज्ञानबोधें उपजला। ज्ञानदेवीं हरि सेविला। निरंतर सर्वकाळ |
| ५०८ | ।।ज्ञा.गा.०११७.०१।। | संपत्तिविपत्तिदु:ख। हरेल अवघा शोक। वेगीं करूनियां विवेक। हरिस्मरण करीं |

| | | |
|---|---|---|
| ५०९ | ।।ज्ञा.गा.०११७.०२।। | मंत्र यंत्र सूत्रधारी। सिद्ध साध्य तोचि हरि। नित्य जपोनि वैखरी। आप्तता करी हरीसी |
| ५१० | ।।ज्ञा.गा.०११७.०३।। | ध्यान मन एक चित्त । अलक्ष लक्षी अच्युत। न सांगे हिताची मात। अखंड जपे हरिनाम |
| ५११ | ।।ज्ञा.गा.०११७.०४।। | ज्ञानदेवें जप केला। मग समाधीस बैसला। नाम घेतां बोध जाला। देव आला हृदयासी |
| ५१२ | ।।ज्ञा.गा.०११८.०१।। | देवावीण शून्य मुख । नाम न घेतां नाहीं सुख। अंतीं होईल रे दु:ख। नाम नसतां मुखीं |
| ५१३ | ।।ज्ञा.गा.०११८.०२।। | राम कृष्ण गोविंद। हरि माधव परमानंद। नित्य ऐसा जयासि छंद। तोचि सुलभ गर्भवासी |
| ५१४ | ।।ज्ञा.गा.०११८.०३।। | अनंत नाम निरसून। एक मार्ग तोचि मान्य। जेणें जोडे नित्य सौजन्य। तोचि रामकृष्ण उच्चारीं |
| ५१५ | ।।ज्ञा.गा.०११८.०४।। | ज्ञानदेवें अनुमानलें। मग भक्तिसुख साधलें। रामकृष्ण उच्चारिले। जे तारक तिहीं लोकीं |
| ५१६ | ।।ज्ञा.गा.०११९.०१।। | प्रेम जयाचें कथेवरी। तोचि धन्य ये चराचरीं। राम कृष्ण निरंतरीं। मुखीं आवडी जपतसे |
| ५१७ | ।।ज्ञा.गा.०११९.०२।। | धन्य धन्य तोची वंशी। धन्य धन्य माता कुशीं। धन्य धन्य काळ तयासी। रामकृष्ण म्हणतांची |
| ५१८ | ।।ज्ञा.गा.०११९.०३।। | ऐसे धन्य जन्म तयाचे। धन्य धन्य पुण्य साचें। त्यासी भय कळिकाळाचें। नाहीं जन्म घेतलिया |
| ५१९ | ।।ज्ञा.गा.०११९.०४।। | एवढा महिमा नामाचा। धन्य जो राम उच्चारी वाचा। धन्य जन्म तयाचा। ज्ञानदेव म्हणे |
| ५२० | ।।ज्ञा.गा.०१२०.०१।। | नाम प्रल्हाद उच्चारी। तया सोडवी नरहरी। उचलूनि घेतला कडियेवरी। भक्तसुखें निवाला |
| ५२१ | ।।ज्ञा.गा.०१२०.०२।। | नाम बरवया बरवंट। नाम पवित्र आणि चोखट। नाम स्मरे नीळकंठ। निजसुखें निवाला |
| ५२२ | ।।ज्ञा.गा.०१२०.०३।। | जें धुरुसी आठवलें। तेंचि उपमन्यें घोकिलें। तेंचि गजेंद्रा लाधलें। हित जालें तयांचें |
| ५२३ | ।।ज्ञा.गा.०१२०.०४।। | नाम स्मरे अजामेळ। महापातकी चांडाळ। नामें जाला सोज्वळ। आपणांसहित निवाला |
| ५२४ | ।।ज्ञा.गा.०१२०.०५।। | वाटपाडा कोळिकु। नाम स्मरे तो वाल्मिकु। नामें उद्धरिले तिन्ही लोकु। आपणांसहित निवाला |
| ५२५ | ।।ज्ञा.गा.०१२०.०६।। | ऐसें अनंत अपार। नामें तरले चराचर। नाम पवित्र आणि परिकर। रखुमादेविवराचें |
| ५२६ | ।।ज्ञा.गा.०१२१.०१।। | जें शंभूनें धरिलें मानसीं । तेंचि उपदेशिलें गिरिजेसी |
| ५२७ | ।।ज्ञा.गा.०१२१.०२।। | नाम बरवें बरवें। निज मानसीं धरावें |
| ५२८ | ।।ज्ञा.गा.०१२१.०३।। | जे गंगोदकाहुनी निकें। गोडी अमृत जालें फिकें |
| ५२९ | ।।ज्ञा.गा.०१२१.०४।। | शीतळ चंदनाहुनी वरतें। सुंदर सोनियाहुनी परतें |
| ५३० | ।।ज्ञा.गा.०१२१.०५।। | भुक्तिमुक्तिदायक। भवबंधनमोचक |
| ५३१ | ।।ज्ञा.गा.०१२१.०६।। | बाप रखुमादेविवरें। सुलभ नाम दिधलें सोपारें |
| ५३२ | ।।ज्ञा.गा.०१२२.०१।। | भक्तीचें तें ज्ञान वाचें नारायण। दया ते संपूर्ण सर्वांभूतीं |
| ५३३ | ।।ज्ञा.गा.०१२२.०२।। | ज्ञान नारायण ध्यान नारायण। वाचें नारायण सर्वकाळ |
| ५३४ | ।।ज्ञा.गा.०१२२.०३।। | संसारग्रामीं नाम हाचि सांठा। पावाल वैकुंठा नामें एकें |

| | | |
|---|---|---|
| ५३५ | ।।ज्ञा.गा.०१२२.०४।। | गोविंद गोपाळ वाचेसी निखळ। पद पावाल अढळ अच्युताचें |
| ५३६ | ।।ज्ञा.गा.०१२२.०५।। | नामेंचि तरले शुकादिक दादुले। जडजीव उद्धरले कलीयुगीं |
| ५३७ | ।।ज्ञा.गा.०१२२.०६।। | स्मरण करितां वाल्मिक वैखरी। वारुळाभीतरीं रामराम |
| ५३८ | ।।ज्ञा.गा.०१२२.०७।। | सर्वांमाजीं श्रेष्ठ पुण्य भूवैकुंठ। विठ्ठल मूळपीठ जगदोद्धार |
| ५३९ | ।।ज्ञा.गा.०१२२.०८।। | निवृत्ति निरोपण ज्ञानदेवा ध्यान। सर्वत्र नारायण एकरूप |
| ५४० | ।।ज्ञा.गा.०१२३.०१।। | कर्माचिया रेखा। नुलंघिती अशेषा। म्हणोनि विशेषा। केशवसेवा |
| ५४१ | ।।ज्ञा.गा.०१२३.०२।। | रामकृष्णमाळा। घाला पां रे गळां। अखंड जीवनकळा। राम जपा |
| ५४२ | ।।ज्ञा.गा.०१२३.०३।। | करावा विचार । धरावा आचार। करावा परिकर। रामनामीं |
| ५४३ | ।।ज्ञा.गा.०१२३.०४।। | सकळांचा सकळीं। त्यांतें तूं आकळीं। जिव्हा हे वाचाळीं। रामरतीं |
| ५४४ | ।।ज्ञा.गा.०१२३.०५।। | रिघे रे शरण। तुज नाहीं मरण। ठकिसी चरण। श्रीविठ्ठलाचें |
| ५४५ | ।।ज्ञा.गा.०१२३.०६।। | निवृत्तिप्रसादें जोडे। विठ्ठलनामें घडे। ज्ञानदेव बागडे। पंढरिये |
| ५४६ | ।।ज्ञा.गा.०१२४.०१।। | नाम पवित्र आणि परिकरु। कल्पतरूहुनी उदारु। तें तूं धरीं कां रे सधरु। तेणें तरसी भव दुस्तरु |
| ५४७ | ।।ज्ञा.गा.०१२४.०२।। | नरहरि नाम उच्चारीं। तेणें तरसी भवसागरीं |
| ५४८ | ।।ज्ञा.गा.०१२४.०३।। | जपें न लाहसी तपें न लाहसी। क्रियें षट्कर्मे न पवसी। नामें एके रे पावसी। स्वर्गीं अमृतपान |
| ५४९ | ।।ज्ञा.गा.०१२४.०४।। | क्षीर गोड म्हणसी ऐसें। परी तेथेंही वीट असे। नाम उच्चारितां वाचे। कोटि जन्मांचे पातक नासे |
| ५५० | ।।ज्ञा.गा.०१२४.०५।। | मन मारूनियां सायासें। परी तेथेंही अवगुण असे। नाम उच्चारितां वाचे। सकळिक ध्यान डोळां दिसे |
| ५५१ | ।।ज्ञा.गा.०१२४.०६।। | बाप रखुमादेविवरा विठ्ठलाचें। विपायें नाम आलें वाचे। जळती डोंगर कल्मषाचे। भय नाहीं कळिकाळाचें |
| ५५२ | ।।ज्ञा.गा.०१२५.०१।। | यमधर्म सांगे दूता। परिसावी निजकथा। जेथें रामनाम वार्ता। तया देशा न वजावें |
| ५५३ | ।।ज्ञा.गा.०१२५.०२।। | नाम महादोषां हरण। नाम पतीतपावन। नाम कलिमलदहन। भवबंधनमोचक |
| ५५४ | ।।ज्ञा.गा.०१२५.०३।। | जये देशीं नाम वसे। नाम श्रवणीं विश्वासे। गाती नाचती उल्हासें। झणीं पाहाल तयांकडे |
| ५५५ | ।।ज्ञा.गा.०१२५.०४।। | जये ग्रामीं हरिपूजन। जये नगरीं हरिकीर्तन। तेथें गेलिया बंधन। तुम्ही पावाल त्रिशुद्धी |
| ५५६ | ।।ज्ञा.गा.०१२५.०५।। | जये देशीं गरुडटका। कुंचे ध्वज आणि पताका। जेथें संतजन आइका। तया देशा न वजावें |
| ५५७ | ।।ज्ञा.गा.०१२५.०६।। | आणिक एक ऐका रे विचारु। जेथें रामनामाचा गजरु। तेथें बाप रखुमादेविवरु। तयाबळें नागवती |
| ५५८ | ।।ज्ञा.गा.०१२६.०१।। | तत्त्वमस्यादि वाक्य उपदेश। नामाचा अर्धांश नाहीं तेथें। म्हणोनि नामसंकीर्तन करितां। जवळी जोडलासि आतां। क्षणभरी न विसंबे। जिवाचिया जीवना रया |
| ५५९ | ।।ज्ञा.गा.०१२६.०२।। | नामनिजधीर। गर्जती वैष्णव वीर। कळिकाळ यमाचे भार। पळाले तेथें |

| | | |
|---|---|---|
| १४३८ | ।।ज्ञा.गा.०२९८.०३।। | आपुलें केलें तें कांहीं न चले वो आतां। बाप रखुमादेविवरु विठ्ठला देखतां |
| १४३९ | ।।ज्ञा.गा.०२९९.०१।। | कर्मास्तव झालों सौरा। गेलों पंढरपुरा। संतसनकादिकां मेळीं डौर वाईला पुरा |
| १४४० | ।।ज्ञा.गा.०२९९.०२।। | चाल रामा घरा करूं प्रपंचेसी वैरा |
| १४४१ | ।।ज्ञा.गा.०२९९.०३।। | द्वैतभाव कल्पना खोडी सांडी याची आशा। विठ्ठलनाम हेंचि सार जिव्हे प्रेमठसा |
| १४४२ | ।।ज्ञा.गा.०२९९.०४।। | अद्वैत भरीन मन भारीन तोडीन भवपाशा। क्षमा दया धरीन चित्तीं सर्वभूतीं महेशा |
| १४४३ | ।।ज्ञा.गा.०२९९.०५।। | ज्ञान ज्ञेय हाची विचार सर्वमय हरी। दुजेपण न पडे दृष्टी एकपण घरोघरीं |
| १४४४ | ।।ज्ञा.गा.०२९९.०६।। | वासना खोडी वेगीं टाहो करीन रामनामें। पुंडलीक पेठ संताचें माहेर तेथें नाचेन मनोधर्में |
| १४४५ | ।।ज्ञा.गा.०२९९.०७।। | विज्ञान हरि आपणची क्षरला दुजेपणें छंदु थोरु। निष्काम स्वरूप सुत्रधारी खरा एकरूपें हरिहरू |
| १४४६ | ।।ज्ञा.गा.०२९९.०८।। | त्रिकाळ ध्यान त्रिकाळ मन हरपले जेथ। पुरली मनकामना वैकुंठ प्रकट आपणची नाथ |
| १४४७ | ।।ज्ञा.गा.०२९९.०९।। | देहुडा पाउलीं वेणु वाहे विटेवरी नीट। वोळली कामधेनु युगें अठ्ठावीस वाट |
| १४४८ | ।।ज्ञा.गा.०२९९.१०।। | एक वृक्ष क्षरला आपणची जग सर्वघटीं आत्मारामु। ज्ञानदेवो म्हणे आम्हां पंढरपुरीं जाला विश्रामु |
| १४४९ | ।।ज्ञा.गा.०३००.०१।। | विचारितां देहीं अविचार अंबुला। न साहे वो साहिला काय करूं |
| १४५० | ।।ज्ञा.गा.०३००.०२।। | सखी सांगे गोष्टी चाल कृष्णभेटी। आम्ही तुम्ही शेवटीं वैकुंठीं नांदो |
| १४५१ | ।।ज्ञा.गा.०३००.०३।। | येरी सांगे भावो जावे वो प्रवृत्ति । तंव वरी गती येतां नये |
| १४५२ | ।।ज्ञा.गा.०३००.०४।। | ज्ञानदेवो प्रवृत्ति निघालीया तत्परा। हरि आला सत्वरा तया भेटी |
| १४५३ | ।।ज्ञा.गा.०३०१.०१।। | न  गमे हा संसारु म्हणोनी केला भ्रतारु । लोक अनाचारु म्हणती मज |
| १४५४ | ।।ज्ञा.गा.०३०१.०२।। | चंचळ जालीये म्हणतील मज । कवणा सांगूं हें जिवींचें गूज |
| १४५५ | ।।ज्ञा.गा.०३०१.०३।। | बाप रखुमादेविवरा विठ्ठलावांचुनी नेणें । सतत राहणें याचें पायीं |
| १४५६ | ।।ज्ञा.गा.०३०२.०१।। | अद्वैत अंबुला परणीला देखा । दुसरा विचार सांडिला ऐका |
| १४५७ | ।।ज्ञा.गा.०३०२.०२।। | सांडिणी सांडिला पैं घराचारु । दुसरा विचारु नाहीं केला |
| १४५८ | ।।ज्ञा.गा.०३०२.०३।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलेंसी घराचार। ठकला व्यवहार बाईयांनो |
| १४५९ | ।।ज्ञा.गा.०३०३.०१।। | अंबुला माहेरीं भोगी धणीवरी । मग तया श्रीहरि सांगो गूज |
| १४६० | ।।ज्ञा.गा.०३०३.०२।। | माझें सुख मीच भोगीन । क्षेमेंसी निगेन अंगोअंगीं |
| १४६१ | ।।ज्ञा.गा.०३०३.०३।। | सांडुनी कुळाचार जालीये निर्लज्ज । तुम्ही काय मज शिकवाल |
| १४६२ | ।।ज्ञा.गा.०३०३.०४।। | रखुमादेविवरु विठ्ठल मातापिता। मी त्याची दुहिता सर्वांगुणीं |
| १४६३ | ।।ज्ञा.गा.०३०४.०१।। | जियेचा अंबुला रूसुनीयां जाये। तयेचें जीवित्व जळो गे माय |

| | | |
|---|---|---|
| १४६४ | ।।ज्ञा.गा.०३०४.०२।। | आम्ही रुसों नेणों आम्ही रुसों नेणों । अंबुलिया रुसों नेदू गे बाईये |
| १४६५ | ।।ज्ञा.गा.०३०४.०३।। | ज्याच्यानी अंगें जोडला हा ठावो। रखुमादेविवरु नाहो बुझाविला |
| १४६६ | ।।ज्ञा.गा.०३०५.०१।। | अष्टभावें भोगितां न पुरे धणी । देह उगाणी केली देखा |
| १४६७ | ।।ज्ञा.गा.०३०५.०२।। | अंबुला निघाला अंबुल्या गांवा । मी वो तया सवा जातू असें |
| १४६८ | ।।ज्ञा.गा.०३०५.०३।। | रखुमादेविवरु लागलासे चोरु । मार्ग बुडविला घराचारु |
| १४६९ | ।।ज्ञा.गा.०३०६.०१।। | दुरळु अंबुला केला गे बाई । ब्रह्मादिकां तो न पडे ठाई |
| १४७० | ।।ज्ञा.गा.०३०६.०२।। | हालों नये चालों नये । सैरावैरा कांहीं बोलों नये |
| १४७१ | ।।ज्ञा.गा.०३०६.०३।। | अंबुला केला धावे जरी मन । बुडती बेताळीस जाती नाक कान |
| १४७२ | ।।ज्ञा.गा.०३०६.०४।। | मागील केलें तें अवघेंची वावो । बाप रखुमादेविवरु विठ्ठलु नाहो |
| १४७३ | ।।ज्ञा.गा.०३०७.०१।। | सुची अंबुला ज्ञान घराचारु । भक्ति हे साकारु आवडली |
| १४७४ | ।।ज्ञा.गा.०३०७.०२।। | काय सांगूं माय निर्गुण अंबुला । शून्यीं मिळाला नाहीं ठाईं |
| १४७५ | ।।ज्ञा.गा.०३०७.०३।। | रखुमादेविवरु साकार अंबुला । मज पूर्ण आला बाई येवो |
| १४७६ | ।।ज्ञा.गा.०३०८.०१।। | अंबुला विकून घेतली वस्तु। घराचार समस्तु बुडविला |
| १४७७ | ।।ज्ञा.गा.०३०८.०२।। | उठोनी गेलिये अज्ञान म्हणाल । म्यां तंव कैवल्य जोडियेलें |
| १४७८ | ।।ज्ञा.गा.०३०८.०३।। | अंबुला सांडुनी परावा केला । संसार सांडिला काय सांगों |
| १४७९ | ।।ज्ञा.गा.०३०८.०४।। | रखुमादेविवरें मज पर्णुनी नेलें । सुखची दिधलें काय सांगों |
| १४८० | ।।ज्ञा.गा.०३०९.०१।। | सगुण अंबुला निर्गुण पैं जाला । घराचार समस्त बुडविला |
| १४८१ | ।।ज्ञा.गा.०३०९.०२।। | आशा हे सासु असतां बुडविली । शांति माऊली भेटों आली |
| १४८२ | ।।ज्ञा.गा.०३०९.०३।। | रखुमादेविवर विठ्ठलेंसी चाड । अद्वैतेंसी माळ घेऊनी ठेलें |
| १४८३ | ।।ज्ञा.गा.०३१०.०१।। | अंबुला होता तो लेंकरू जाला । घराचार बुडविला बाईयांनो |
| १४८४ | ।।ज्ञा.गा.०३१०.०२।। | झणी अकुळी म्हणाल उणें । तुम्ही जाणते जाणा परमार्थ खुणें |
| १४८५ | ।।ज्ञा.गा.०३१०.०३।। | रखुमादेविवरें विठ्ठलें भोगियलें । लंपट जहालिये सहजानंदीं |
| १४८६ | ।।ज्ञा.गा.०३११.०१।। | स्वरूपाचेनी भानें बिंब हें ग्रासिलें । परी खुण न बोले काय करूं । रूपाचा दर्पण रूपेंवीण पाहिला । द्रष्टाहि निमाला नवल कायी |
| १४८७ | ।।ज्ञा.गा.०३११.०२।। | जिकडे जाय तिकडे दर्शन सांगाती । उदो ना अस्तु हे नाहीं द्वैतस्थिति |
| १४८८ | ।।ज्ञा.गा.०३११.०३।। | पूर्वबिंब शून्य हे शब्दचि निमाले । अनाम्याचेनी भलें होतें सुखें । त्यासी रूप नांव ठाव संकल्पें आणिला । अरूपाच्या बोला नाम ठेला |

| | | |
|---|---|---|
| १४८९ | ।।ज्ञा.गा.०३११.०४।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलुचि एक । भोगी समसुख ऐक्यपणें । अदृश्य अंबुला जागतां निवविजे । परी सेज स्वभावीं दुजें नाहीं रया |
| १४९० | ।।ज्ञा.गा.०३१२.०१।। | सुखाचा निधि सुखसागर जोडला । म्हणोनि काळा दादुला मज पाचारी गे माये |
| १४९१ | ।।ज्ञा.गा.०३१२.०२।। | प्रेम नव्हाळी मज झाली दिवाळी । काळें वनमाळी आले घरा गे माये |
| १४९२ | ।।ज्ञा.गा.०३१२.०३।। | बाप रखुमादेविवर पुरोनी उरला । सबाह्यजु भरला माझे ह्रदयीं गे माये |
| १४९३ | ।।ज्ञा.गा.०३१३.०१।। | वर्‍हाड न होतां होतों खेळेमेळे । लग्न लागलें कवणें दृष्ट वेळे । तेथुनी अंबोला चालवितो मातें । कैसेनी येथें निस्तरावें |
| १४९४ | ।।ज्ञा.गा.०३१३.०२।। | मौनेंची घरवात कराविंयाची । चाड नाहीं मज या जिवाची गे माय |
| १४९५ | ।।ज्ञा.गा.०३१३.०३।। | आया बायांनो ऐका वो न्यावो । येकांती सदा वसता हे नाहो । अंगभोगा नाहीं ऐसा दुरावो । गरुवार होतसे हाची नवलाहो |
| १४९६ | ।।ज्ञा.गा.०३१३.०४।। | एखादे वेळे मजचि मारितोसी । लाजा मी सांगों कोणापासी । राग आलिया अवघेया ग्रासी । ऐसी अति प्रीति आम्हां दोघांसी |
| १४९७ | ।।ज्ञा.गा.०३१३.०५।। | म्हातारा असला काय माये । रूप ना वर्ण हात ना पाये । तरुणी आपुलें रूप ना साहे । क्षणभरी या वेगळी न राहे |
| १४९८ | ।।ज्ञा.गा.०३१३.०६।। | पिसुणा देखतां बुझाविलें माये । बुझवाणी माझी शब्द न साहे । बाप रखुमादेविवरु विठ्ठलु पाहे । पहातें पाहाणें जालें गे माय |
| १४९९ | ।।ज्ञा.गा.०३१४.०१।। | अवचित परवडी जालिये अंबुलिया । लाजिले आपुलिया सकळ गोता |
| १५०० | ।।ज्ञा.गा.०३१४.०२।। | एकांतीचें सुख भोगी आपुलिया सरिसी । दोहींची सरसी गती झाली |
| १५०१ | ।।ज्ञा.गा.०३१४.०३।। | बाप रखुमादेविवर विठ्ठला लाधला । मज घेऊनी गेला बाईये वो |
| १५०२ | ।।ज्ञा.गा.०३१५.०१।। | अंबुला विकुनी पवित्र झाली । पोटींचीं बाळें कौतुकीं मारिलीं |
| १५०३ | ।।ज्ञा.गा.०३१५.०२।। | पापा वेगळी मी जाले वो नारी । विठ्ठला घरीं नांदतसे |
| १५०४ | ।।ज्ञा.गा.०३१५.०३।। | आशा तृष्णा नणंदा मारिल्या । शेजारीं राहविल्या संतसंगें |
| १५०५ | ।।ज्ञा.गा.०३१५.०४।। | बाप रखुमादेविवर विठ्ठल भोगिला । मज पैं लाधला गुणेवीण |
| १५०६ | ।।ज्ञा.गा.०३१६.०१।। | पांचही वर्‍हाडी पांचा ठायीं बोळविली । येरा दिधली मिठी देखा |
| १५०७ | ।।ज्ञा.गा.०३१६.०२।। | आंबुलियाचें सुख माझें मी भोगी । सेवेशीं रिघे अंगोअंगीं |
| १५०८ | ।।ज्ञा.गा.०३१६.०३।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठल जोडला । वेव्हारा मुकला बाईये वो |
| १५०९ | ।।ज्ञा.गा.०३१७.०१।। | गरुवार जाली अंबुला व्याली । व्येउनीया मेली माझ्या ठायीं |
| १५१० | ।।ज्ञा.गा.०३१७.०२।। | जेथें ठाव ना ठेवणी निघाली कोनी । तेथें सुईणी हात नाहीं |
| १५११ | ।।ज्ञा.गा.०३१७.०३।। | बाप रखुमादेविवरा विठ्ठलीं शेजबाज । सहज सहजाकार अंबुला देखा |
| १५१२ | ।।ज्ञा.गा.०३१८.०१।। | एकुची एकला जाला पैं दुसरा । एकीमेकी सुंदरा खेळविती |
| १५१३ | ।।ज्ञा.गा.०३१८.०२।। | माझीये कडीये तान्हा तुझीये कडीये कान्हा । देवकी यशोदा विस्मो करिती मनीं |
| १५१४ | ।।ज्ञा.गा.०३१८.०३।। | बाप रखुमादेविवरु आवडे मना । जगत्रजिवनु कान्हा बाईयांनो |

| | | |
|---|---|---|
| १५१५ | ।।ज्ञा.गा.०३१९.०१।। | काय सांगूं तूंतें बाई काय सांगूं तूंतें |
| १५१६ | ।।ज्ञा.गा.०३१९.०२।। | जात होते यमुने पाणिया वातत भेतला सांवला । दोईवल तोपी मयुल पुछाची खांद्यावली कांबला |
| १५१७ | ।।ज्ञा.गा.०३१९.०३।। | तेणें माझी केली तवाली मग मी तेथूनी पलाली । पलतां पलतां घसलून पलली । दोईची घागल फुतली |
| १५१८ | ।।ज्ञा.गा.०३१९.०४।। | माझे घुलगे फुतले । मग मी ललत बथले । तिकून आले शालंगपानी । मला पोताशीं धलिलें |
| १५१९ | ।।ज्ञा.गा.०३१९.०५।। | मला पोताशी धलिलें माझें समाधान केलें । निवृत्तीचे कृपें सुख हें ज्ञानदेवा लाधलें |
| १५२० | ।।ज्ञा.गा.०३२०.०१।। | होय सौरी आतां उघडा घाली माथा । परपुरुषीं रमल्या बाई त्याची पतिव्रता |
| १५२१ | ।।ज्ञा.गा.०३२०.०२।। | कर्मेवीण सौरी झालें संतापाशीं । ज्ञान डौर घेऊनि करी लिंग देह नाशी |
| १५२२ | ।।ज्ञा.गा.०३२०.०३।। | रांडव राहू नका बाई पाहुनी करा वर । तेणें तुम्ही सुखी व्हाल आह्यव मरण बरें |
| १५२३ | ।।ज्ञा.गा.०३२०.०४।। | रांडवा ज्या ज्या मरती बाई त्यासी नाना योनी । स्वामी करुनी सुखी होई खुंटती येणीं जाणीं |
| १५२४ | ।।ज्ञा.गा.०३२०.०५।। | निवृत्तिप्रसादें ज्ञानदेव बोले । स्वामी करुनी सुखी होई निजानंदीं डोले |
| १५२५ | ।।ज्ञा.गा.०३२१.०१।। | भावाची मी सौरी जाले गेले संतापाशीं । ज्ञानखड्ग घेउनि हातीं लिंगदेही नाशी |
| १५२६ | ।।ज्ञा.गा.०३२१.०२।। | चाल माझी विठो । तुम्ही आम्ही भेटो |
| १५२७ | ।।ज्ञा.गा.०३२१.०३।। | तीन माचवे पाच गाते । त्यावर निजले होते । फटफटीत उजेड पडदा खाटले पडले रिते |
| १५२८ | ।।ज्ञा.गा.०३२१.०४।। | देव नेणे धर्म नेणे आणिक नेणे कांहीं । म्हणे ज्ञानदेव आम्हां येणें जाणें नाहीं |
| १५२९ | ।।ज्ञा.गा.०३२२.०१।। | संसार वो ग्रामीं गेला सांडुनी । माझे अंत:करणीं माहियेर |
| १५३० | ।।ज्ञा.गा.०३२२.०२।। | सासुरवासिनी मी वो परदेशिनी । कां नये अझुनी मूळ मज |
| १५३१ | ।।ज्ञा.गा.०३२२.०३।। | आणिक एक अवधारा । मज दिधलें हीनवरा । माझें कांहीं सर्वेश्वरा न विचारिशी |
| १५३२ | ।।ज्ञा.गा.०३२२.०४।। | व्याली वेदना जाणे वांझ कांहीं नेणे । बालक काय जाणे तहान भूक |
| १५३३ | ।।ज्ञा.गा.०३२२.०५।। | तैसी ते नव्हे लेकुराची माये । कृष्ण माझी धाये मोकलिते |
| १५३४ | ।।ज्ञा.गा.०३२२.०६।। | आशा मनशा तृष्णा कल्पना चौघी नणंदा । पापीण रे चिंता सासू माझी |
| १५३५ | ।।ज्ञा.गा.०३२२.०७।। | सासुरा हा स्वार्थ कांहीं न विचारी परमार्थ । आतां करीन घात तयावरी |
| १५३६ | ।।ज्ञा.गा.०३२२.०८।। | दुरळ हा प्रपंच दुष्ट भावें दीर । इहीं मज थोर कष्टविलें |
| १५३७ | ।।ज्ञा.गा.०३२२.०९।। | काम क्रोध थोर बोलती बडिवार । मज म्हणती पोर निर्दैवाचें |
| १५३८ | ।।ज्ञा.गा.०३२२.१०।। | नैश्वर गहिवरु दाटतसे गळां । आसुवें ढळढळां गळताती |
| १५३९ | ।।ज्ञा.गा.०३२२.११।। | सासुरयाचे घरीं करीत होतें काम । अवचित विंदान मांडियेलें |
| १५४० | ।।ज्ञा.गा.०३२२.१२।। | घरा सोळा सांधी बहात्तर कोठें । नवही दारवंटे झाडीत होते |

| | | |
|---|---|---|
| १५४१ | ।।ज्ञा.गा.०३२२.१३।। | चोळी साउलें हिरोनी घेतलें । उघडे पाठविलें माहेराशी |
| १५४२ | ।।ज्ञा.गा.०३२२.१४।। | समर्थाची लेकी परी मी संतांची पोसणी । विमानीं बैसोनि जाते देखा |
| १५४३ | ।।ज्ञा.गा.०३२२.१५।। | बाप चक्रधरा रखुमादेविवरा । उबगला संसारा येऊं नेदी |
| १५४४ | ।।ज्ञा.गा.०३२३.०१।। | पतीचा जिव्हाळा म्हणोनी सासुऱ्याचे साहिजे । येऱ्हवीं वाहिजे चामाची मोट |
| १५४५ | ।।ज्ञा.गा.०३२३.०२।। | न पाहे वास न धरी मनीं आस । वायां निकण भूस काय उपणिसी |
| १५४६ | ।।ज्ञा.गा.०३२३.०३।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलुचि पुरे । चाड नाहीं आम्हां दुजेवीण |
| १५४७ | ।।ज्ञा.गा.०३२४.०१।। | निळिये मंडळी नीळवर्ण सांवळी । तेथें वेधलिसे बाळीं ध्यानरूपा |
| १५४८ | ।।ज्ञा.गा.०३२४.०२।। | वेधु वेधला निळा पाहे घननीळा । विरहिणी केवळा रंग रसनें |
| १५४९ | ।।ज्ञा.गा.०३२४.०३।। | नीळवर्ण अंभ नीळवर्ण स्वयंभ । वेधें वेधु न लभे वैकुंठीचा |
| १५५० | ।।ज्ञा.गा.०३२४.०४।। | ज्ञानदेव निळीं हृदयीं सांवळी । प्रेमरसें कल्लोळीं बुडी देत |
| १५५१ | ।।ज्ञा.गा.०३२५.०१।। | नीळवर्ण रजे नीळवर्ण बुझे । निळिमा सहजे आकारली |
| १५५२ | ।।ज्ञा.गा.०३२५.०२।। | नीळ प्रभा दिसे नीळपणें वसे । निळिया आकाशे हारपलें |
| १५५३ | ।।ज्ञा.गा.०३२५.०३।। | निळेंपण ठेलें निळिये गोविलें । निळेंपण सोविळे आम्हां जालें |
| १५५४ | ।।ज्ञा.गा.०३२५.०४।। | ज्ञानदेवीं निळा परब्रह्मीं गोंवला । कृष्णमूर्ति सांवळा हृदयीं वसे |
| १५५५ | ।।ज्ञा.गा.०३२६.०१।। | निळिये पेरणी निळियेपणीं खाणी । गुणाचीं लेणीं कृष्णवर्ण |
| १५५६ | ।।ज्ञा.गा.०३२६.०२।। | नवलाव गे माये नवल चोज । निळीं निळिमा काज आकारलें |
| १५५७ | ।।ज्ञा.गा.०३२६.०३।। | नीळवर्ण तनु नीळवर्ण गुणू । निळी निळिमा पूर्णू हृदयीं नांदे |
| १५५८ | ।।ज्ञा.गा.०३२६.०४।। | ज्ञानदेवीं लीला मन मनीं निवाला । निळिये अवलीला हरपला |
| १५५९ | ।।ज्ञा.गा.०३२७.०१।। | निळें हें व्योम निळें हें सप्रेम । निळेपणें सम आकारलें |
| १५६० | ।।ज्ञा.गा.०३२७.०२।। | नीळवर्ण ब्रह्म नीळवर्ण कर्म । नीळवर्ण आश्रम गुरु देखे |
| १५६१ | ।।ज्ञा.गा.०३२७.०३।। | निळेपणें वर्तो निळेपणें खातों । निळेपण पहातों निळेपणें |
| १५६२ | ।।ज्ञा.गा.०३२७.०४।। | ज्ञानदेव आला नीळवर्ण शाळा । निळेपण गोंवळा रातलिये |
| १५६३ | ।।ज्ञा.गा.०३२८.०१।। | निळिये रजनीं वाहे मोतिया सारणी । निळेपणें खाणी सांपडली |
| १५६४ | ।।ज्ञा.गा.०३२८.०२।। | आंगणीं चिंतामणी जलधरु सिंपणी । अमृत साजणी जीवनकळा |
| १५६५ | ।।ज्ञा.गा.०३२८.०३।। | सुमनाचे शेजे विरहिणी विराजे । शयनीं सुलजे आरळ सेज |
| १५६६ | ।।ज्ञा.गा.०३२८.०४।। | माजयानें हटीं मुखकमळ टेंकी । निळिये अवलोकीं कृष्णमूर्ति |

| | | |
|---|---|---|
| १५६७ | ।।ज्ञा.गा.०३२८.०५।। | कमळणी आमोद सुस्वाद मकरंद । चंदनाची अभेद उटी अंगीं |
| १५६८ | ।।ज्ञा.गा.०३२८.०६।। | कर्पूरपरिमळें दिव्य खाद्य फळें ठेऊनि सोज्वळें वाट पाहे |
| १५६९ | ।।ज्ञा.गा.०३२८.०७।। | मन तो निळिये गोविंदाचिये सोसे । विरहिणी पाहे वाटुनी ऐसें |
| १५७० | ।।ज्ञा.गा.०३२८.०८।। | ज्ञानदेवीं निळिये वाटुनी गोविंदीं । कृष्ण निळिये पदीं ठाव जाला |
| १५७१ | ।।ज्ञा.गा.०३२९.०१।। | निळिये सारणीं वाहे मोतियाचें पाणी । चिंतामणी अंगणीं पेरियेला |
| १५७२ | ।।ज्ञा.गा.०३२९.०२।। | कैसा हा माव करूं गोविला संसारु । कृष्णसंगे धुरंधरु तरलों आम्ही |
| १५७३ | ।।ज्ञा.गा.०३२९.०३।। | हिरियाची खाणी दिव्य तेज मणी । सांपडला अंगणीं सये मज |
| १५७४ | ।।ज्ञा.गा.०३२९.०४।। | सूर्यकर रश्मी चंद्र अहमस्मी । प्रकट झाल्या रश्मी जेथूनियां |
| १५७५ | ।।ज्ञा.गा.०३२९.०५।। | कल्पतरु चोखु चिंतामणी वेखु । मनामाजीं हरिखु देखियेला |
| १५७६ | ।।ज्ञा.गा.०३२९.०६।। | ज्ञानदेवीं वल्ली विद्युल्लता सलिलीं । फळपाकें दुल्ली दुभिनल्या |
| १५७७ | ।।ज्ञा.गा.०३३०.०१।। | सुनीळ गगना पालटु तैसा दिसे अंगीं नटु । कृष्णीं बाणलासे नीळवर्णु गे माये |
| १५७८ | ।।ज्ञा.गा.०३३०.०२।। | यमुनेच्या पाबळीं तनु घेउनी सांवळी । पांवा वनमाळी वातु असे |
| १५७९ | ।।ज्ञा.गा.०३३०.०३।। | पांवयाचेनि नादें कृष्णाचेनि वेधें अमृतघनु वोळला। आकाश वोळुनी वर्षाव झाला ब्रह्मरसपूर आला रे |
| १५८० | ।।ज्ञा.गा.०३३०.०४।। | कान्हा अति सुंदर वदनारविंद। आळी सेविती अनिवार रे आयो |
| १५८१ | ।।ज्ञा.गा.०३३०.०५।। | चंदनादि टिळकु लल्लाटीं जया साजे मोर विसांवेटी रे आयो। सुरतरुकुसुमें कबरीं भारु रे कुंडलें झळकती कपोळीं रे आयो |
| १५८२ | ।।ज्ञा.गा.०३३०.०६।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलु रे। त्रिभुवनजनमोहन रे आयो |
| १५८३ | ।।ज्ञा.गा.०३३१.०१।। | काळेपणाचा आवो अंबरीं बाणला । तो एकु दादुला देखियेला डोळां |
| १५८४ | ।।ज्ञा.गा.०३३१.०२।। | काळें मनुष्य मानव जालें। अरूप रूपा आलें गोविंदपणें |
| १५८५ | ।।ज्ञा.गा.०३३१.०३।। | रखुमादेविवरु विठ्ठलु सहोदरु । त्यानें माझा वेव्हारु बहु काळें नेला गे माये |
| १५८६ | ।।ज्ञा.गा.०३३२.०१।। | मन मुरडोनी डोळां लेइलें। काळेपणें मिरवलें रूप त्याचें |
| १५८७ | ।।ज्ञा.गा.०३३२.०२।। | बरवें रूप काळें अमोलिक। म्हणोनि सांगतसे शुद्ध भावें |
| १५८८ | ।।ज्ञा.गा.०३३२.०३।। | बाप रखुमादेविवरु अगाध काळें। म्हणोनि सर्वत्र व्योम अर्पियलें |
| १५८९ | ।।ज्ञा.गा.०३३३.०१।। | नवाहुनी परतें तेराहुनी आरुतें। अंबरेंहुनी परतें काळें दिसे |
| १५९० | ।।ज्ञा.गा.०३३३.०२।। | तेथें सातही मावळलीं पांचांहुनि परतें। बहुकाळें निरुतें देखिलें डोळां |
| १५९१ | ।।ज्ञा.गा.०३३३.०३।। | तेथें सत्रावी दुभतें योगिया पुरतें। बहुकाळ निरुतें सारासार देखा |
| १५९२ | ।।ज्ञा.गा.०३३३.०४।। | बाप रखुमादेविवरु अभोक्ता भोगिला। काळेपणें जाला अमोलिक |

| | | |
|---|---|---|
| १५९३ | ।।ज्ञा.गा.०३३४.०१।। | सांवळेचें तेज सांवळें बिंबलें। प्रेम तें घातलें हृदयघटीं |
| १५९४ | ।।ज्ञा.गा.०३३४.०२।। | निरालंब बाज निरालंब तेज। चित्तरस निज निजतेजें |
| १५९५ | ।।ज्ञा.गा.०३३४.०३।। | आदिमध्यअंत राहिला अनंत। न दिसे द्वैताद्वैत आत्मा रया |
| १५९६ | ।।ज्ञा.गा.०३३४.०४।। | ज्ञानदेवीं सोय अवघाचि सामाय। सुखदु:ख माय आम्हां नाहीं |
| १५९७ | ।।ज्ञा.गा.०३३५.०१।। | सावळियाचें तेज सांवळा श्रीहरि। शेजबाजवोवरी ब्रह्मांडाची |
| १५९८ | ।।ज्ञा.गा.०३३५.०२।। | गृहदारा दिनमणी तेज देऊनी मेदिनी। मेरूप्रदक्षणि आप होये |
| १५९९ | ।।ज्ञा.गा.०३३५.०३।। | ऐसा हा सांवळा सतेज साजणी। म्यां आपुल्या अंगणीं देखियेला |
| १६०० | ।।ज्ञा.गा.०३३५.०४।। | ज्ञानदेवा साजण सांवळिये प्रभेचें। मी माझें मोहाचें हरिरूप |
| १६०१ | ।।ज्ञा.गा.०३३६.०१।। | नवल देखिलें कृष्णरूप बिंब। सांवळी स्वयंभ मूर्ति हरीची |
| १६०२ | ।।ज्ञा.गा.०३३६.०२।। | मन निवालें समाधान जालें। कृष्णरूपें बोधलें मन माझें |
| १६०३ | ।।ज्ञा.गा.०३३६.०३।। | बाप रखुमादेविवरु सांवळा सर्व घटीं। चित्त चैतन्या मिठी घालीत खेवो |
| १६०४ | ।।ज्ञा.गा.०३३७.०१।। | हरपली सत्ता मुराली वासना। सांवळाचि नयना दिसतसे |
| १६०५ | ।।ज्ञा.गा.०३३७.०२।। | काय करूं माय सांवळा श्रीकृष्ण। सांगितला प्रश्न निवृत्तीनें |
| १६०६ | ।।ज्ञा.गा.०३३७.०३।। | बाप रखुमादेविवरु सांवळीये तेज। सेजबाज निज कृष्णसुखें |
| १६०७ | ।।ज्ञा.गा.०३३८.०१।। | चतुरपणें चतुराननु पैं भागला। शिवुपणें शिवरूपु पैं जाहला |
| १६०८ | ।।ज्ञा.गा.०३३८.०२।। | हरिपणें हरि अंग रिघाला। या तिहींचा मेळा न दिसे गे माये |
| १६०९ | ।।ज्ञा.गा.०३३८.०३।। | बाप रखुमादेविवरु तिहीं गुणां वेगळा। शक्ति नव्हे दादुला गे माये |
| १६१० | ।।ज्ञा.गा.०३३९.०१।। | चंचळ चांदिणें सोमविणें भासलें। तेज निमालें रविबिंबेविणें |
| १६११ | ।।ज्ञा.गा.०३३९.०२।। | जगत्रजीवनु म्हणे जगासी कारण। तें अणुप्रमाण तेथें दिसे |
| १६१२ | ।।ज्ञा.गा.०३३९.०३।। | बाप रखुमादेविवरु अणुप्रमाण भासला। सगुण निर्गुण जाला बाई ये वो |
| १६१३ | ।।ज्ञा.गा.०३४०.०१।। | मूळ ना डाळ शाखा ना पल्लव। तो हा कैसा देव आम्हां घरीं |
| १६१४ | ।।ज्ञा.गा.०३४०.०२।। | निर्गुणपणें उभा सगुणपणें शोभा। जिवींशिवीं प्रभा दावितां हे |
| १६१५ | ।।ज्ञा.गा.०३४०.०३।। | न कळे याची गती न कळे याची लीळा। आपिआप सोहळा भोगितसे |
| १६१६ | ।।ज्ञा.गा.०३४०.०४।। | ज्ञानदेव म्हणे न कळे याची थोरी। आपण चराचरीं नांदतसे |
| १६१७ | ।।ज्ञा.गा.०३४१.०१।। | ज्ञानविज्ञान हरि नांदे आमुच्या घरीं। बाह्यजु अभ्यंतरीं जाला देव |
| १६१८ | ।।ज्ञा.गा.०३४१.०२।। | काय सांगूं माय त्रिभुवन धाय। पाहतां न समाय नाना रूपीं |

| | | |
|---|---|---|
| १६१९ | ।।ज्ञा.गा.०३४१.०३।। | चढत्या वाढत्या गोष्टी प्रगट दिसे घटीं। नानारूपें वैकुंठीं नेऊन घाली रया |
| १६२० | ।।ज्ञा.गा.०३४१.०४।। | ज्ञानदेवा गोडी हरिपदीं आवडी। प्रवृत्तीची थडी उलंडिली |
| १६२१ | ।।ज्ञा.गा.०३४२.०१।। | विज्ञानाचें ज्ञान अज्ञानीं घनवट। ज्ञानें अज्ञान नीट लाविलें दिसे |
| १६२२ | ।।ज्ञा.गा.०३४२.०२।। | मी तूं हे मात हरपले दृष्टांत। हृदयीं हृदयस्थ निजतेजें |
| १६२३ | ।।ज्ञा.गा.०३४२.०३।। | साकार निराकार शून्याशून्य दिठा। रूपीं रूपवाटा हरि माझा |
| १६२४ | ।।ज्ञा.गा.०३४२.०४।। | बाप रखुमादेविवरु हृदयस्थ घटीं। बिंबोनि उफराटी कळा दिसे |
| १६२५ | ।।ज्ञा.गा.०३४३.०१।। | सारासार दोन्ही न दिसती नयनीं। अवचिता गगनीं बिंबलासे |
| १६२६ | ।।ज्ञा.गा.०३४३.०२।। | लोपले रविशशी तेज न माये आकाशीं। मेघ:श्यामें मेघाशीं लपविलें |
| १६२७ | ।।ज्ञा.गा.०३४३.०३।। | दिव्य रूप तेज तीव्र ना तेजबीज। कुंडली विराजे लोपलें सूर्यो |
| १६२८ | ।।ज्ञा.गा.०३४३.०४।। | ज्ञानदेवा ध्यान मनाचेंही मन। हरिचरण स्थान दृढ केलें |
| १६२९ | ।।ज्ञा.गा.०३४४.०१।। | स्वरूपीं पाहतां बिंबीं बिंब उमटे। ते मेघ:श्याम दाटे बुंथी मनीं |
| १६३० | ।।ज्ञा.गा.०३४४.०२।। | चित्त वित्त हरि जाला वो साजणी। अवचिता अंगणीं म्यां देखियेला |
| १६३१ | ।।ज्ञा.गा.०३४४.०३।। | सांवळा डोळसु चतुर्भुज रूपडें। दिसे चहूंकडे एकतत्त्व |
| १६३२ | ।।ज्ञा.गा.०३४४.०४।। | ज्ञानदेव म्हणे द्वैत निरसुनी पाही। एका रूपा सोयी बाही तरशील |
| १६३३ | ।।ज्ञा.गा.०३४५.०१।। | मनाचा भाव माझा खुंटला हरिध्यानें। अवघेंचि येणें मनें काळापिवन केलें |
| १६३४ | ।।ज्ञा.गा.०३४५.०२।। | लघु म्हणों तरी सूक्ष्महि नव्हे। सूक्ष्म म्हणों तरी अगाधही नव्हे। या काळियाची जाली गे माये |
| १६३५ | ।।ज्ञा.गा.०३४५.०३।। | बाप रखुमादेविवरु सुनीळ नीळ काळा। अवघ्या सहित गोपाळा बुडी दिधली गे माये |
| १६३६ | ।।ज्ञा.गा.०३४६.०१।। | बावनाचे संगती द्रुमभावें रातलें। सेखीं आपुलिया मुकलें जातीकुळा |
| १६३७ | ।।ज्ञा.गा.०३४६.०२।। | लोहाचें सायास परिसेंसी फिटले। तैसें मज केलें गोवळ्यानें |
| १६३८ | ।।ज्ञा.गा.०३४६.०३।। | मेघजळ वोळे मिळे सिंधूचिया जळा। तैसा नव्हे तो वेगळा एक होऊनि ठेला |
| १६३९ | ।।ज्ञा.गा.०३४६.०४।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलीं नुरेचि कांहीं। उत्तम मध्यम ठायीं व्यापूनि असे |
| १६४० | ।।ज्ञा.गा.०३४७.०१।। | जें ब्रह्मीं पाहतां मन न सिरे कोठें। ऐसियाचे पेठे मज उभें केलें |
| १६४१ | ।।ज्ञा.गा.०३४७.०२।। | नावाडा श्रीरंगु जाहला हळुवारु। तेणें पावविला पारु ब्रह्मविद्येचा |
| १६४२ | ।।ज्ञा.गा.०३४७.०३।। | श्रीगुरुवीण सर्व शून्य हेंचि मी जाणें। तेथिचिये खुणें निवृत्तिराजु |
| १६४३ | ।।ज्ञा.गा.०३४७.०४।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलीं अनुसंधान। रात्रिदिन लीन ब्रह्मस्थिति |
| १६४४ | ।।ज्ञा.गा.०३४८.०१।। | नवांची खाणी दहाव्यानें शोकिली। अकराव्यानें जाली देशधडी |

| | | |
|---|---|---|
| १६४५ | ।।ज्ञा.गा.०३४८.०२।। | तें ब्रह्मपंथीं माखलें ब्रह्मपंथीं माखलें। मरोनि जागृत जालें मन गे माये |
| १६४६ | ।।ज्ञा.गा.०३४८.०३।। | अवघें अंबर माझें तिंबलें। ब्रह्मरसें पिळिलें वो रंग नव्हे |
| १६४७ | ।।ज्ञा.गा.०३४८.०४।। | सारवियोगें माझें कर्म बुडालें। निष्कर्म जालें म्हणोनी नातळे |
| १६४८ | ।।ज्ञा.गा.०३४८.०५।। | जागृति स्वप्न बुडाली। रखुमादेविवरें सहित गिळिली |
| १६४९ | ।।ज्ञा.गा.०३४९.०१।। | ब्रह्माची पुतळी मीचि पैं जालों। ब्रह्मचि लेईलों अंजन गे माय |
| १६५० | ।।ज्ञा.गा.०३४९.०२।। | ब्रह्मचि सुख ब्रह्मपदीं पावलों। ब्रह्मसुखीं निवालों निजीं निज देखा |
| १६५१ | ।।ज्ञा.गा.०३४९.०३।। | बाप रखुमादेविवरु ब्रह्मपदीं सामावला। मजसहित घेउनी गेला निजपुटीं |
| १६५२ | ।।ज्ञा.गा.०३५०.०१।। | सिद्ध सांडूनि निजबोधा गेलें। निजबोधु मुकलें ब्रह्मभुली |
| १६५३ | ।।ज्ञा.गा.०३५०.०२।। | आठवेना माझें पूर्वजन्मग्राम। अवघाचि श्रम माझा हिरोनियां नेला |
| १६५४ | ।।ज्ञा.गा.०३५०.०३।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलें वेडावलें। आपणासहित मज ब्रह्मीं बुडविलें |
| १६५५ | ।।ज्ञा.गा.०३५१.०१।। | मन हें राम जालें मन हें राम जालें। प्रवृत्ति ग्रासुनी कैसें निवृत्तीसी आलें |
| १६५६ | ।।ज्ञा.गा.०३५१.०२।। | श्रवण कीर्तन पादसेवन कैसें विष्णुस्मरण केलें। अर्चन वंदन दास्य सख्य आत्मनिवेदन केलें |
| १६५७ | ।।ज्ञा.गा.०३५१.०३।। | यम नियम प्राणायाम प्रत्याहार संपादिलें। ध्यान धारणा आसन मुद्रा कैसें समाधीसी आलें |
| १६५८ | ।।ज्ञा.गा.०३५१.०४।। | बोधीं बोधलें बोधितां नये ऐसें जालें। बाप रखुमादेविवरु विठ्ठलें माझें मीपण हरपलें |
| १६५९ | ।।ज्ञा.गा.०३५२.०१।। | देखावयालागी जव अनौतें पहिलें। तव तनु मनु त्रिभुवनीं व्यापिलें गे माये |
| १६६० | ।।ज्ञा.गा.०३५२.०२।। | नवलावो जाले जग हरिच होऊनि ठेलें। आठवू विसरलें काय करूं |
| १६६१ | ।।ज्ञा.गा.०३५२.०३।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलें साच केलें। लोह परिसेंसी झगटलें तैसें जालें गे माये |
| १६६२ | ।।ज्ञा.गा.०३५३.०१।। | नेणते ठायीं मन पाहों गेलें। तंव मनचि पावलें जागृतीये माये |
| १६६३ | ।।ज्ञा.गा.०३५३.०२।। | जागृती अंतीं स्वप्न देखिलें। जागृती स्वप्न दोन्ही हरपलें |
| १६६४ | ।।ज्ञा.गा.०३५३.०३।। | रखुमादेविवरु मरणधारणा भ्याला। तेणें मज दाविला तेजोमय |
| १६६५ | ।।ज्ञा.गा.०३५४.०१।। | मन मारूनियां मुक्त पैं केलें। मीपण माझें नेलें हिरोनियां |
| १६६६ | ।।ज्ञा.गा.०३५४.०२।। | मज लाविला चाळा लाविला चाळा। विठ्ठलुचि डोळां बैसलासे |
| १६६७ | ।।ज्ञा.गा.०३५४.०३।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलु लाघवी भला। आपरूपीं मज केला सौरसु |
| १६६८ | ।।ज्ञा.गा.०३५५.०१।। | अगाधपण माझे अंगीं बाणलें। वरपडें देखिलें मृत्तिकालिंग |
| १६६९ | ।।ज्ञा.गा.०३५५.०२।। | त्यासी चैतन्य नाहीं गुण नाहीं। चळण नाहीं गुण रूप नाहीं |
| १६७० | ।।ज्ञा.गा.०३५५.०३।। | माझ्या शरीरीं ज्योतिर्लिंग उगवलें। अगाध कवळिलें हस्तेंवीण |

| | | |
|---|---|---|
| १६७१ | ।।ज्ञा.गा.०३५५.०४।। | बाप रखुमादेविवरु ज्योतिर्लिंग विश्वनाथ। तेणें माझा मनोरथ पुरविला गे माये |
| १६७२ | ।।ज्ञा.गा.०३५६.०१।। | अकरांवरी सातवें होते। सातवें कोठें मावळलें गे माये |
| १६७३ | ।।ज्ञा.गा.०३५६.०२।। | सहस्राची भरोवरी जाली गे माये। लय लक्षीं पाहे तंव चोजवेना |
| १६७४ | ।।ज्ञा.गा.०३५६.०३।। | रखुमादेविवरु दोन्ही घेतली । विरुनि टाकिलीं ब्रह्मडोहीं |
| १६७५ | ।।ज्ञा.गा.०३५७.०१।। | नेत्र लाउनी मनासी जंव पुसों जाय। तंव देवें नवल केलें गे बाईये |
| १६७६ | ।।ज्ञा.गा.०३५७.०२।। | देवें देवें नवल केलें नवल केलें। शेखीं सांगतां लाजिरवाणें |
| १६७७ | ।।ज्ञा.गा.०३५७.०३।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलें। माझें बाह्य अभ्यंतर व्यापिलें |
| १६७८ | ।।ज्ञा.गा.०३५८.०१।। | चैतन्य चोरूनि नेलें चित्त माझें सर्व गेलें। पाहें तंव तन्मय जालें गे माये |
| १६७९ | ।।ज्ञा.गा.०३५८.०२।। | देवें नवल केलें मन माझें मोहिले। विसरु तो आठऊ जाला गे माये |
| १६८० | ।।ज्ञा.गा.०३५८.०३।। | यासी जाणावयालागीं अनुहते पाहे। तंव त्रिभुवन तन्मय जालें गे माये |
| १६८१ | ।।ज्ञा.गा.०३५८.०४।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलरायें। माझें सबाह्याभ्यंतर व्यापिलें गे माये |
| १६८२ | ।।ज्ञा.गा.०३५९.०१।। | हस्ती घोडे हरण सिंहाडें। तैसें हें गुजराती लुगडें गे माये |
| १६८३ | ।।ज्ञा.गा.०३५९.०२।। | पालव मिरवीत जाईन। शेला पदरीं धरूनि राहीन |
| १६८४ | ।।ज्ञा.गा.०३५९.०३।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलु सांवळा। तेणें मज माजिठा दिल्हा साउला |
| १६८५ | ।।ज्ञा.गा.०३६०.०१।। | एकतत्त्व साधी तंव हारपलों तेथ। मज पाहतां येथ मी नाहीं |
| १६८६ | ।।ज्ञा.गा.०३६०.०२।। | काय करूं सांगा कैसा हा आकळे। एकतत्त्वीं मिळे हृदयीं गे बाई ये |
| १६८७ | ।।ज्ञा.गा.०३६०.०३।। | संपादनीं नट नटोनियां हरि। एकरूपें करी आपण्या ऐसें |
| १६८८ | ।।ज्ञा.गा.०३६०.०४।। | ज्ञानदेवीं चित्त तत्त्वसार हरि। चित्तानुलहरी झेपावली |
| १६८९ | ।।ज्ञा.गा.०३६१.०१।। | आपुलेनि भारें श्रीरंग डोलत गेलें। तंव अवचितें पाचारिलें पाठिमोरें |
| १६९० | ।।ज्ञा.गा.०३६१.०२।। | चैतन्य चोरिलें माझें चैतन्य चोरिलें। अवघें पारुषलें दीन देहें |
| १६९१ | ।।ज्ञा.गा.०३६१.०३।। | बाप रखुमादेविवरु दिनानाथ भेटला। विठ्ठल विठ्ठल झाला देह माझा |
| १६९२ | ।।ज्ञा.गा.०३६२.०१।। | उन्मनी अवस्था लागली निशाणी। तन्मयता ध्यानीं मुनीजनां |
| १६९३ | ।।ज्ञा.गा.०३६२.०२।। | मन तेथें नाहीं पहासी रे तें काई। सर्व हरिडोहीं बुडी दे कां |
| १६९४ | ।।ज्ञा.गा.०३६२.०३।। | मनाची कल्पना देहाची भावना। शून्य ते वासना हरिमाजीं |
| १६९५ | ।।ज्ञा.गा.०३६२.०४।। | निवृत्ति म्हणे सर्व हरिपीक फळलें। ज्ञानासी लाधलें हरिकृपा |
| १६९६ | ।।ज्ञा.गा.०३६३.०१।। | तुजमाजीं विरावें तुज गिळुनी राहावें। तुझें रूप पाहावें रूपेंवीण |

| | | |
|---|---|---|
| १६९७ | ।।ज्ञा.गा.०३६३.०२।। | तूंतें अवघें गुज म्यां सांगावें। वाचेवीण बोलावें नि:शब्दाकारें |
| १६९८ | ।।ज्ञा.गा.०३६३.०३।। | रखुमादेविवरु वाचे विनविला। प्रसन्न जाला ब्रह्म दाउनी |
| १६९९ | ।।ज्ञा.गा.०३६४.०१।। | कमळावरी कमळ ठेवुनी उल्हाटे। कमळीं कमळ उफराटें गे माय |
| १७०० | ।।ज्ञा.गा.०३६४.०२।। | वासना निरसलिये वासना निरसलिये। ब्रह्मकमळीं उगवलीये गे बाईये |
| १७०१ | ।।ज्ञा.गा.०३६४.०३।। | कारण कामातें करूनी आपैतें। महाकारण तें गगना परौतें गे बाईये |
| १७०२ | ।।ज्ञा.गा.०३६४.०४।। | बाप रखुमादेविवर विठ्ठल तेजसु। ब्रह्मकमळीं दावितां प्रकाशु गे बाईये |
| १७०३ | ।।ज्ञा.गा.०३६५.०१।। | निरखित निरखित गेलीये। पाहें तंव तन्मय जालिये |
| १७०४ | ।।ज्ञा.गा.०३६५.०२।। | उन्मनीं मन निवालें। सांवळें परब्रह्म भासलें |
| १७०५ | ।।ज्ञा.गा.०३६५.०३।। | रूप येवोनियां डोळां बैसलें। पाहें तंव परब्रह्म अवतरलें |
| १७०६ | ।।ज्ञा.गा.०३६५.०४।। | बाप रखुमादेविवरें विठ्ठलें। मूस ओतूनियां मेण सांडिलें |
| १७०७ | ।।ज्ञा.गा.०३६६.०१।। | सदैवपण आलें गोपाळातें देखिलें। लक्षा एका जोडलें अमित्य गुणीं वो माय |
| १७०८ | ।।ज्ञा.गा.०३६६.०२।। | दैन्याचे सांकडीपासूनि वेगळावलें। पैं जवळी बैसविलें आनंदपदीं वो माय |
| १७०९ | ।।ज्ञा.गा.०३६६.०३।। | जागृतिशेवटीं निद्राभुली नुठी। मायेसी म्यां मिठी दिधली वो माय |
| १७१० | ।।ज्ञा.गा.०३६६.०४।। | मागुती नको परतणी या शरीरीं उरवणी। प्रपंचाची कहाणी निमाली वो माय |
| १७११ | ।।ज्ञा.गा.०३६६.०५।। | सदोदित भरलें त्या तिहीं गुणां वेगळें। तें अगणित वर्षलें प्रेमघरीं वो माय |
| १७१२ | ।।ज्ञा.गा.०३६६.०६।। | सबराभरित भरला या देहभावावेगळा। रखुमादेविवरु जवळी जोडला वो माय |
| १७१३ | ।।ज्ञा.गा.०३६७.०१।। | निरालंब स्तंभ घातला निजयोगु। साही वेगळेसी वो माय |
| १७१४ | ।।ज्ञा.गा.०३६७.०२।। | आणिकां न कळे तें त्रिगुणां वेगळें। तें मज गोवळें दाविलें वो माय |
| १७१५ | ।।ज्ञा.गा.०३६७.०३।। | दुर्घट घडतां न वर्णवे योग्यता। मज पुढारी वो माय |
| १७१६ | ।।ज्ञा.गा.०३६७.०४।। | खुणा जरी बोलों तरी मौन्य पडलें। तें परब्रह्मीं उघडलें दिव्यचक्षु वो माय |
| १७१७ | ।।ज्ञा.गा.०३६७.०५।। | तो चिदानंदु पुतळा रखुमाई जवळा। सोईरा सकळांसहित वो माये |
| १७१८ | ।।ज्ञा.गा.०३६८.०१।। | दीप दिगांतरीं दीपीं पाहतां। परेहूनि परता तो देखिला वो माय |
| १७१९ | ।।ज्ञा.गा.०३६८.०२।। | पाहीन मी आतां निरंजन स्वरूपता। त्यानें मज तत्त्वतां वोजविलें वो माय |
| १७२० | ।।ज्ञा.गा.०३६८.०३।। | देहाचा दिवा उजळूनि ज्ञानज्योती। परपुरुषीं निवृत्ति झाली वो माय |
| १७२१ | ।।ज्ञा.गा.०३६८.०४।। | कवळूनि भेटी प्राणेंसी देईन मिठी। मी नि:शब्देंसी गोष्टी सांगेन वो माय |
| १७२२ | ।।ज्ञा.गा.०३६८.०५।। | निजभावें निरोपिला सच्चिदानंदपदीं। मग मज परमानंदीं गोष्टी जोडली वो माय |

| | | |
|---|---|---|
| १७२३ | ।।ज्ञा.गा.०३६८.०६।। | ऐसें मी अनुसरलें यानें आपंगिलें। रखुमादेविवरु विठ्ठलें वो माय |
| १७२४ | ।।ज्ञा.गा.०३६९.०१।। | दीनपण दवडूनि दीनानाथें मेळविलें। तें येणें गोपाळें केलें रूप नवल वो माये |
| १७२५ | ।।ज्ञा.गा.०३६९.०२।। | पाहतां पारणीं फिटलीं चक्षूंचीं। सर्व आवडीची कोथळी लाधली वो माये |
| १७२६ | ।।ज्ञा.गा.०३६९.०३।। | आतां असो हें भरोवरी सांगणें या शरीरीं। उगवले अंतरीं दृष्टीचिया वो माय |
| १७२७ | ।।ज्ञा.गा.०३६९.०४।। | सहज अंगवणे निजगूज पाहणें। तें आनंदें निर्गुणें नयनीं प्रकाशलें वो माय |
| १७२८ | ।।ज्ञा.गा.०३६९.०५।। | डोळाची वाढिलें परब्रह्म फळलें। त्या सुखाचें निमालें सांगणें वो माये |
| १७२९ | ।।ज्ञा.गा.०३६९.०६।। | गुण गिऱ्हाईक जोडला अमोल मोलें घेतला। रखुमादेविवर विठ्ठला वो माय |
| १७३० | ।।ज्ञा.गा.०३७०.०१।। | जन्माचें व्याज आपणचि गिळिलें। मुद्दलाचा ठावो नाहीं ऐसें केलें |
| १७३१ | ।।ज्ञा.गा.०३७०.०२।। | ऋणाईत नव्हे हा निर्गुणासी समंधु। येणें परमबोधु बोधविला |
| १७३२ | ।।ज्ञा.गा.०३७०.०३।। | ऐसी आपुली साक्षी कवणें पैं द्यावी। निवृत्ति म्हणे कांहीं ठायीं न ठेवीची |
| १७३३ | ।।ज्ञा.गा.०३७०.०४।। | बाप रखुमादेविवरें केला घातासी घातु। आपला लक्षाचा लाभु वरी दिधला |
| १७३४ | ।।ज्ञा.गा.०३७१.०१।। | दुरुनी एक ऋण मागावयां आलें। माझें मी पाहिलें तंव कांहीं नाहीं |
| १७३५ | ।।ज्ञा.गा.०३७१.०२।। | भीतरील माझी पंचरत्नें नेलीं। स्वस्वरूप वाहवलीं मध्य गिळियेलें |
| १७३६ | ।।ज्ञा.गा.०३७१.०३।। | निवृत्तिबोधें मी बोधलें। सांगतें वाहवलें सर्वस्वेंसी |
| १७३७ | ।।ज्ञा.गा.०३७१.०४।। | ऐसा रखुमादेविवरु विठ्ठलु आपण पुढारला। माझा निर्वाळा केला संसारींचा |
| १७३८ | ।।ज्ञा.गा.०३७२.०१।। | सत्राविये कोठडिये माजीं निक्षेपिलें। एकीं केलें धन तें बाविसे नेलें पातेजोनी |
| १७३९ | ।।ज्ञा.गा.०३७२.०२।। | आपण नेणतां ऋण घ्यावयासी गेलों। तंव तंव सर्वस्वेंसी बुडालों परोपरी देखा |
| १७४० | ।।ज्ञा.गा.०३७२.०३।। | मंत्र सांगितला माझ्या कानीं। जाणोनी ज्ञानविज्ञानीं वेडावलों |
| १७४१ | ।।ज्ञा.गा.०३७२.०४।। | ऐसें रखुमादेविवरा विठ्ठलाच्या बोला। पातेजलों सर्वस्वासी ठेलों प्राङ्मुख |
| १७४२ | ।।ज्ञा.गा.०३७३.०१।। | चौ तेरा आम्हीं चौसष्टीचे भागे सांचिलें। तें एका ऋणाईतें घेतलें वोळखीवीण |
| १७४३ | ।।ज्ञा.गा.०३७३.०२।। | आपुलें अकरावें एक सोईरें जाणा। तेंही पैं तयासी मिळोनी ठेलें |
| १७४४ | ।।ज्ञा.गा.०३७३.०३।। | आतां मी चौघांपाशीं जाईन तीहींचि नागविलें पाहीं। तेथें कांहीं नाहीं ऐसें म्हणितलें |
| १७४५ | ।।ज्ञा.गा.०३७३.०४।। | ऐसा देहाचा दिवाळखोर दुसऱ्यासी घेऊनि गेला। तेणें मज दाखविला अद्वैत पारु |
| १७४६ | ।।ज्ञा.गा.०३७३.०५।। | सहस्रोपरी कांहीं धरियेली जरी। ज्ञानमूढें तरी कायी जाणती |
| १७४७ | ।।ज्ञा.गा.०३७३.०६।। | ऐसा बाप रखुमादेविवरु विठ्ठलु मध्यवर्ती भला। तेणें उगाणा केला परावृत्त होऊनियां |
| १७४८ | ।।ज्ञा.गा.०३७४.०१।। | पांचासहित लयातीत जालिये वो। प्रेम भक्ति अनुसरलें काळ्या रूपासी |

| | | |
|---|---|---|
| १७४९ | ।।ज्ञा.गा.०३७४.०२।। | ठायींचाची काळा अनादि बहु काळा। म्हणोनी वेदा चाळा लाविला गे माये |
| १७५० | ।।ज्ञा.गा.०३७४.०३।। | बाप रखुमादेविवरें जन्मावेगळें केलें। म्हणोनी भाज जालें बाईये वो |
| १७५१ | ।।ज्ञा.गा.०३७५.०१।। | अकल्पित द्रुम आजी संयोगें घडलें। अपार आपणांतें विसरलें गे माय |
| १७५२ | ।।ज्ञा.गा.०३७५.०२।। | महुरलें महुरलें मन माझें मोहरलें। भक्तिफळासी कैसें आलें गे माये |
| १७५३ | ।।ज्ञा.गा.०३७५.०३।। | देठीहुनी सुटलें पुढती कैसें जीवनासी आलें। बाप रखुमादेविवरु विठ्ठलें ऐसें केलें गे माये |
| १७५४ | ।।ज्ञा.गा.०३७६.०१।। | चतुर्देहाची भरणी पुरली। एकाएकीं देखिली निजतनु |
| १७५५ | ।।ज्ञा.गा.०३७६.०२।। | त्याचें नाव गोवळु फिटला काळ वेळु। जाला सकळु सकळांसहित |
| १७५६ | ।।ज्ञा.गा.०३७६.०३।। | ऐसा बाप रखुमादेविवरु सुंदरु। तेणें माझा वेव्हारु खंडियेला |
| १७५७ | ।।ज्ञा.गा.०३७७.०१।। | संसारा तुकलिये वेव्हारा मुकलिये। घराचारा पारुषलिये काय सांगों |
| १७५८ | ।।ज्ञा.गा.०३७७.०२।। | माझें जिणेंचि बुडालें माझें जिणेंचि बुडालें। विठ्ठलें कुडें केलें काय सांगों |
| १७५९ | ।।ज्ञा.गा.०३७७.०३।। | बाप रखुमादेविवर विठ्ठलें। सहज मोलेविणें विकत घेतलें |
| १७६० | ।।ज्ञा.गा.०३७८.०१।। | एकी धावे सुनाट एकीनें धरिलें बेट। एकीनें शेवट साधियेला |
| १७६१ | ।।ज्ञा.गा.०३७८.०२।। | कोणे तत्त्वीं हरि कैसी यासी परी। नांदे कवणे घरीं सांगिजेसु |
| १७६२ | ।।ज्ञा.गा.०३७८.०३।। | सखी सांगे बाई भावो धरी देहीं। एकारूपा सोयीं येईल घरा |
| १७६३ | ।।ज्ञा.गा.०३७८.०४।। | बाप रखुमादेविवर विठ्ठल अवचितां। निवृत्ति समता सांगितलें |
| १७६४ | ।।ज्ञा.गा.०३७९.०१।। | येरी म्हणे भेद सृष्टी दाविती शब्द। तत्त्व तत्त्वीं बोध कोठें गेलें |
| १७६५ | ।।ज्ञा.गा.०३७९.०२।। | सखी म्हणे बाई आकाराची सोय। तुज मज काय इयें देहीं |
| १७६६ | ।।ज्ञा.गा.०३७९.०३।। | चपळता सांगों उष्णता घोटी। घोटूनियां होटी समब्रह्मीं |
| १७६७ | ।।ज्ञा.गा.०३७९.०४।। | ज्ञानदेवीं तट भाग्य जैं उत्कट। तैं हे वाक्पट पडती दृष्टी |
| १७६८ | ।।ज्ञा.गा.०३८०.०१।। | सखी म्हणे बाई समपण तें कैसें। येरी म्हणे देश हिंडूं नको |
| १७६९ | ।।ज्ञा.गा.०३८०.०२।। | आधीं शोधीं आप मग पाहीं दीप। कोहं सोहं रूप दवडी दुरी |
| १७७० | ।।ज्ञा.गा.०३८०.०३।। | त्रिपुटीं झोंबों नको मायावी सकळ। अवघा सरळ हरि आहे |
| १७७१ | ।।ज्ञा.गा.०३८०.०४।। | ज्ञानदेव बुझवी बुझे ज्ञानधारण। तुज माज सौजन्य येणें न्यायें |
| १७७२ | ।।ज्ञा.गा.०३८१.०१।। | सांग सखिये बाई मज हें न कळे। कैसा हा अकळे समतेजें |
| १७७३ | ।।ज्ञा.गा.०३८१.०२।। | भाव दृढ धरीं चित्ताची लहरी। प्रकृती कामारी सत्रावीची |
| १७७४ | ।।ज्ञा.गा.०३८१.०३।। | येरी म्हणे वाजट झाली हो पुराणें। समरस जाणें कोणे घरीं |

| | | |
|---|---|---|
| १७७५ | ।।ज्ञा.गा.०३८१.०४।। | ज्ञानदेव म्हणे आदिमध्य समता। सुखें पाहतां चढे हातां |
| १७७६ | ।।ज्ञा.गा.०३८२.०१।। | सखीप्रती सखी आदरें करी प्रश्न। जीव शिव पूर्ण कैसा दिसे |
| १७७७ | ।।ज्ञा.गा.०३८२.०२।। | सखी सांगे मात उभयतां ब्रह्म। नाहीं हो विषम हरीवीण |
| १७७८ | ।।ज्ञा.गा.०३८२.०३।। | सूर्यप्रकाश मही घटमठीं समता। तैसा हा उभयतां बिंब एका |
| १७७९ | ।।ज्ञा.गा.०३८२.०४।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठल जिवाचा। व्यापक शिवाचा शिवपणें |
| १७८० | ।।ज्ञा.गा.०३८३.०१।। | सखी सांगे सार शांति क्षमा दया। प्रपंच-विलया बरळ पोशी |
| १७८१ | ।।ज्ञा.गा.०३८३.०२।। | सखी म्हणे एका दुजी म्हणे अनेकां। अनेकीं सम्यका गुरुगम्य |
| १७८२ | ।।ज्ञा.गा.०३८३.०३।। | सावध निबंध आद्याचा उकल। रसनेचा पालव रसना तोयें |
| १७८३ | ।।ज्ञा.गा.०३८३.०४।। | ज्ञानदेव सांगे रखुमादेवी जप। अगम्य संकल्प एक दिसे |
| १७८४ | ।।ज्ञा.गा.०३८४.०१।। | सम्यक् करीं शांति बैसें एके पातीं। क्षमेसी निवृत्ति वाड करीं |
| १७८५ | ।।ज्ञा.गा.०३८४.०२।। | ऐसा हा उपदेश सखी सांगे जीवास। झणी कासावीस होसी बाई |
| १७८६ | ।।ज्ञा.गा.०३८४.०३।। | सज्ञानीं विज्ञान ज्ञानी ज्ञानपण। अन्वयीं शोधून पाहा लक्षीं |
| १७८७ | ।।ज्ञा.गा.०३८४.०४।। | ज्ञानदेवीं शिवा उन्मनी रिघावा। हरीचा विसावा सर्वांघटीं |
| १७८८ | ।।ज्ञा.गा.०३८५.०१।। | ममता पुसे सये शिवींजिवा ठाये। पूर्णता पान्हाये कोणे घरीं |
| १७८९ | ।।ज्ञा.गा.०३८५.०२।। | ऐक सखिये पुससी बाईये। परब्रह्म समाये पुंडलिका |
| १७९० | ।।ज्ञा.गा.०३८५.०३।। | नाहीं यासी ठावो संसार पैं वावो। एकतत्त्व रावो घरीं वसे |
| १७९१ | ।।ज्ञा.गा.०३८५.०४।। | बाप रखुमादेविवरु उदारु वोळला। विश्वजनपाळा ब्रीद साजे |
| १७९२ | ।।ज्ञा.गा.०३८६.०१।। | अष्टदळ पाहे पद्म नेत्र दाहे। सोहं मंत्र कोहं ठाकी दुरी |
| १७९३ | ।।ज्ञा.गा.०३८६.०२।। | आडवीं आडव रूपाचा बरव। सखिये तो राव रामराणा |
| १७९४ | ।।ज्ञा.गा.०३८६.०३।। | उपरती साधी प्रपंचीं अवघी। गुणें गुण उद्‌बोधी शेजे सये |
| १७९५ | ।।ज्ञा.गा.०३८६.०४।। | ज्ञानदेवीं लपे विज्ञान हारपे। काळ यम मापें न बाधिती |
| १७९६ | ।।ज्ञा.गा.०३८७.०१।। | चित्तींचें चैतन्य रूपींचें अनुकार। रूप असे साचार नयनांमाजीं। तेजाचें तेज दीपीं कळिका सामावे। दीपक माल्हावे तेज तेजीं |
| १७९७ | ।।ज्ञा.गा.०३८७.०२।। | काय सांगों सखिये तेज पैं अढळ। इंद्रियें बरळ देखतांची |
| १७९८ | ।।ज्ञा.गा.०३८७.०३।। | घनदाट रूपीं एकरूप तत्त्व। दीपीं दीपसमत्व आप दिसे। निराकार वस्तु आकार पैं अपार। विश्वीं चराचर बिंबलीसे |
| १७९९ | ।।ज्ञा.गा.०३८७.०४।। | प्राणप्रिया गेली पुसे आत्मनाथा। कैसेनी उलथा गुरुखुणें |
| १८०० | ।।ज्ञा.गा.०३८७.०५।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलीं उपरती। रूपीं रूपदीप्ती एक जाली |

| | | |
|---|---|---|
| १८०१ | ।।ज्ञा.गा.०३८८.०१।। | प्राणासवें सखी आत्मा हा बिंबला। सवेगुणी निमाला याच्या वृत्ति। ध्यान गेलें ठायां मन गेलें सुखा। नयनीं नयनसुखा अवलोकीं |
| १८०२ | ।।ज्ञा.गा.०३८८.०२।। | तेंचि सखी रूप वोळखे स्वरूप। विश्वीं विश्वरूप एका तेजें |
| १८०३ | ।।ज्ञा.गा.०३८८.०३।। | द्वैत पैं न दिसे अद्वैत सुरवाडु। एक दीपें उजेडु सर्वां घटीं |
| १८०४ | ।।ज्ञा.गा.०३८८.०४।। | विराल्या कामना अमूर्त परिपाठीं। चैतन्याची दृष्टि उघडली रया |
| १८०५ | ।।ज्ञा.गा.०३८८.०५।। | सखी म्हणे सुख प्राणासी भुललें। आत्मपणें मुकलें काय करूं |
| १८०६ | ।।ज्ञा.गा.०३८८.०६।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलें रूप। दाउनी स्वरूप एक केलें |
| १८०७ | ।।ज्ञा.गा.०३८९.०१।। | प्राणाची पैं सखी पुसे आत्मयासी। ईश्वरीं ध्यानाची वृत्ति गेली |
| १८०८ | ।।ज्ञा.गा.०३८९.०२।। | पांगुळल्या वृत्ति हारपली भावना। निमाली कल्पना ब्रह्मीं रया |
| १८०९ | ।।ज्ञा.गा.०३८९.०३।। | हें सुख साचार सांगे कां विचार। आत्मयाचें घर गुरुखुणें |
| १८१० | ।।ज्ञा.गा.०३८९.०४।। | चेतवितें कोठें गुंफलें सगुण। निर्गुणीं पैं गुण समरस |
| १८११ | ।।ज्ञा.गा.०३८९.०५।। | तें सुख अपार निळीये वेधलें। कृष्णरूप हें देखिलें सर्वांरूपीं |
| १८१२ | ।।ज्ञा.गा.०३८९.०६।। | या ध्यानीं गुंफलें मनामाजीं वेख। द्वैतभानसुख नाठवे मज |
| १८१३ | ।।ज्ञा.गा.०३८९.०७।। | अद्वैत घरकुलें गुणाचें पैं रूप। मनामाजीं स्वरूप बिंबलें रया |
| १८१४ | ।।ज्ञा.गा.०३८९.०८।। | विस्मृति गुणांची स्मृति पैं भजना। दृष्टादृष्ट जनां ब्रह्मरूप |
| १८१५ | ।।ज्ञा.गा.०३८९.०९।। | याचेनी सुलभें नाठवे संसारु। ब्रह्मचि आकारु दिसत असे |
| १८१६ | ।।ज्ञा.गा.०३८९.१०।। | वेगीं सांग ठसा कोण हें रूपडें। कृष्णचि चहूंकडे बिंबलासे |
| १८१७ | ।।ज्ञा.गा.०३८९.११।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठल सखी। कृष्णरूपीं सुखी तनु जाली |
| १८१८ | ।।ज्ञा.गा.०३९०.०१।। | तत्त्वतां पैं तत्त्व धरितां नये हातां। मग ममतेची चिंता तयासी पुसे |
| १८१९ | ।।ज्ञा.गा.०३९०.०२।। | बाई कोणे घरीं सांगे वो जिवित्व। परेचें परतत्त्व कोणे घरीं |
| १८२० | ।।ज्ञा.गा.०३९०.०३।। | सखी सांगे गोष्टी बाईये रूप वो धरीं। आपणची घरीं सांपडेल |
| १८२१ | ।।ज्ञा.गा.०३९०.०४।। | निवृत्तीनें खुणें सांगितलें ज्ञान। रखुमादेविवरु ध्यान विठ्ठलवरदा |
| १८२२ | ।।ज्ञा.गा.०३९१.०१।। | तुज पासाव जन्मलों हरि पुढती सामावलों तुझ्या उदरीं। तुझिया व्यापकपणें चाले सत्कर्माची दोरी। सायीखडियाचें बाहुलें कैसें हावभाव धरी। सूर्यकांत वेधें अग्नीच प्रसवे सहजे समंधु ऐसा धरी रया |
| १८२३ | ।।ज्ञा.गा.०३९१.०२।। | तुझें तुज देवा सांगतां निकें। समर्थासी केवीं बोलावें रंकें |
| १८२४ | ।।ज्ञा.गा.०३९१.०३।। | अहंकार महदादि भूतें तेणें गुणेंसी आलीं तें चैतन्य नयनीं अधिष्ठिलीं। सर्व शरीरीं वायो व्यापिला कीं पृथ्वीसी मिळोनी आकाशा भरोवरी जाली। ते हे स्थूळ लिंग कारण तिहीं तत्त्वेंसी प्रकृती अथिली रया |

| | | |
|---|---|---|
| १८२५ | ।।ज्ञा.गा.०३९१.०४।। | सर्व होणें तुज एकाचें। दुजेपण तेथें आणावें कैचें |
| १८२६ | ।।ज्ञा.गा.०३९१.०५।। | चंद्रमा मन:चक्षुसूर्योदिशाश्रोत्र: अकार उकार मकार प्रणवो। मन बुद्धि चित्त अहंकार ब्रह्मा विष्णु महेश राजस तामस सात्त्विक माया ब्रह्मींचा दावी पां उपावो। तुजवेगळें काय आहे तें सांग पां तरी मज कां म्हणवितासी जिऊ रया |
| १८२७ | ।।ज्ञा.गा.०३९१.०६।। | जेथें पाहें तेथें तूंचि दिससी। लपोनियां अबोला कासया धरिसी |
| १८२८ | ।।ज्ञा.गा.०३९१.०७।। | रसना रस सेवावे हे तों जीव आत्म्याची स्थिति। श्रवणीं ऐकणें कीं नेत्रीं देखणें हे तों तुझीच नादश्रुती। घ्राणासी परिमळ घेणें कीं हस्तपादादिकां चळणगती। हे तो तुझींच पांचै तत्त्वें तरी तूं तूं मज कां भोगवितोसी यातायाती रया |
| १८२९ | ।।ज्ञा.गा.०३९१.०८।। | लाजेसी ना तूं देवा माझें म्हणतां संन्याशासवें कैंची रे कांता |
| १८३० | ।।ज्ञा.गा.०३९१.०९।। | इंद्रियें दारुणें जीव आत्मयासी हे तो सुखदु:खप्राप्ती। तेणें हें कारण कीं आत्मा पावे यातायाती। इंद्रियें दंडून तप जें करावें ऐसें बोलती वेद श्रुती। साहीजणांसी तो वेवाद लाविला हें तो तुझीच करणी सांगती रया |
| १८३१ | ।।ज्ञा.गा.०३९१.१०।। | दुजेंवीण एकला खेळतो स्वारी। कवणातें जय कवणा आली हरि |
| १८३२ | ।।ज्ञा.गा.०३९१.११।। | अंगें ब्रह्म जालासी उत्पत्ती करावया सृष्टी । ते समयीं ते रचिली विषयांची कसवटी। ऐसें तुझें वालभ मिरऊं जाय सृष्टीं। तंव सुखदु:ख लागतसे पाठीं। येथें काय माझा अपराध जाणसी तरी शस्त्रेंसी मान निवटीं रया |
| १८३३ | ।।ज्ञा.गा.०३९१.१२।। | सगुण रचना वोजा विस्तारिली। भुजंगी व्याली तिचीं काय झालीं पिलीं |
| १८३४ | ।।ज्ञा.गा.०३९१.१३।। | वेद प्रमाण करावया कारण कीं कृष्णमूर्तीची बुंथी घेणें। अनंत ब्रह्मादिकांसी आदि वंद्य तो तूं राखसीं गौळियाचीं गोधनें। अंबऋषीकारणें गर्भवास साहिले कीं अजामिळादिकांसी उद्धरणें। वैरियां भक्तां येकिची मुक्ती मा समर्थु नाहीं येणें मानें रया |
| १८३५ | ।।ज्ञा.गा.०३९१.१४।। | अनंत ब्रह्मांडें घडिसी मोडिसी। अकर्तेपणें जैसा तैसा अससी |
| १८३६ | ।।ज्ञा.गा.०३९१.१५।। | एक वीरा माय मारावी कीं गणिका उद्धरावी हे कवण प्रवृत्ति। दशरथपिता रौरवीं कीं वैरिया सायुज्यता मुक्ती। कर्मभ्रष्ट पांडव सरते केले कीं अज्ञानासी मोक्षप्राप्ती। शास्त्रें पुराणें वारूं जाय तंव अधिक पडतसे गुंती रया |
| १८३७ | ।।ज्ञा.गा.०३९१.१६।। | सुताचें गुंडाळें उगवीं पां वहिलें। खंडूनियां सांडी देवा एकाचि बोलें |
| १८३८ | ।।ज्ञा.गा.०३९१.१७।। | मिथ्या हा प्रपंच कीं दर्पणीचें दुजें जळीं बिंब प्रकाशे। एक साचें दुजे दिसे तैसेंची दुसरें कां प्रतिभासे। लटिकें म्हणों जाय तंव तेथें मन कां विश्वासे। सगुण निर्गुण हे तों तुझीच माया तुझी तुजमाजीं दिसे रया |
| १८३९ | ।।ज्ञा.गा.०३९१.१८।। | अर्धनारी सोंग पाहतां निकें। साच लपऊनि दावितो लटिकें |
| १८४० | ।।ज्ञा.गा.०३९१.१९।। | सिद्धासी साधन हे तों कष्टचि वायांवीण। अनंत प्रत्यक्ष जाणोन कायसें परिमाण। स्वयंभासी प्रतिष्ठा करणें हें तों देखतांचि अज्ञानपण। निजबिंबामाजीं प्रतिबिंब बिंबलें तैसें सगुण निर्गुण तुजमाजीं रया |
| १८४१ | ।।ज्ञा.गा.०३९१.२०।। | सहजसिद्ध तें तूं आपण पैं पाहीं। बाहिजु भीतरीं ये दोन्हीं नाहीं |

| | | |
|---|---|---|
| १८४२ | ।।ज्ञा.गा.०३९१.२१।। | विश्वरूप अळंकारलें कीं मुसें आटली भांगारें। अथवा घटमठादिकीं अभावीं परिपूर्ण असिजे अंबरें। उदकीं पडिला काश्मिरा तो नागवे निरा तो न सरे। दुसरेपणें तैसा आदि मध्य अंतीं हृदयींचा जाणोनी पूर्ण बोधेवीण द्वैत न सरे रया |
| १८४३ | ।।ज्ञा.गा.०३९१.२२।। | सच्चिदानंदरूप तत्त्वता। लटिकेंचि बंधन बंधना मुक्ता |
| १८४४ | ।।ज्ञा.गा.०३९१.२३।। | म्हणसी माझा संकल्प फळला तरी म्यां दु:ख नाहीं इच्छिलें। अवघा तुझा खेळ बहुरूप असें विस्तारलें। जाणसी तें करी देवातें तुझें तुज पुढा सांगितलें। तेथ काय माझा अपराध देखसी तरी देह कां नाहीं खंडिले |
| १८४५ | ।।ज्ञा.गा.०३९१.२४।। | पुरे पुरे आतां जड जालें जिणें। उरी नाहीं देवा लाजिरवाणें |
| १८४६ | ।।ज्ञा.गा.०३९१.२५।। | ऐसी इंद्रियें वासनेसी आणीजती ते तुझी तुजमाजीं सामावती। समस्त जीव हे तो तुझे आकारलें येरी ते लटकीच भ्रांति। जाणसी तें करी देवा तेचि तें सांगों किती। दग्धबीज तरुबीजीं सामावला तैसा तुजमाजीं श्रीगुरुनिवृत्ति रया |
| १८४७ | ।।ज्ञा.गा.०३९१.२६।। | ऐक्य जालें तेथें नित्य दिवाळी। सहज समाधी तेथें कायसी रे टाळी |
| १८४८ | ।।ज्ञा.गा.०३९२.०१।। | सर्व जीव तूं जालासी आपण तरी निरय आपदा भोगिता हे कवण। परमात्मया तुमचें अविनाश स्वरूप तरी येवढें का कष्टसाधन। तूं अंतरीं परब्रह्म सांवळें म्हणोनी जगत्रय व्यापिलें या ध्यान। म्हणोनी तुमचा पुत्र जालों स्वामिया जगाधीन कां केलें माझें जिणें रया |
| १८४९ | ।।ज्ञा.गा.०३९२.०२।। | तूं बाप म्हणतां मी लाजिलों लाजोनी माघारा ठेलों। एकीकडे काळ एकीकडे संसार मध्येंची वाटे मी ठेलों। ऐसिया संनिधि तुजजवळीं येवों पाहे तंव तुझीया देवपणा भ्यालों |
| १८५० | ।।ज्ञा.गा.०३९२.०३।। | नादबिंदापासाव शरीर जन्मलें असाध्य करुनी वरी साक्ष देऊनि मेदामांसामाजीं वाढविलें। कर्मदेह वेचुनी सत्य सुकृतालागी उपजविलें तरी हें दैन्य दारिद्र्य कां भोगविलें। तुझिया बापपणा बोलु लागला तरी मज पुत्रसें वायां म्हणितलें रया |
| १८५१ | ।।ज्ञा.गा.०३९२.०४।। | आयुष्याची गणना करूनियां प्रमाण वरी मनुष्य देह ऐसें नाम ठेविलें। तें आयुष्य कां स्वामी दों ठायीं वाटिलें। अर्ध रात्रीचे अर्ध दिवसाचे निरय सत्त्व वेंचिलें। पैल समर्थाचें बालक रंकें गांजिलें त्याचें थोरपण तें काय जालें राया |
| १८५२ | ।।ज्ञा.गा.०३९२.०५।। | बांधोनी जन्म आम्हांकडे भोगविसी आपणया मायबाप म्हणविसी। विश्व प्रसवला या जगासी तरी आधारु आहे ऐसें अनुवादसी। जत्र जीव तत्र शिव हें तों नये माझीया मनासी। पैल कीटकिये भृंगिये जैसी जालें तैसें कां न करिसी आम्हांसी रे |
| १८५३ | ।।ज्ञा.गा.०३९२.०६।। | अल्प दोषासाठीं आम्हांतें दंडिसी येवढें कैचें मंत्रसाधन जे भक्ति करूनि निरसूं तयासी। तुज देखतां काळ शरीर फाडफाडूं भक्षितां हे कणव कां सांडिली ऐसी। जठर सीणसीणु फुटतील देवा वायां कष्टविसील आम्हांसी रे |
| १८५४ | ।।ज्ञा.गा.०३९२.०७।। | दर्पणीं पाहतां येकचि दिसे तेथें अनुसारिखें कांहीं न दिसे। रविबिंब उगवलिया किरणीं प्रकाश आस्तु जालियावरी कांहीं न दिसे। तैसें गुरुशिष्य संवादु सोहं बोध ऐक्य जालें अभ्यासें। याहूनि जाणसी तें करि वेळोवेळां आतां सांगों मी तें कैसें रया |
| १८५५ | ।।ज्ञा.गा.०३९२.०८।। | यमा जाचितां कांहीं नुरे यालागीं मुनी सेविती वनवासु। खवणीक खपणीक लुंचनीक वसैत भटभराडें धाकें करिती आगम संन्यासु। योग साधावया वनवास सेविती करिती पवनअभ्यासु। इंद्रियें दंडुन परतोनी भृगस्थान न पवतीच खंडु पानरसु रया |

| | | |
|---|---|---|
| १८५६ | ।।ज्ञा.गा.०३९२.०९।। | जळींचा तरंगु जळीं निमाला तो अनुठाया वेगळा नाहीं गेला। तैसा तुजमाजीं दातारा मध्यें कां हा प्रपंच वाढविला। तूं देव आम्ही प्राकृत मनुष्यें हा आगमु कां गमला। मज पाहतां हें अवघेचि लटिकें जैसें असेल तैसें सांग पां उगला |
| १८५७ | ।।ज्ञा.गा.०३९२.१०।। | लवण पाणियासी कीं पाणी लवणासी ऐक्य जालियावीण निवडेना गुणासी। लोहो लागलें परिसी तें उठिले कनकेंसी बाप रखुमादेविवरा विठ्ठला परियेसी। आजिपासून ये तरी तुझीच आण पुढती न घाली न निघें गर्भवासी रया |
| १८५८ | ।।ज्ञा.गा.०३९३.०१।। | देखोनी हांव बांधे तें तंव नाहीं होये। आहे तें कही न जाय रे बापा। असें तें दिसों नये नाहीं तें घेवों पाहे थोर काजेवीण विटंबिले कैसें रया |
| १८५९ | ।।ज्ञा.गा.०३९३.०२।। | शिव शिव लटिकेचि शिणले। येणें लटिकेंनी बहु श्रमविलें। साच तें लटिकें लटिकें तें साच लिंगा हे खूण जाण रया |
| १८६० | ।।ज्ञा.गा.०३९३.०३।। | आपुली प्रतिष्ठा पूज्य जे होती। इहीं गुणीं आम्हां उपहति बापा। मनाचा फाळका फाळुनी केला बाउला तोचि तो खेळवूं किती रया |
| १८६१ | ।।ज्ञा.गा.०३९३.०४।। | आपुले युक्तीचे वाती वेन्ही गिवसीतां त्या पदार्थाचे पोटीं लपती रया। तें सांडूनियां अभिप्रायाचें बळ निजतत्त्वीं तें केवीं निवती रया |
| १८६२ | ।।ज्ञा.गा.०३९३.०५।। | निज लाळा लिंपोनी जुन्या हस्ति श्वान चघळूनि करितसे गोड रया। तैसा जातिविशेषें निरसे म्हणोनी पुरवुनी करितसे कोड रया |
| १८६३ | ।।ज्ञा.गा.०३९३.०६।। | हातां पायांचा निखळ स्त्रीपुरुषांचा एक मेळ। देह ऐसा यातें म्हणती बापा आपण पैं जागा प्रतीति मानवपणें हें तंव चिळसवाणें रया |
| १८६४ | ।।ज्ञा.गा.०३९३.०७।। | मायबापें आडनांवें त्यांचिया वोसंगा। निघों म्हणों तरी आपुलिये साउलिये कां न बैसावें रया |
| १८६५ | ।।ज्ञा.गा.०३९३.०८।। | प्रजाचें पोसिलें पुढें पाइकाचें रक्षिलें। इंद्रियांचें वोळगणें तें काळाचें खेळणें। जगीं राय बोलिजती आतां गोसावी कवणातें म्हणावें रया |
| १८६६ | ।।ज्ञा.गा.०३९३.०९।। | मृगजळ तंव मृगजळींच भरतें देखोनी धांवणें तंव सीणणें। या परी झणी करिसी सदाशिवा जगा प्रतीति पावउनी झकणें रया |
| १८६७ | ।।ज्ञा.गा.०३९३.१०।। | आतां असो हा बोलु तूं एक गोसावी साच येतुलेनी आम्हां उजरीकोटि स्वप्न एक चेईलिया। कैचें ज्ञानदेव म्हणे ऐसें करी रया |
| १८६८ | ।।ज्ञा.गा.०३९४.०१।। | तूं विष्णु म्हणोन हें जगचि केवळ। येर सकळीक मजशीं सहोदर। तेणें कारणें गोत्रेंसी एकोपजीवीं आम्हां न खंडवे कोडें रया। माहेरावांचुनी आन कांहीं नेणें। माहेर तें उपजवी तरंगाचें जीवन। तोय वरी सामावे वेगळालें असिजेल केवीं रया |
| १८६९ | ।।ज्ञा.गा.०३९४.०२।। | उदरीं सिनार घरदारीं सिनार सिनार द्रश्य दृष्टा। करी त्या मायबापाचेनि उद्वेगें। मी तो सांगोनिया आलों तुझिया पोटा रया |
| १८७० | ।।ज्ञा.गा.०३९४.०३।। | अंगें ब्रह्म झाला तें तुवां वो जाणितलें। परि तो अविद्ये घायतळीं सुदला। ते तूं मजलागीं नेणसीच माउलिये आपुठे पान्हाये वाढविलें रया |
| १८७१ | ।।ज्ञा.गा.०३९४.०४।। | तंवचि मी जालों परी उदर न भेदीत जननीये जोडलें ना वाटी। चक्षु पक्ष निघाले मज तुझाचि वाहाणी म्हणोनी सामावलों तुझ्या पोटीं रया |

| | | |
|---|---|---|
| १८७२ | ।।ज्ञा.गा.०३९४.०५।। | ऐशापरी तुम्हां समसरिसा जालों परी तो नामें वोळखीजे। मी तो बाळ कीं मी तो वृद्ध ऐसें अनन्यपणें लोण कीजे रया |
| १८७३ | ।।ज्ञा.गा.०३९४.०६।। | चेवो तरी स्वप्न स्वप्न तरी चेवो माय पुता नेणें ऐसें माझें तुझें। आपुलें आपण म्हणतां लाजिजे नमो नमो तुज व्याली वांझे रया |
| १८७४ | ।।ज्ञा.गा.०३९४.०७।। | आयुर्वित्त भव विभव जगीं जीवा निढळीं लिहिलें। अलक्ष तें मज नेणतया अजंगमा लागुनी पुसोनी घातलें मूळ सानु रया |
| १८७५ | ।।ज्ञा.गा.०३९४.०८।। | दृष्टिभेणें रूपा नये काळा भेणें नामाची सोय सांडियेली। तुझ्या रूपीं सर्व रूप स्वरूप होऊनियां दिठी उतरिलिया परी रया। |
| १८७६ | ।।ज्ञा.गा.०३९४.०९।। | आपुलें वित्त आपणा देखतांचि शंकिजे त्या विभागाची केउती परी। बाप रखुमादेविवरा विठ्ठला तूं येक सचराचरीं रया |
| १८७७ | ।।ज्ञा.गा.०३९५.०१।। | सर्वगत निर्धारितां आत्मा एक चराचरीं तेथें तंव नाहीं दुजेयाची परी। चारी खाणी चारी वाणी चौऱ्यांशी लक्ष जीव योनी मी अपत्य तुमचें अवधारीं। तुझिये भेटीलागीं रोडेलों दातारा हे तनु होतसे संकीर्ण भारी। जवळीच असतां भेटी कां नेदिसी थोर शिणविलों वोरबारीं रया |
| १८७८ | ।।ज्ञा.गा.०३९५.०२।। | तुजवीण मी कष्टलों दातारा कष्टोनी खेदक्षीण जालों। संसारश्रम त्रिविधतमें मार्ग सिद्धचि चुकलों। उपजोनियां बुद्धि येऊं पाहे तुझे शुद्धी तंव द्वैतसंगें भांबावलों रया |
| १८७९ | ।।ज्ञा.गा.०३९५.०३।। | मागील कष्ट सांगतां दुर्घट नको नको ते आठवण। सुखदु:खें प्राण पीडला गा बापा गुणत्रयें ओझें जडपण। भव विभव निरय आपदा ऐसें ऐकिलें आनेआन। तूं हे जीव तरी भोगितां हे कवण हे आकळितां वाटे विंदान रया |
| १८८० | ।।ज्ञा.गा.०३९५.०४।। | वेळावेळ भावाभाव बोलतां अवचितां चोरटा काम उठी। तुज देखतां अनादि वाटे पडे वधापरी धैर्य धांवणें न करिसी गोष्टी। तुझिये दृष्टि शरीर काळ फाडफाडूं खातो कवण काकुलती तया ना तुज नुठी। ऐसें विपरीत नवल वाटे ये सृष्टी रया |
| १८८१ | ।।ज्ञा.गा.०३९५.०५।। | ऐसा न कळतां भरंवसा मी हिंडे दाही दिशा हें तंव मन जालेंसे पिसें। असोयी जातां अपार्यी पडिजे श्वास उच्छ्वास पाळती सरिसें । वय चित्तांचा अंत घेउनि नाडलेपण परत्र पथ नकळे भरंवसें। कर्म वाटे आड गर्वे रिगतां तंव विघ्नचि उदैलें अपैसें रया |
| १८८२ | ।।ज्ञा.गा.०३९५.०६।। | ऐसी माया मोहाची भुलवणी घालुनी कीं बापा लाविलें अविचार कामा। उपाधी वळसा नाथिला धिंवसा जड केला शुद्ध आत्मा। मी तूं कवणाचें विंदान न कळेचि ऐसी नीत निगुती सीमा। तर्कबीज कैसें सांपडलें वर्म मा हाचि भावो कल्पिला आम्हां रया |
| १८८३ | ।।ज्ञा.गा.०३९५.०७।। | ऐसा वाउगाचि सोसु पुरला गा बापा परी न पडसी ठाउका। साही दरुशणां अठरा पुराणां वेवादु नाहीं खुंटला। आपुलाला स्वमार्गु संपादितां केउतां जासी गावींचा गावीं। विश्वास नाहीं चित्ता ये देहीं ऐसियासी कीजे कायी रया |
| १८८४ | ।।ज्ञा.गा.०३९५.०८।। | ऐसा जन्मोनी कां उगवलासी मायबाप कवण कां सांडिली ऐसी। रंका काळाचेनि धाकें सत्कर्मे अनेकें विश्रांती नाहीं या जीवांसी। समर्थपणें वेगळें घातलें तरी दैन्य दारिद्र्य कां भोगवितासी। आपुलें म्हणतां न लजसी देवा तरी सांग पां माव आहे कैसी रया |
| १८८५ | ।।ज्ञा.गा.०३९५.०९।। | समुद्रीचें जळ घेऊनि मेघ वरुषती मेदिनीं तें कां मागुतें मिळे सागरीं। आकाशा पासाव उत्पत्ति वायु हिंडे दशदिशीं परी तें ठायींच्या ठायीं राहणें झालें। जळींहूनि तरंग अनेक उमटती परी ते जळीचे जळीं निमाले। स्वप्नसंगें परदेशा गेले तरी जागृती ठायीं संचलें रया |

| | | |
|---|---|---|
| १८८६ | ।।ज्ञा.गा.०३९५.१०।। | ऐसा तुजपासाव सगुण स्वरूप जन्मलों गा देवा आतां कैसेनि वेगळा निवडे। लवण पडिलें जळीं कीं कर्पूरासि नुरे काजळी तैसें भावार्थ प्रेम चोखडें। ज्ञानदेव म्हणे रुक्मिणीरमणा देई क्षेम वर्म न बोले फुडें। निवृत्तिप्रसादें खुंटला अनुवादु फिटलें सकळही साकडें रया |
| १८८७ | ।।ज्ञा.गा.०३९६.०१।। | आदि पुरुषा जय विश्वंभरिता नानापरी तुझा खेळू। जया ब्रह्मगोळु कल्पकोडी घडी मोडिता नलगे वेळु। वेदपुराणें मत्सरें भांडती बहुते करीत होती कोल्हाळु। होय नव्हे ऐसी भ्रांतीसी गुंतली तयासी तूं आकळू गा |
| १८८८ | ।।ज्ञा.गा.०३९६.०२।। | तुझें नाम बरवें तुझें नाम बरवें । हरि वोळगों आपुल्या साच भावें |
| १८८९ | ।।ज्ञा.गा.०३९६.०३।। | गायत्री पासाव वोळलें क्षीर करणी पासाव विस्तारु। दूध दहीं ताक नवनीत आगळें चहूंचा वेगळा पडिभरु। जो ज्या विषयें पढिये तोचि मानिती थोरु। सांठवण करितां एकवट नव्हे तैसा भक्ति आचारु |
| १८९० | ।।ज्ञा.गा.०३९६.०४।। | कवणा एका राया बहुत पैं सेवक त्यासी दिधला वेगळा व्यापारु। आपुलाले म्हणिये सुचित राहटतां मान करील अपारु। समर्थाचा मोहो जाणोनी वेगळा करूं नये तयासी मत्सरु। साभिलाषपणें वर्णतां देखेल शिक लाविल हा निर्धारु |
| १८९१ | ।।ज्ञा.गा.०३९६.०५।। | कव्हणा एका राया बहुत पैं लेकुरें आळविती नानापरी। एकें पाठीचीं एकें पोटीचीं एकें वडिले एकें धाकटी सेखीं सारिखाचि मोहो करी। द्वैतभेदु जया नव्हे संवादु सेखीं तयासी तो निर्धारी गा |
| १८९२ | ।।ज्ञा.गा.०३९६.०६।। | सागरीचे तरंग आनेआन उमटती तेतुले अवतार होती। शिव केशव उंचनीच आगळें कासियानें मानावी भक्ति। परमात्मया सौरसें तेचि हे मानली विश्वमूर्ति। बाप रखुमादेविवरा विठ्ठला परियेसी ज्ञानदेवो करितां हे विनंति गा |
| १८९३ | ।।ज्ञा.गा.०३९७.०१।। | यम नियम पाप पुण्य आम्हासी आपण भलतेंचि करिसी। तुझिया थोरपणा बिहुनी असावें कवणें शंकावें रायासी। प्रत्यक्ष जगीं बाटली नारी तिचे स्मरण लोकांसी। पुराणें डांगोरा पिटिताती हें पतिव्रतापण तयेसी रया |
| १८९४ | ।।ज्ञा.गा.०३९७.०२।। | आवडे तें करिसी देवा कवण करी तुझा हेवा रे |
| १८९५ | ।।ज्ञा.गा.०३९७.०३।। | बहुता परी उणें ऐकिजे पांडवा सांगो या गोष्टी। पांचापासुनी जन्मले पांचैजण येक पत्नीच्या पोटीं। गोत्रवध करुनी राज्य करिती विश्वासी वंद्य शेवटीं। जनमेजया ऐसें बोलिला सत्य तो पापिया जाला कुष्टी |
| १८९६ | ।।ज्ञा.गा.०३९७.०४।। | प्राण जाई तंव बोभाइला तुज पतन तया दशरथा। गणिका एक पाखिरु पोखिलें होतें पाचारिलें प्राण जातां। कीं तयेसी ऊर्ध्वगति ऐसी बोलती पुराणें कासया न मिळे पाहातां। बोलणें खुंटलें तुजपाशीं देवा वेव्हारु नाहीं सर्वथा |
| १८९७ | ।।ज्ञा.गा.०३९७.०५।। | तपाचा जो राशी पुण्यपणें थोर। तीर्थरूप सर्वां तिर्थामंत्राचा अवतार देव आणि शक्ती। सूर्य तैसा विचारतां। तो मांडव्य ऋषि वाहिला सुळीं एक ऊजाला जाला वधिता। पुत्रा पाचारिलें पापिये दुर्जनें तो वैकुंठीं अजामेळु सरतारे रे |
| १८९८ | ।।ज्ञा.गा.०३९७.०६।। | यज्ञ मुखीं अवदाने देती त्या करिसी तूं वांकडें तोंड। लोणी चोरावया जासी घरोघरीं उघडिसी त्यांचीं कवाडें। छप्पन कोटि यादव हे तुझे ते त्वां केलें शापावरपडे। कोळियानें तुज विंधिलें पायीं त्यासी सायुज्यता कोडें रया |

| | | |
|---|---|---|
| १८९९ | ।।ज्ञा.गा.०३९७.०७।। | अष्टांगयोगें शरीर दंडिलें तुजलागीं जाली पिसी। पुत्रदाराधन सांडूनियां जन हिंडताती वनवासी। गाती वाती पूजिती तूंतें त्यांसी निजपद सायासीं। विष पाजूं आली पूतना राक्षसी सायुज्यता देणें तियेसी रया |
| १९०० | ।।ज्ञा.गा.०३९७.०८।। | वारया मोट बांधेल कोण आकाशा कुंप कायसा। सूर्यापुढें दिवा लाऊनि चालणें वाउगाचि शीण जैसा। विचित्र हें तुझें रूप अव्हेरून जासी सर्वज्ञा। ज्ञानदेव म्हणे देवादि देवा जग भांबावलें ऐशीया भावा रया |
| १९०१ | ।।ज्ञा.गा.०३९८.०१।। | देवा तुज नेणतांना कांहीं न सांभाळितां नानायाती धरूनी धाविन्नलों। धावतां धावतां पुढें सुनाट देखिलें त्याची पाउलीं मागुती मुरडलों जी सुंदरा |
| १९०२ | ।।ज्ञा.गा.०३९८.०२।। | आलों भक्तिशाळे अतौता तेथें कांहींएक गौरव गमलें। जेणें वेषें आहे तेणें तुजजोगें नव्हे मग ऐसें कांहीं एक गुंथावें केलें जी सुंदरा |
| १९०३ | ।।ज्ञा.गा.०३९८.०३।। | असो येणें औटहातें काई होईल म्हणोनी एकचि वेळा उगविले। आब्रह्म सकळैक जग आपणापें तुज एकलागीं आणियेलें हो सुंदरा |
| १९०४ | ।।ज्ञा.गा.०३९८.०४।। | आतां अवघा तुज डोळां पाहेन दातारा आलिंगीन अवघाची बाहीं। अवघा मुखीं तुजसी बोलत आहे न ध्याईजें मा चालिली अवघाचि पायीं जी सुंदरा |
| १९०५ | ।।ज्ञा.गा.०३९८.०५।। | आतां अवघा वेळु अवघेपणें तुज अवघीयातें गिळूनी ठेलों। तुझीये भक्तीची चवी जों लागली तंव अवघेपणा उबगलों जी सुंदरा |
| १९०६ | ।।ज्ञा.गा.०३९८.०६।। | पाहतां दर्पण परता नेलिया दुजेपण रिघे पाहाते भागीं। ऐसें आदि मध्य अवसान जाणोनी अवचितां जडिनलों तुमच्या अंगीं हो सुंदरा |
| १९०७ | ।।ज्ञा.गा.०३९८.०७।। | आतां तुज पावेन कवणें दशे नातळसी दुजेपणा केला हो तूंपण नाहीं। तेथें मीपण कैचें होतेनि मिळणें तें गेलें ठाईंच्या ठाईं जी सुंदरा |
| १९०८ | ।।ज्ञा.गा.०३९८.०८।। | ऐसा न जेविलाची जेविला कीं जेविलाची भुकेला तृप्तातृप्त दोन्ही नाहीं। बाप रखुमादेविवर विठ्ठला वरपडा जालों ऐसियाशी कीजे काई जी सुंदरा |
| १९०९ | ।।ज्ञा.गा.०३९९.०१।। | तो आपुलिया चाडा कोटिगर्भवासा येतां श्लाघिजे। तुझिया गोमटेपणा पकडलों दातारा हें बोलणें बोलतां लाजिजे जी सुंदरा |
| १९१० | ।।ज्ञा.गा.०३९९.०२।। | तुमतें देखिलिया हें मन मागुतें मोहरेना। वज्र द्रवे परी मन न द्रवे हाचि विस्मो पुढत पुढती जी सुंदरा |
| १९११ | ।।ज्ञा.गा.०३९९.०३।। | ऐसें स्थावर जंगम स्थापिलें कीं आपुलें वालभ केलें। तूंतें देखिल्या त्रिगुणपरें ऐसें कोणें निष्ठुरें घडविलें जी सुंदरा |
| १९१२ | ।।ज्ञा.गा.०३९९.०४।। | म्हणोनी तुजमाजीं विरावें कीं देवा तूंचि होउनी राहावें। बाप रखुमादेविवरु न बोलावें परी बोलें हें स्वभावें जी सुंदरा |
| १९१३ | ।।ज्ञा.गा.०४००.०१।। | चंद्रा पूर्णिमे पूर्ण शोभा। कळा तुटलिया कैची तेथें प्रभा |
| १९१४ | ।।ज्ञा.गा.०४००.०२।। | तैसा कां गा निकरवृत्ती करिसी। सर्वां ठायीं विभांडिसी गा देवा |
| १९१५ | ।।ज्ञा.गा.०४००.०३।। | कापुरें दृतीसी रुसणें केलें। तरी सांग पां कवणाचें काय गेले |
| १९१६ | ।।ज्ञा.गा.०४००.०४।। | तरंगु निमालिया जळसागरु। सागरासी नाहीं दुसरा उपचारु |
| १९१७ | ।।ज्ञा.गा.०४००.०५।। | शिरा शरीरा एक वंकीं जैसी। आतां तुझ्या पायीं आम्हां पाइकी तैसी गा देवा |

| | | |
|---|---|---|
| १९१८ | ।।ज्ञा.गा.०४००.०६।। | रखुमादेविवरा विठ्ठला राणे राया। मी न बोलें तरी बोलें काजा तुझीया गा देवा |
| १९१९ | ।।ज्ञा.गा.०४०१.०१।। | म्हणोनी तुझें रूप देखिलिया दिठी। जय सच्चिदानंदपदेंसी मिठी। ओंकारेंसी त्रिपुटी न साहे तो तूं सगुण जगजेठी। या दृष्टीचेनी सुखें माये हृदयीं भासलें रूप। शेखीं पाहतां कां आम्हां चाळविसी रया |
| १९२० | ।।ज्ञा.गा.०४०१.०२।। | आतां सेवेलागीं सेवा करणें कोणच्या अंगें। स्वामीपणें जगीं होउनी ठेलें |
| १९२१ | ।।ज्ञा.गा.०४०१.०३।। | तें सांवळिये प्रमाण न दिसे अनुआन। शेखीं ध्यानीं विरालें तें मन गे माये। रूप खुंतलें पण पाहाची हा संपूर्ण तेथें द्वैताद्वैतपण हरपलें रया |
| १९२२ | ।।ज्ञा.गा.०४०१.०४।। | आतां बुद्धीयोग इंद्रियांचा तो तूं गोपवेष साचा। भक्तियोगाचा सौरसु दाविसी आतां। बाप रखुमादेविवरा विठ्ठलाच्या पायीं सुख। तेंच दरुशन एक जालें रया |
| १९२३ | ।।ज्ञा.गा.०४०२.०१।। | आपुलिये खुणें आपणपा दावी। कीं सगुणबुंथी चोख मदवी। ऐसा सुंदर गोपवेषु। कीं तत्त्वमस्यादि सौरसु जेथें श्रुति नेति नेति ठेल्या पायीं। तो तूं सगुण निर्गुणीं निजानंदें सहजचि कळे विदेही रया |
| १९२४ | ।।ज्ञा.गा.०४०२.०२।। | एक म्हणतां दुजे नाहीं रे तेथें शून्य तूं सांगसी काई। निरशून्य तें असतां सगुण तें निराळलें तेथें हे कल्पना काई रया |
| १९२५ | ।।ज्ञा.गा.०४०२.०३।। | नामरूपछंद गोडी ऐसी इंद्रियांची आवडी। परतोनी पाहे घडीघडीं तोची तूं। तेथें आठऊ ना विसरू परी तोची गा तूं। थोरु ऐसा निर्धाराचा धीरु धरी ऐसें जाणोनियां जरी सांडी मांडी करिसी। तरी पावसी कोण येरझारी रया |
| १९२६ | ।।ज्ञा.गा.०४०२.०४।। | तोची तूं जगदात्मा विसावा क्षण घडी न विसंबावा। हाचि होऊनी रहावा प्राण माझा। म्हणोनी धीरु धीरु बाप रखुमादेविवरु। विठ्ठला आतां। प्रपंचीं न गुंतें साचे आम्हां जितांची मरणें कां मेलिया कल्पकोडी जिणें धरी या निवृत्तीची आंत रया |
| १९२७ | ।।ज्ञा.गा.०४०३.०१।। | डोळ्याची निशी कोणें काढिली। कीं रविबिंबा हारीं कोणें आणिली । कीं काळिमा पाठी प्रकाश तरी चंद्र हा नव्हे चकोरां पारणें। फिटलें विकासित कमोदिनी चंद्र हा न दिसे सेखीं नवलावो हें तुझी बोली रया |
| १९२८ | ।।ज्ञा.गा.०४०३.०२।। | तूं आर्त चंद्रमा चकोरें आम्हीं। तृप्त झालों तुझ्या नामीं रया |
| १९२९ | ।।ज्ञा.गा.०४०३.०३।। | जाणाचिया सुजाणा। कीं जीवाचिया जीवना। जिवलगा सोईरिया निधाना गा ऐसा। तो प्रकृतिपरु न कळे तुझा विचारु। साचारी वेवादती दाही दिशा ऐसेंचि लाघव कोणा दाविसीं दातारा। बोलु ठेविसीं कोणा कैसा रया |
| १९३० | ।।ज्ञा.गा.०४०३.०४।। | आवडीमाजीं लागे हे गोडी। नाम रसनेसी सुख निजकीर्ति हे गाढी। कीं तुझा स्वरूपतंतु लागो या मना। अंतरींच्या जीवना अगा तूंचि |
| १९३१ | ।।ज्ञा.गा.०४०३.०५।। | लक्षालक्ष संभार नातुडें हा विचार म्हणोनि श्रुती नेति नेति। तो तूं येकलाचि नट ना देखिलासी दातारा न कळे तुझी हेंही स्थिति। म्हणोनी सांडिमांडी करूं नको मना सगुण जोडे तें करीं प्रीति रया |

| | | |
|---|---|---|
| १९३२ | ।।ज्ञा.गा.०४०३.०६।। | यालागीं मनेंसी बोध चाळावा कीं जोडलेपणें पाहावा। कीं कोणाहि या मावा इंद्रियांचिया। सकळ इंद्रियेंसी नगर कोंदलें दशदिशीं विस्तार। म्हणोनी तुझें रूप अनावर कोणें धरिजे दातारा। बाप रखुमादेविवरा विठ्ठला धीरा उघडा। डोळां देखिजे निधान तंव मार्ग सोपा रया |
| १९३३ | ।।ज्ञा.गा.०४०४.०१।। | मंगळमूर्ति तूं कीं मनाचिया लावण्यवाणा। वेधी वेधक तूं सहजगुणा। सगुण निर्गुण न कळे तुझें विंदान। कैसें आपचि पर दाटुन रिगसी। तेथें नवलाव वर्णूं काय कोणा रया |
| १९३४ | ।।ज्ञा.गा.०४०४.०२।। | वर्णितां तुझे गुण मना मौन्य पडे। कळिकाळ बापुडें काय करील आम्हां |
| १९३५ | ।।ज्ञा.गा.०४०४.०३।। | ध्यानमूर्ति तुझी मनें अळंकारलीं मनामाझारीं संचरलीं। संचरतां इंद्रियें समानपदीं तुजवीण न दिसे आन बोली। तेथें भिन्नाभिन्नपणीं कोणा पाहों दातारा दिठी सुखाचेनी सुखें स्थिरावलीं रया |
| १९३६ | ।।ज्ञा.गा.०४०४.०४।। | बाप रखुमादेविवर विठ्ठलें कीं आनंदाचे ओळले ठेले। वोतप्रोत सघन नावेक नुरे कांहीं एक केलें। तुझें तुज गाऱ्हाणें किती देऊं दातारा बोलवितां नव्हे भलें रया |
| १९३७ | ।।ज्ञा.गा.०४०५.०१।। | तुझी सेवा करीन मनोभावें वो। माझें मन गोविंदीं रंगलें वो |
| १९३८ | ।।ज्ञा.गा.०४०५.०२।। | नवसिये नवसिये माझे नवसिये वो। पंढरीचे दैवतें विठ्ठलें नवसिये वो |
| १९३९ | ।।ज्ञा.गा.०४०५.०३।। | बाप रखुमादेविवरें विठ्ठलें वो। चित्त चैतन्य चोरुनी नेलें वो |
| १९४० | ।।ज्ञा.गा.०४०६.०१।। | तुझी गुण कीर्ति ऐकोनी आर्ते मन उचंबळलें। आलिंगना धाविन्नलें उतावीळ |
| १९४१ | ।।ज्ञा.गा.०४०६.०२।। | तनु मनु विगुंतलें मन वाचा गुंतलें। मी माझें विसरलें दर्शन गे माये |
| १९४२ | ।।ज्ञा.गा.०४०६.०३।। | उतावेळपणें भुजादंड उचलेले। नेणोनी ठकले ठेले रूप पाहातांची बाईये |
| १९४३ | ।।ज्ञा.गा.०४०६.०४।। | पातिया पातें नलगे पाहाणें तेंचि ठेलें। तैसें बाप रखुमादेविवरें विठ्ठलें केलें गे माये |
| १९४४ | ।।ज्ञा.गा.०४०७.०१।। | तुझे पवाडे सांगतां तुजपुढें। मुक्तीचीं कवाडें उघडती |
| १९४५ | ।।ज्ञा.गा.०४०७.०२।। | नाहीं जातिकुळ म्यां तुज पुसिलें। मन मावळलें देखोनियां |
| १९४६ | ।।ज्ञा.गा.०४०७.०३।। | तुझें तुज पुसतां लाजिरवाणें। तरी हांसती पिसुणें प्रपंचाचीं |
| १९४७ | ।।ज्ञा.गा.०४०७.०४।। | उगवितां भलें कीं नुगवितां सांपडलें। ज्ञानदेवो बोले निवृत्तीसी |
| १९४८ | ।।ज्ञा.गा.०४०८.०१।। | फळाचें बीज कीं बीजाचें फळ। म्हणोनी पत्र पुष्प मूळ चोजवेना |
| १९४९ | ।।ज्ञा.गा.०४०८.०२।। | ऐसी हे रचना नकळे गा देवा। सिद्धांतु अनुभवा साक्ष देतो |
| १९५० | ।।ज्ञा.गा.०४०८.०३।। | मृत्तिकेची पृथ्वी कीं पृथ्वीची मृत्तिका। या गति अनेकां चोजवेना |
| १९५१ | ।।ज्ञा.गा.०४०८.०४।। | बाप रखुमादेविवरु निरंतरीं। बाह्य अभ्यंतरीं नांदतुसे |
| १९५२ | ।।ज्ञा.गा.०४०९.०१।। | आकार स्थूल नाशिवंत। हे तरी जाईल भूमि आंत। तयावरी हरि चालत। तेणें मी होईल कृतकृत्य |

| | | |
|---|---|---|
| १९५३ | ।।ज्ञा.गा.०४०९.०२।। | देहो जावो अथवा राहो। पांडुरंगीं दृढ भावो |
| १९५४ | ।।ज्ञा.गा.०४०९.०३।। | दुजा गुण आपीं मिळे। तरी मी होईन गंगाजळें। हरि अभिषेक अनुदिनीं। सुखें सर्वांगावरी खेळे |
| १९५५ | ।।ज्ञा.गा.०४०९.०४।। | तिजा गुण तेजरूप। तरी मी होईन महादीप। हरि रंगणीं दीपमाळा। दीप उजळीन समीप |
| १९५६ | ।।ज्ञा.गा.०४०९.०५।। | वायु व्यापक चौथा गुण। तरी मी विंजणा होईन। हरि अष्टांगें निववीन। ऐशी दृढ धरीन खुणा |
| १९५७ | ।।ज्ञा.गा.०४०९.०६।। | आकाशाचा पांचवा गुण। तरी मी महाप्रासादीं राहेन। बाप रखुमादेविवरा। अखंड तुझें अनुसंधान |
| १९५८ | ।।ज्ञा.गा.०४१०.०१।। | भुक्ति मुक्ति कारणें न घालीं तुज साकडीं। हे तों ठायींचीच जोडी। कांहीं जोडिली असे तुज नेणतां हें तुझेंची दळवाडें। ऐसें जाणोनी फुडें न बोलें दातारा |
| १९५९ | ।।ज्ञा.गा.०४१०.०२।। | सलिलीं तरंग तरंगीं सलील। निवडूनियां कोण वेगळें करील |
| १९६० | ।।ज्ञा.गा.०४१०.०३।। | उपाधिभेदें भूमि झाली क्षिती ऐसें विचारितां चित्तीं अनु न देखे। इतुलालें जीवपण तुज मज दातारा वेगळेंची नाहीं रे गोवळ्या |
| १९६१ | ।।ज्ञा.गा.०४१०.०४।। | दर्पणाचें दुजेपण दर्पण जंववरी तें काय वेगळ्याल्या व्यापारीं ठेवूं येईल। नाम घेउनी ठेले हेम अळंकारु। इतुलाले अंतरु तुज मज रया |
| १९६२ | ।।ज्ञा.गा.०४१०.०५।। | वाहटुळीची धांव केवढा वेळु आकाशीं। सहज स्वभावें निमे अपैसी। गगनावरी जातां नलगे पाल्हाळ। तैसें तुज मज सकळ ऐक्य रया |
| १९६३ | ।।ज्ञा.गा.०४१०.०६।। | गगना वेगळा घटु केवीं निपजे दातारा यापरी सर्वेश्वरा तूं मी एक। बाप रखुमादेविवरु विठ्ठलु भोगिया। येरी असतु वावुगिया गोठी रया |
| १९६४ | ।।ज्ञा.गा.०४११.०१।। | अगुणाचिया समंधा गुणसंबंध करूं। नकळे हा वेव्हारू लोकांमाजी। हा नाटकु विंदाणी न कळे याची करणी। दाटोनी अंत:करणीं रिघों पाहे |
| १९६५ | ।।ज्ञा.गा.०४११.०२।। | सर सर ये परता गणाचिया गुणा । निजसुखनिधाना तूंचि एकु |
| १९६६ | ।।ज्ञा.गा.०४११.०३।। | तुझ्या गुणागुणीं वेधिलीं मुनिवृंदें। मानसाचिया छंदें वर्तसी तूंचि। आपुलें निज सोंग भुलविलें जयासी। अखंड मानसीं जवळी आहे |
| १९६७ | ।।ज्ञा.गा.०४११.०४।। | ऐसा हा नवलावो  विस्मो हा वाटला। भाव हा गळाला काय सांगों। रखुमादेविवरु विठ्ठलु हृदयीं वसे। बाह्यअभ्यंतरीं केव्हां वेगळा नव्हे रया |
| १९६८ | ।।ज्ञा.गा.०४१२.०१।। | तुझिया गुणासाठी लागलों भजनपाठीं। तुझी सगुणगोठी हृदयीं वसे। मी म्हणें तें जीवन कीं निर्गुण चैतन्यघन। व्याप्य व्यापक स्थान दुजें नाहीं। विश्वाकारें जगडंबरला जो श्रुति नेति नेति म्हणोनी ठेला। हेंचि भावें विचारी भलें। परी दृष्टि सगुण हृदयींचि हे खूण परी न विसंबे तुझिया पायां रया |
| १९६९ | ।।ज्ञा.गा.०४१२.०२।। | तूं एकुची एकला बाहिजु भीतरीं। कोणा द्वैतपरी सांगों बापा |

| | | |
|---|---|---|
| १९७० | ।।ज्ञा.गा.०४१२.०३।। | म्हणोनी परापर स्थूळसूक्ष्म विचार। तो तुझा सगुणची आधार मज वाटे। म्हणोनी ते तुझी बुंथी हेचि उरो आम्हां स्थिती। कीं द्वैताद्वैत भ्रांती न लगे मना |
| १९७१ | ।।ज्ञा.गा.०४१२.०४।। | ते तुझेनी सुखें पडिपाडे आणि हें मनची स्वयें उजाडे। जेथें थोडें बहु न निवडे ऐसें जाले। तेथें आपुलिये अंगा विसर पडो ठेलें। शेखीं सोंगची दुणावलें रया |
| १९७२ | ।।ज्ञा.गा.०४१२.०५।। | या मनाची भ्रांती फेडावया तो तुझा सगुणभाव मज गोड लागे। पाहातें पाहाणियामाजीं स्वयेंची विस्तारलासी कीं देखणेंची तेणें होउनी अंगें। त्रिपुटीसहित शून्याशून्य निमालें ॐकार मार्गही हे न चले। रखुमादेविवरु विठ्ठलें उदारें। सुख भोगिजे येणें अंगें रया |
| १९७३ | ।।ज्ञा.गा.०४१३.०१।। | काळा पैं गोवळु काळासी अलोट। नामामृतें पाठ भक्त देहीं। नित्य सुख आम्हां तपांचिया कोडी। न लगती परवडी व्रतें तीर्थें |
| १९७४ | ।।ज्ञा.गा.०४१३.०२।। | सुलभ सोपारा सर्वांघटीं असशी। साधुसंगें दिससी आम्हां रया |
| १९७५ | ।।ज्ञा.गा.०४१३.०३।। | चैतन्याशेजारीं मन पैं मुरालें। सांवळें सानुलें हृदयघटीं। बाप रखुमादेविवरु विठ्ठलराज। निवृत्तीनें बीज सांगितलें |
| १९७६ | ।।ज्ञा.गा.०४१४.०१।। | अवघा डोळां तुज म्यां पाहावें। अवघा श्रवणीं तुजची ऐकावें |
| १९७७ | ।।ज्ञा.गा.०४१४.०२।। | अवघी मूर्ति तुजपें ध्यावें। अवघा चरणीं तुझ्या पंथीं चालावें |
| १९७८ | ।।ज्ञा.गा.०४१४.०३।। | रखुमादेविवरु अदट दाविला। माझ्या देहीं वाढला ब्रह्माकारें |
| १९७९ | ।।ज्ञा.गा.०४१५.०१।। | व्योमाचा पालऊ शिरेंवीण पांगुरलें। मस्तकेंवीण तुरंबिलें सुमन वो |
| १९८० | ।।ज्ञा.गा.०४१५.०२।। | सुखाचें सुख निजसुख नव्हे। नव्हे तें होय म्यां गिळिलें गे माये |
| १९८१ | ।।ज्ञा.गा.०४१५.०३।। | नेणोनी शहाणे झाले चौघेजण। अठरांसी खूण बाणली माये |
| १९८२ | ।।ज्ञा.गा.०४१५.०४।। | रखुमादेविवरु जीवनीं जीवनु। त्याहून माझें मनु परतें देवा |
| १९८३ | ।।ज्ञा.गा.०४१६.०१।। | कांहीं न करीजे ते तुझी सेवा। कांहीं न होसी तें तूं देवा |
| १९८४ | ।।ज्ञा.गा.०४१६.०२।। | नेणिजे तें तुझें रूप। जाणिजे तितुकें पाप गा देवा |
| १९८५ | ।।ज्ञा.गा.०४१६.०३।। | स्तुति करणें ते तुझी निंदा। स्तुति जोगा नव्हेसी गोविंदा |
| १९८६ | ।।ज्ञा.गा.०४१६.०४।। | बाप रखुमादेविवरा विठ्ठला। एवढा साभिलाषु कां दाविला |
| १९८७ | ।।ज्ञा.गा.०४१७.०१।। | निमिष नलगे मन वेधितां। येवढी तुझी स्वरूपता |
| १९८८ | ।।ज्ञा.गा.०४१७.०२।। | विठोबा नेणों कैसी भेटी। उरणें नाहीं जिवेसाठीं |
| १९८९ | ।।ज्ञा.गा.०४१७.०३।। | उरलें उपाधीकारणें। तें त्वां नेमिलें दरुशनें |
| १९९० | ।।ज्ञा.गा.०४१७.०४।। | निवृत्तिदासा वेगळें। सांगावयां नाहीं उरलें |
| १९९१ | ।।ज्ञा.गा.०४१८.०१।। | पावलों जी म्हणे देखिलें जें देखणें। गेली आधीं तेणें दृष्टि माझी |
| १९९२ | ।।ज्ञा.गा.०४१८.०२।। | उचललिया बाह्या क्षेम देईन तया। गेली माझी माया देहत्यागें |

| | | |
|---|---|---|
| १९९३ | ।।ज्ञा.गा.०४१८.०३।। | आनंदें स्फुंदत येती अश्रुपात। अगा गुरुनाथ देवराया |
| १९९४ | ।।ज्ञा.गा.०४१८.०४।। | निवृत्तिदास म्हणे तूंतें जीवें वोवाळिलें। शिर निरोपिलें तुझ्या चरणीं |
| १९९५ | ।।ज्ञा.गा.०४१९.०१।। | तुझेनी बळें मांडली फळी। तुवां जवळी असिलें पाहिजे |
| १९९६ | ।।ज्ञा.गा.०४१९.०२।। | ऐसीये झुंजीं घालिसी मज। काकुळती तुज नाहीं आतां |
| १९९७ | ।।ज्ञा.गा.०४१९.०३।। | रणभूमि आला रणवट घातला। पाहों जों लागला न देखे कांहीं |
| १९९८ | ।।ज्ञा.गा.०४१९.०४।। | ज्ञानदेवो म्हणे उफराटें पाहाणें। खुंटलें येणें जाणें येची भेटी |
| १९९९ | ।।ज्ञा.गा.०४२०.०१।। | पाहे पां ध्वजेचें चिरगूट। राया जतन करितां कष्ट |
| २००० | ।।ज्ञा.गा.०४२०.०२।। | तैसा मी एक पतीत। परी तुझा मुद्रांकित |
| २००१ | ।।ज्ञा.गा.०४२०.०३।। | मसीपत्र तें केवढें। रावो चालवी आपुल्या पाडें |
| २००२ | ।।ज्ञा.गा.०४२०.०४।। | बाप रखुमादेविवरदा। सांभाळावें आपुल्या ब्रिदा |
| २००३ | ।।ज्ञा.गा.०४२१.०१।। | मी माझें करूनि देह चालविसी वायां आतां। जेथींचा तेथें निमोनि जाय ऐसें कीजे देवराया |
| २००४ | ।।ज्ञा.गा.०४२१.०२।। | जंव जंव गोड तंव तंव जाड। जाड गोड दोन्ही नको रया |
| २००५ | ।।ज्ञा.गा.०४२१.०३।। | त्रिगुणवोझें जडपण रचूनि लोटूनि देसी महापुरीं। आवर्त वोळसा पडिलिया। मग तेथें कैंची अहे उरी रया |
| २००६ | ।।ज्ञा.गा.०४२१.०४।। | ऐसें लटिकेंचि गाऱ्हाणें देवो मी किती। तंव तुज नये काकुलती। बाप रखुमादेविवरा विठ्ठला। म्यां तुजमाजीं घेतली सुती रया |
| २००७ | ।।ज्ञा.गा.०४२२.०१।। | परिमळाची धांव भ्रमर वोढी। तैसी तुझी गोडी लागो मज |
| २००८ | ।।ज्ञा.गा.०४२२.०२।। | अविट गे माय विटेना। जवळी आहे परी भेटेना |
| २००९ | ।।ज्ञा.गा.०४२२.०३।। | तृषा लागलीया जीवनातें ओढी। तैसी तुझी गोडी लागो या जिवा |
| २०१० | ।।ज्ञा.गा.०४२२.०४।। | बाप रखुमादेविवरा विठ्ठलीं आवडी। गोडियेसी गोडी मिळोन गेली |
| २०११ | ।।ज्ञा.गा.०४२३.०१।। | पडलें दूर देशीं मज आठवें मानसीं। नको नको हा वियोग कष्ट होताती जिवासी |
| २०१२ | ।।ज्ञा.गा.०४२३.०२।। | दिनु तैसी रजनी मज जाली वो माये। अवस्था लावुनी गेला अझुनी कां न ये |
| २०१३ | ।।ज्ञा.गा.०४२३.०३।। | गरुडवाहना, गंभिरा येई गा दातारा। बाप रखुमादेविवरा श्रीविठ्ठला |
| २०१४ | ।।ज्ञा.गा.०४२४.०१।। | पैल मेरुच्या शिखरीं। एक योगी निराकारी। मुद्रा लावुनी खेंचरीं। प्राणायामीं बैसला |
| २०१५ | ।।ज्ञा.गा.०४२४.०२।। | तेणें सांडियेली माया। त्यजियेली कंथा काया। मन गेलें विलया। ब्रह्मानंदा माझारीं |
| २०१६ | ।।ज्ञा.गा.०४२४.०३।। | अनुहत ध्वनि नाद। तो पावला परमपद। उन्मनीं तुर्याविनोदें छंदें छंदें डोलतुसे |
| २०१७ | ।।ज्ञा.गा.०४२४.०४।। | ज्ञान गोदावरीच्या तीरीं। स्नान केलें पंचाळेश्वरीं। ज्ञानदेवाच्या अंतरीं। दत्तात्रेय योगिया |
| २०१८ | ।।ज्ञा.गा.०४२५.०१।। | देव करी तरी काय न होई। दगडाचिये नई तरिजेल |

| | | |
|---|---|---|
| २०१९ | ।।ज्ञा.गा.०४२५.०२।। | सूर्यकिरणांवरी मुंगियाच्या हारी। अग्निचे पाठारीं पीक होय |
| २०२० | ।।ज्ञा.गा.०४२५.०३।। | फुटतील पाय चालतील भिंती। मेरु मशक येती समतुका |
| २०२१ | ।।ज्ञा.गा.०४२५.०४।। | ज्ञानदेव म्हणे अघटित घडे। गुरुकृपें जोडे परब्रह्म |
| २०२२ | ।।ज्ञा.गा.०४२६.०१।। | धांवसील सैरा परि नातुडेचि कांहीं। विचारूनि पाही मनामाजी |
| २०२३ | ।।ज्ञा.गा.०४२६.०२।। | सद्गुरु वांचोनि बोध कैंचा मना। वायां अंत:करणा शिणविसी |
| २०२४ | ।।ज्ञा.गा.०४२६.०३।। | ज्ञानदेव म्हणे न धावेंचि सैरा। रखुमादेविवरा आण तुझी |
| २०२५ | ।।ज्ञा.गा.०४२७.०१।। | मोतियाचा वोगरु। गुरुवाक्यें सदन्नीं। वाढियेला भाजनीं। नभाचिया |
| २०२६ | ।।ज्ञा.गा.०४२७.०२।। | धारणेच्या हातें। जेवा दृष्टीमुखें। गोडियेच्या सुखें। अंगें भरा |
| २०२७ | ।।ज्ञा.गा.०४२७.०३।। | चाखवितां विरळा। बहुतामाजी एक। आहेत दांभीक। घरोघरीं |
| २०२८ | ।।ज्ञा.गा.०४२७.०४।। | ज्ञानदेव म्हणे। जो दावी या खुणें। त्याचे पायीं होणें। लीन सदा |
| २०२९ | ।।ज्ञा.गा.०४२८.०१।। | दृष्टीचा देखणा दृष्टी-अगोचर। दृष्टी गोचर होय केवीं |
| २०३० | ।।ज्ञा.गा.०४२८.०२।। | आदि मध्य ज्याला नाहीं आदि अंत। व्यापक श्रीमंत निवृत्तिराज |
| २०३१ | ।।ज्ञा.गा.०४२८.०३।। | ज्ञानदेव म्हणे डोळियांचा डोळा। ओळखावा बुबुळा आपुलिया |
| २०३२ | ।।ज्ञा.गा.०४२९.०१।। | नऊ कान वाचे नवही द्वारें पाही। सोहं तेचि घेई एकविध |
| २०३३ | ।।ज्ञा.गा.०४२९.०२।। | गहिनीनाथ सांगे निवृत्तीचे कानीं। पावले ते ज्ञानी सिद्धपंथें |
| २०३४ | ।।ज्ञा.गा.०४२९.०३।। | ज्ञानदेव म्हणे गुह्य हें सप्तक। अनुभववू लेख पाहिलीया |
| २०३५ | ।।ज्ञा.गा.०४३०.०१।। | महेशें शिवेसी। निजखूण दाविली। हंसें लाधविली। कमळासना |
| २०३६ | ।।ज्ञा.गा.०४३०.०२।। | सनकादिक तृप्त। ज्या सुखेसी जाले। योगी आनंदले। युगायुगीं |
| २०३७ | ।।ज्ञा.गा.०४३०.०३।। | तेचि मज केलें। करतळामळ। निवृत्ति कृपाळ। काय वानूं |
| २०३८ | ।।ज्ञा.गा.०४३१.०१।। | जें अगम्याचें ध्यान। जें मनाचें मनन। जें पुण्याचें पावन। वस्तुरूप |
| २०३९ | ।।ज्ञा.गा.०४३१.०२।। | कैसें वरिष्ठांचे सार। जों आदिअंतीं विचार। हें जाणले अवतार। मानवी होती |
| २०४० | ।।ज्ञा.गा.०४३१.०३।। | जें गुह्याचें मौन्यमाळा। तें मज केलें करतळामळा। अचळादि अचळा। सुख असें |
| २०४१ | ।।ज्ञा.गा.०४३१.०४।। | ऐसाचि सत्शिष्यें उदय जाला। कैसे अवयव प्रकाशें फावला। कीं माझेचि घरीचा जाला ठेवणाइत |
| २०४२ | ।।ज्ञा.गा.०४३१.०५।। | जागृति स्वयंभ दिसे। निजलिया प्रकाशें। कैसा समाधिचा विलासे। संपादिला |
| २०४३ | ।।ज्ञा.गा.०४३१.०६।। | निवृत्ति सुखाचा टेका। पावोनि आलों आपुल्या मठा। ज्ञान येकला निका। ज्ञानदेव |
| २०४४ | ।।ज्ञा.गा.०४३२.०१।। | जैसा दीप भलत्या ठायीं लाविला। तो चोरा सावा सारखा जाला। तैसा आम्ही तुम्ही केला |

| | | |
|---|---|---|
| २०४५ | ।।ज्ञा.गा.०४३२.०२।। | तुम्ही एक मुक्त केलें। विश्वकर्त्या सारिखें जालें। सत्यब्रीद आपुलें। देव बोले |
| २०४६ | ।।ज्ञा.गा.०४३२.०३।। | जैसें आपण करूं जावे। तैसें विश्व धरितो नवें। परी सद्‌गुरु गुह्यांत नवे। जालें नाहीं |
| २०४७ | ।।ज्ञा.गा.०४३२.०४।। | जैसें पर्वतदरीचे वोघ। समुद्रीं निघाले सैंघ। तैसें तुझियानें जग। मुक्त जालें |
| २०४८ | ।।ज्ञा.गा.०४३२.०५।। | जें जग दिसे गांजिलें। तें शेवटीं ब्रह्म जालें। परमदशेसी आलें। अतिवैभवाच्या |
| २०४९ | ।।ज्ञा.गा.०४३२.०६।। | सद्‌गुरुचें गांजिलें पाही। तें कोठेंहि गेलिया मोक्ष नाहीं। देहीं अथवा विदेही नाडिलें देखा |
| २०५० | ।।ज्ञा.गा.०४३२.०७।। | मुक्ताईचें श्रेष्ठ वचन। निवृत्ति देवाचा सत्य प्रश्न। ज्ञानेश्वराचा सोपान। भाविकाला |
| २०५१ | ।।ज्ञा.गा.०४३३.०१।। | जैसी माउली लेकराचा ळळा। लेणीं लेविलीं पाहे डोळां। तैसा आम्हां तुवां दयाळा। चोज केलें |
| २०५२ | ।।ज्ञा.गा.०४३३.०२।। | लेणीं नटविलीं ठायीं ठायीं तें आपुलें सौभाग्यपण पाही। देहीं अनुभवितां विदेही। तेणें केलें |
| २०५३ | ।।ज्ञा.गा.०४३३.०३।। | माया पडदा फुटोनि गेला। मंगल पडदा उदय जाला। जीव शिवेसि वरिला। दयानिधि |
| २०५४ | ।।ज्ञा.गा.०४३३.०४।। | जैसा निंदिलिया उजगरा। धरु धांवे मायिक संसारा। तैसा मी स्वहित विचारा। धांवो लागे |
| २०५५ | ।।ज्ञा.गा.०४३३.०५।। | मग उमललों बाहेरी। कां बैसलों अंधारीं। तरी ते कवणे परी। वंचिजेना |
| २०५६ | ।।ज्ञा.गा.०४३३.०६।। | निवृत्ति पहावयाची रीति। कैसी कडणसी केली निगुति। तेव्हां चकचकिती। भलतीकडे |
| २०५७ | ।।ज्ञा.गा.०४३३.०७।। | ज्ञानेश्वराची परमभूली। बोध साधकाची बोधावली। ते आमुची चैतन्य माउली। खेळो लागे |
| २०५८ | ।।ज्ञा.गा.०४३४.०१।। | योगभ्रष्टाचें वर्णन। जिये समूळ पाहिलें ज्ञान। वस्तू वस्तूचि म्हणोन। मौन्य जालें |
| २०५९ | ।।ज्ञा.गा.०४३४.०२।। | ऐक्यें आपणासि ऐसे। गुरुकृपें ज्ञान असे। अल्प मावळोनि सर्व दिशें। मीचि जालों |
| २०६० | ।।ज्ञा.गा.०४३४.०३।। | सद्‌गुरु बोलाचा विश्वास। मानस स्थीरावुनि परिस। जेथें ध्यानाचा अवकाश आकाश। फावलिया |
| २०६१ | ।।ज्ञा.गा.०४३४.०४।। | कैसें दयाळ सुकृत खर्चिलें। आपुलें निजधन वांटूनि दिलें। तैसें ज्ञानवाटा जालें। प्रतापें आपुल्या |
| २०६२ | ।।ज्ञा.गा.०४३४.०५।। | निवृत्ति निरंजनाचा सरा। कैसा वोसंडला अंबरा। सुख पावोनि ज्ञानेश्वरा। ब्रह्म केलें |
| २०६३ | ।।ज्ञा.गा.०४३५.०१।। | नाना मतीची भूषण। मनेचि करावें गमन। तो आणि आपण। उरों नये |
| २०६४ | ।।ज्ञा.गा.०४३५.०२।। | जनका हेंचि जालें। तेणें विश्व ब्रह्मचि केलें। त्यांत वेगळेपण आपुलें। मिरवूं नये |
| २०६५ | ।।ज्ञा.गा.०४३५.०३।। | गुरुवाक्य परम धडा। अनुभव भाविकाचा हुडा। तो अचाट धारकडा। वेंधूनि जावें |
| २०६६ | ।।ज्ञा.गा.०४३५.०४।। | तेथे धरुनि देहभ्रांति। ते जाहली गेली किती। तेथें ज्ञानाची शक्ति। केतुली माझी |
| २०६७ | ।।ज्ञा.गा.०४३५.०५।। | जें पैल आपलें स्वस्थान। त्यासी म्हणूं नये स्वप्न। गुरुवाटा ज्याशी खूण। निकट पहावी |
| २०६८ | ।।ज्ञा.गा.०४३५.०६।। | निवृत्ति माय ते गोजिरी। ज्ञानेश्वरीची सोज्वळ सारी। शिकविलें अनेकां परी। कामा आलें |
| २०६९ | ।।ज्ञा.गा.०४३६.०१।। | तुमचीं मिष्टामिष्ट बोलणीं। ते दर्पणाहूनि विशेष देखणीं। फार विसरलों थोडी मनीं। धरली आहे ती |
| २०७० | ।।ज्ञा.गा.०४३६.०२।। | तुम्ही अगम्य गोसावी। वस्तु सांगतां नित्य नवी। आम्ही लेंकुरें लाघवी। छंदिस्तचि |

| | | |
|---|---|---|
| २०७१ | ।।ज्ञा.गा.०४३६.०३।। | आम्ही आळीचे आळुकी पूर्ण। आवडी मागावे आवडे मन। तें तुमचें आम्ही बोलणें। खेळ वाटे |
| २०७२ | ।।ज्ञा.गा.०४३६.०४।। | तुम्हांसि जें आवडीं बोलावें। तें अगम्य तुम्हां आधी ठावें। आम्ही बोलूं हें होईल नवें। जुनाट जुनें निवृत्ति माये |
| २०७३ | ।।ज्ञा.गा.०४३७.०१।। | माय तुम्हीं जें शिकविलें। तें तुम्हांस आम्हांस बोलें। तें म्हणूं नका नवे जालें। तुम्हीचि आधि |
| २०७४ | ।।ज्ञा.गा.०४३७.०२।। | जरी बोलतां याचि बोला। हास्य वाटेल सज्जनाला। न जाणो न चुके चला। एकांतासी |
| २०७५ | ।।ज्ञा.गा.०४३७.०३।। | दिवस दिशा स्थान मान। काशी प्रयाग बद्रिकाश्रम। त्रिगुणाची तीन स्थान। ते हे आम्हां इंद्रायणी |
| २०७६ | ।।ज्ञा.गा.०४३७.०४।। | तुम्हीचि मित्र बंधु सार। तुम्हीचि सद्गुरु करुणाकर। तुमच्या चरणीं तीर्थ सारे। पाहूं आम्ही |
| २०७७ | ।।ज्ञा.गा.०४३७.०५।। | निवृत्तिसुखाचा परमानंदु । ज्ञानशक्तीचा क्षीरसिंधू। ज्ञानेश्वराचा पदबंधू। सिद्धि नेला |
| २०७८ | ।।ज्ञा.गा.०४३८.०१।। | अहंता सांडोनी सोहं रश्मी घेई। ब्रह्म स्वयें होयी गुरुपुत्रा |
| २०७९ | ।।ज्ञा.गा.०४३८.०२।। | एक कला सार वाउगें असार। स्वरूपस्थिती पार पावशील |
| २०८० | ।।ज्ञा.गा.०४३८.०३।। | नामरूप भेदी लक्ष साधी याचा। होईल सुखाचा अनुभव |
| २०८१ | ।।ज्ञा.गा.०४३८.०४।। | निवृत्तीनें गूज सांगितलें कानीं। ज्ञानदेवा मनीं हाचि छंदु |
| २०८२ | ।।ज्ञा.गा.०४३९.०१।। | अनंत जन्मींचें सुकृतफळ। तरीच फाविजे ऐसें बळ। पुरती इच्छिले डोहळे। स्वसुखाचे |
| २०८३ | ।।ज्ञा.गा.०४३९.०२।। | भवार्णवाची येरझार मोडे। तरीच सद्गुरुसंग घडे। हातां कामधेनु चढे। अलक्षाची |
| २०८४ | ।।ज्ञा.गा.०४३९.०३।। | वैराग्ययुक्तिचें फळ। बीज तैसें पाहिजे फळ। जेणें आपुले बोध विशाळ। पाल्हाळ ती |
| २०८५ | ।।ज्ञा.गा.०४३९.०४।। | यज्ञ चाले ऐसें चिन्ह। अज्ञान होती विचक्षण। तैं मूढां होय ज्ञान। विरक्तिचें |
| २०८६ | ।।ज्ञा.गा.०४३९.०५।। | गेलियावीण तीर्थ सांपडे । उपमेरहित परिस जोडे। किंवा समागमे घडे। सद्गुरुचा |
| २०८७ | ।।ज्ञा.गा.०४३९.०६।। | अभक्त भक्त होती। श्रोतिया वक्त्या सायोज्यगति। राजविद्येची प्राप्ति। होय जया |
| २०८८ | ।।ज्ञा.गा.०४३९.०७।। | वैराग्याविण मुक्ति जोडे। निदान वृत्ति हातां चढे। सोपा गुह्य झाला गूढ। ज्ञानदेवाचा |
| २०८९ | ।।ज्ञा.गा.०४४०.०१।। | मग निर्गुण निर्विकार। जगद्गुरु आदि अवतार। कैसे धारणा बांधेल धार। रोमरंध्रीं |
| २०९० | ।।ज्ञा.गा.०४४०.०२।। | ऐसे पाहोनी योग आधी। वरी सद्गुरु सांगितली समाधि। येरी पडलों असतों बंदीं। भवार्णवाच्या |
| २०९१ | ।।ज्ञा.गा.०४४०.०३।। | अहो जी भाग्य आमुचें केव्हढें। आम्ही मागें तूं धांव घेई पुढें। उघडिले जननीचे कवाडे। अनुभवें तुमच्या |
| २०९२ | ।।ज्ञा.गा.०४४०.०४।। | जैसी गर्भां घाला भुली। माये चालवी आपुल्या चाली। पुढें अनेक भाषा आली। पांच पाटांगणें |
| २०९३ | ।।ज्ञा.गा.०४४०.०५।। | हात लावुनिया दारवंटा। झडपा लोटिली उन्मनी अवस्था। कांहीं कान उचली माथा। ऐसें वाटे |
| २०९४ | ।।ज्ञा.गा.०४४०.०६।। | ते निर्विकार घडे। तलाव दिसे ओंकार ब्रह्मांडें। मी म्हणे ऐसे तोंडें कैसे म्हणूं |
| २०९५ | ।।ज्ञा.गा.०४४०.०७।। | तेथें पुसतां नये वृत्तांतु। खालती सांगतां नये मातु। जें जालें शब्दातीतू। गुह्य भाषा |
| २०९६ | ।।ज्ञा.गा.०४४०.०८।। | निवृत्ति जीवन वळूनि आलें। ज्ञानेश्वरासि तैसेचि केलें। चक्षु अनुभवें वाहिलीं फुलें तया माथा |

| | | |
|---|---|---|
| २०९७ | ।।ज्ञा.गा.०४४१.०१।। | निर्विकाराचें अगम्य पाहणें। निगम बोधक गेलें मावळून। मग आयुष्य झांकलेपणें। मिरवो लागे |
| २०९८ | ।।ज्ञा.गा.०४४१.०२।। | आतां जी पहावें। पुढें काय अनुमानावें। कीं पाहोनियां हसावें। नवल ऐसे |
| २०९९ | ।।ज्ञा.गा.०४४१.०३।। | जेथें दृष्टी दृष्टीस हरपली। कितेक ममता येकली। तेथें पाहिजे गुरुकिल्ली। तरीच सुखिया |
| २१०० | ।।ज्ञा.गा.०४४१.०४।। | राहे वेदाचें वेदाध्ययन। श्रुति नेति नेति धरी मौन्य। योगी विसर्जील देहभान। ऐसें जालें बापा |
| २१०१ | ।।ज्ञा.गा.०४४१.०५।। | कैसें चैतन्य चिदानंद जालें। आभास आभासीत मावळूनि गेलें। आहे परि नाहींसें जालें। गुह्यगूढ |
| २१०२ | ।।ज्ञा.गा.०४४१.०६।। | भूमिपासोनि आकाशासी। रवि तारांगण संचली जैसी। पाहिली वस्तु परी ऐसी मावळूनि गेली |
| २१०३ | ।।ज्ञा.गा.०४४१.०७।। | अहो जी निवृत्ति सद्‍गुरु विचित्रा। भले रक्षिलें तारकमंत्रा। करोनिया आले यात्रा। अरूपाची |
| २१०४ | ।।ज्ञा.गा.०४४१.०८।। | ज्ञानेश्वरानें प्रतिपादिलें। कीं मृत्यूस अमृत्युपण आलें। समागमाचें फळ आपुलें। प्राप्त आम्हां |
| २१०५ | ।।ज्ञा.गा.०४४२.०१।। | आणि देखिलें स्वप्नीं। शास्त्रेंच जाहली ज्ञानी। अंगा लागतां कडसणी। रिघो पाहती |
| २१०६ | ।।ज्ञा.गा.०४४२.०२।। | दुजाची करावया विटंबना। निंदू पाहती साधुसज्जना। पाळितां अवसाना। साहती कैसे |
| २१०७ | ।।ज्ञा.गा.०४४२.०३।। | पुसावया मार्गामार्गाच्या वाटा। तुम्ही म्हणाल करितो चेष्टा। नेणुं म्हणाल आला ताठा। अभिमानाचा |
| २१०८ | ।।ज्ञा.गा.०४४२.०४।। | या आस्थेसि काय काम। आपण विश्व ब्रह्म। तुम्ही सर्वांसी पावन। गुरुमूर्ति |
| २१०९ | ।।ज्ञा.गा.०४४२.०५।। | तुम्ही भवाच्या तारकसरिता। जैसें पतित गेलिया तीर्था। जड जीवाला जाली अवस्था। पावन होती |
| २११० | ।।ज्ञा.गा.०४४२.०६।। | मुक्त प्रवाहाची नाव। निवृत्ति अवल्या सद्‍गुरुराव। सोपान वरी ज्ञानदेव। पार जाले |
| २१११ | ।।ज्ञा.गा.०४४३.०१।। | अहो जी तुम्ही नेणतेपणें। मतिमंद ज्ञानहीनें। वेडीवांकुडी बोबडीं वचनें। वंदु असे |
| २११२ | ।।ज्ञा.गा.०४४३.०२।। | तुम्ही बहुतांपरी बोधिलें। तें हुं हुंकारें संपादिलें। कांहीं नाहीं ऐसे जालें। प्रेम मज |
| २११३ | ।।ज्ञा.गा.०४४३.०३।। | तुम्ही जेविला अमृत भोजनें। आम्हीही पंक्तीचे पाहुणे। गुह्य गूढ बोलणें। मौन्य जालें |
| २११४ | ।।ज्ञा.गा.०४४३.०४।। | करुनी उद्धटपणाचा बोभाट। तुमचीं बोलणीं आम्हां अचाट। मी त्यांचा आदिअंत। कळूं पाहे। आज तुमचे आभासपट। रिघावे कैसे |
| २११५ | ।।ज्ञा.गा.०४४३.०५।। | अहो जी सद्‍गुरु शिकविलें। निवृत्तीसी फळ आलें। ज्ञानेश्वरा भूषण फुले। उपकार तुझा |
| २११६ | ।।ज्ञा.गा.०४४४.०१।। | दुमदुमलें पाताळ स्वर्ग मेघडंबर। चालिले प्रेमभार वैराग्याचे। मथुरेचा टाहो। विठ्ठलनामाचा लाहो। फिटला संदेहो हृदयींचा |
| २११७ | ।।ज्ञा.गा.०४४४.०२।। | जयजय आरति निवृत्ति उदारा। संसार एकसरा निरसुनी गेला |
| २११८ | ।।ज्ञा.गा.०४४४.०३।। | निवृतिची उपमा कवण द्यावी उपमा। स्वयें निजधामा क्षेम देतो। तेथे आदरसुख आप आपणीं देख जाले। ते निशेख निवृत्ति भावें |
| २११९ | ।।ज्ञा.गा.०४४४.०४।। | पूर्वेचा भास्कर उगवला पश्चिमे। रवि सोम दोन्ही एकचि जालें। तेथींचे ही आरती पंचभाग केले। बाप निवृत्तिराजें प्रभा प्रभेसी नेलें |
| २१२० | ।।ज्ञा.गा.०४४४.०५।। | साधुसंता आरति हा न कळे कृपासिंधू। हा अंतरीं खेळ उफराटी बाहुली। स्वयंसुखासि मेळे निरंतर सोहळे राउताचा |

| | | |
|---|---|---|
| २१२१ | ।।ज्ञा.गा.०४४४.०६।। | तुझ्या चरणारविंदीं चुंबन देते। आकार निराकार मुळीं सहितु। दोन्ही पक्ष स्मरता ज्ञानदेवासि व्रत। बाप रखुमादेविवर विरहली आतां |
| २१२२ | ।।ज्ञा.गा.०४४५.०१।। | संसारसातें आलों मी पाहुणा। दिस दोन्ही आनंदा पाहावयासी |
| २१२३ | ।।ज्ञा.गा.०४४५.०२।। | तंव त्याचेनि तेजें झडपिले मज। मजमाजीं काज होऊनि ठेलें |
| २१२४ | ।।ज्ञा.गा.०४४५.०३।। | चित्त जंव निवडी तंव आपणहि पळे। अवचिता जवळी येतु असे |
| २१२५ | ।।ज्ञा.गा.०४४५.०४।। | जाऊं पाहे परता तंव नेतु असे पंथा। वैकुंठींच्या कथा आपण सांगे |
| २१२६ | ।।ज्ञा.गा.०४४५.०५।। | एकरूप दिसे तंव सभोंवता आपण। अवघा नारायण ज्ञानदेवा |
| २१२७ | ।।ज्ञा.गा.०४४६.०१।। | विश्वरूप पाहे तंव सभोंवतें रूपडें। पाहे चहूंकडे तोचि दिसे |
| २१२८ | ।।ज्ञा.गा.०४४६.०२।। | काय करूं सये कैसा हा देव। माझा मज भाव एकतत्त्वीं |
| २१२९ | ।।ज्ञा.गा.०४४६.०३।। | सम तेज पाहे तंव एकचि वो तेज। ॐकार सहज निमाला तेथें |
| २१३० | ।।ज्ञा.गा.०४४६.०४।। | मुळींची मूळ खूण न संपडे सर्वथा। व्यापियलें चित्ता तेजें येणें |
| २१३१ | ।।ज्ञा.गा.०४४६.०५।। | स्वानुभव दिवटी उजळूनि जंव पाही। तंव एक बिंब दाही दिशा दिसे |
| २१३२ | ।।ज्ञा.गा.०४४६.०६।। | ज्ञानदेव निवृत्ति हे खुण पुसत। सांगावें त्वरित गुरुराजें |
| २१३३ | ।।ज्ञा.गा.०४४७.०१।। | अरे स्वरूपाकारणें विश्वरूप घेतलें। सगुणें झांकिलें निर्गुण रया |
| २१३४ | ।।ज्ञा.गा.०४४७.०२।। | तत्त्वीं तत्त्व कवळी उगवे रविमंडळीं। अवघीच झांकोळी आपुल्या तेजें |
| २१३५ | ।।ज्ञा.गा.०४४७.०३।। | द्रष्ट्याचिये दीप्तीं दृश्यचि न दिसे। समरसीं भासे तेज त्याचें |
| २१३६ | ।।ज्ञा.गा.०४४७.०४।। | चित्स्वरूपीं नांदे चित्स्वरूपीं भासे। ॐकारासरिसें तदाकार |
| २१३७ | ।।ज्ञा.गा.०४४७.०५।। | प्रेमकळीं ओतलें सोज्वळींत तेज। तेथें तूं विराज ज्ञानदेवा |
| २१३८ | ।।ज्ञा.गा.०४४८.०१।। | स्वामीचे कृपेनें चिद्घन ओळलें। रसातळ पाल्हेळें ब्रह्मतेजें |
| २१३९ | ।।ज्ञा.गा.०४४८.०२।। | कृपाळु श्रीगुरु ओळला सर्वत्र। आपेआप चरित्र दृष्टि दावी |
| २१४० | ।।ज्ञा.गा.०४४८.०३।। | ॐकाराचें बीज समूळ मातृकीं। दिसे लोकां लोकीं एकतत्त्वीं |
| २१४१ | ।।ज्ञा.गा.०४४८.०४।। | अविकारीं साकार अरूपीं रूपस। दावी आपला भास आपणांसहित |
| २१४२ | ।।ज्ञा.गा.०४४८.०५।। | सर्वांग समतेज ऐसा हा चोखडा। पाहतां चहूंकडा दिव्य तेज |
| २१४३ | ।।ज्ञा.गा.०४४८.०६।। | ज्ञानदेव म्हणे निवृत्तीशीं पुसिलें। सत्रावी दोहिलें पूर्ण अंशीं |
| २१४४ | ।।ज्ञा.गा.०४४९.०१।। | अरे अरे ज्ञाना उघडें बोलसी। तुझा तूंचि होशी हरि ऐसा |
| २१४५ | ।।ज्ञा.गा.०४४९.०२।। | आपुलें तें झांकी पर तें दावी। पश्यंतिये भावीं मध्यमे राहें |

| | | |
|---|---|---|
| २१४६ | ।।ज्ञा.गा.०४४९.०३।। | तत्त्व तेंचि धरी रजो गुण चारी। पंचमा आचारीं सांपडती |
| २१४७ | ।।ज्ञा.गा.०४४९.०४।। | षड्रसीं भोक्ता हरिरूप करी। सप्तमा जिव्हारीं कळा धरीं |
| २१४८ | ।।ज्ञा.गा.०४४९.०५।। | अष्टमा अष्ट सिद्धी अष्टांग नेमेशीं। तें जीवेंभावेंसी तूंचि होसी |
| २१४९ | ।।ज्ञा.गा.०४४९.०६।। | नवमा नवमी दशमावृत्ति। एकादशीं तृप्ती करी ज्ञाना |
| २१५० | ।।ज्ञा.गा.०४४९.०७।। | ऐसा तूं एकादश होई तूं रे ज्ञाना। द्वादशीच्या चिन्हां सांगों तुज |
| २१५१ | ।।ज्ञा.गा.०४४९.०८।। | निवृत्ति द्वादश गुरुसेवनीं भाष्य। एकविध कास घाली ज्ञाना |
| २१५२ | ।।ज्ञा.गा.०४५०.०१।। | अरे अरे ज्ञाना ज्ञान हें निवृत्ति। देहीं देहा उपरती तुज प्राप्त |
| २१५३ | ।।ज्ञा.गा.०४५०.०२।। | अर्थावबोध अर्थुनी दाविला। ज्ञानिया तूं भला ज्ञानदेवा |
| २१५४ | ।।ज्ञा.गा.०४५०.०३।। | सोहं तत्त्व साधलें प्रमाण सर्वत्रीं। उभयतां गात्रीं प्रेमतनू |
| २१५५ | ।।ज्ञा.गा.०४५०.०४।। | बिंबीं बिंब रसीं उपरम देखिला। प्रपंच शोखिला तुवां एकें |
| २१५६ | ।।ज्ञा.गा.०४५०.०५।। | विष्णुनाम मंत्र सोहं तेज दिवटा। उजळून चोहटा शुद्ध केला |
| २१५७ | ।।ज्ञा.गा.०४५०.०६।। | निवृत्तीचा शिष्य ज्ञानदेवीं भाष्य। शांति समरस बोध उतरे |
| २१५८ | ।।ज्ञा.गा.०४५१.०१।। | ऐसें हें अंडज सांगितलें देवें। सांगोनियां भावें गिळीयेलें |
| २१५९ | ।।ज्ञा.गा.०४५१.०२।। | गिळिला प्रपंच समाप्ति इंद्रियां। वैष्णवीं हे माया बिंबाकार |
| २१६० | ।।ज्ञा.गा.०४५१.०३।। | निरशून्य शून्य साधूनि उपरम। वैकुंठीचें धाम हृदय केलें |
| २१६१ | ।।ज्ञा.गा.०४५१.०४।। | जीव शीव शेजे पंक्तिस बैसली। पंचतत्त्वांची बोली नाहीं तेथें |
| २१६२ | ।।ज्ञा.गा.०४५१.०५।। | तत्त्वीं तत्त्व गेलें बोलणें वैखरी। वेदवक्ते चारी मान्य झाले |
| २१६३ | ।।ज्ञा.गा.०४५१.०६।। | ज्ञानदेव म्हणे निवृत्ति तुष्टला। सर्वांगें दिधला समबोध |
| २१६४ | ।।ज्ञा.गा.०४५२.०१।। | परेसी जंव पाहें तंव दिसे हें अरुतें। तळीं तळाखालतें विश्वरूप |
| २१६५ | ।।ज्ञा.गा.०४५२.०२।। | दिव्य चक्षुदृष्टि निवृत्तीनें दिधली। अवघीच बुझाली विष्णुमाया |
| २१६६ | ।।ज्ञा.गा.०४५२.०३।। | शम दम कळा दांत उदांत। शांतितत्त्व मावळत उपरमेसी |
| २१६७ | ।।ज्ञा.गा.०४५२.०४।। | गगनीं दिनमणी गगनासगट। अवघेची वैकुंठ तया घरीं |
| २१६८ | ।।ज्ञा.गा.०४५२.०५।। | उद्भट कारण केलें हो ऐसें। तुष्टोनी सौरसें केलें तुम्हीं |
| २१६९ | ।।ज्ञा.गा.०४५२.०६।। | ज्ञानदेव शरण निवृत्तीच्या चरणां। कांसवीचा पान्हा पाजियेला |
| २१७० | ।।ज्ञा.गा.०४५३.०१।। | सार सप्तमीसी हारपली निशी। दशवे द्वारेसी उभा राहे |
| २१७१ | ।।ज्ञा.गा.०४५३.०२।। | तेथे तूं सावध अवघाचि गोविंद। देहीं देहाभेद करूं नको |

| | | |
|---|---|---|
| २१७२ | ।।ज्ञा.गा.०४५३.०३।। | इंद्रियांच्या वृत्ति दशवे द्वारीं गति। देहगेहउपरती होईल तुज |
| २१७३ | ।।ज्ञा.गा.०४५३.०४।। | विस्तारीं विस्तार गुण गुह्य सार। एकाएकीं पार सार धरीं |
| २१७४ | ।।ज्ञा.गा.०४५३.०५।। | विकृति विवर प्रकृति साचार। तत्त्वाचा निर्धार समरसीं |
| २१७५ | ।।ज्ञा.गा.०४५३.०६।। | निवृत्ति सांगे ज्ञाना एक तूं करी। तरी तूंतें कामारी होईल चित्तें |
| २१७६ | ।।ज्ञा.गा.०४५४.०१।। | सूक्ष्म साध्य काज सांगितलें स्वामी । धृति धारणा क्षमीं हरपल्या |
| २१७७ | ।।ज्ञा.गा.०४५४.०२।। | सूक्ष्म सख्य नेलें विश्वरूप देहीं आलें। प्रपंचेसी मावळलें तिमिर रया |
| २१७८ | ।।ज्ञा.गा.०४५४.०३।। | विशेषेंसी मिठी दिधली शरीरें। इंद्रियें बाहिरें नाईकती |
| २१७९ | ।।ज्ञा.गा.०४५४.०४।। | ऐसें हें साधन साधकां कळलें। चेतवितां बुझविलें मन माझें |
| २१८० | ।।ज्ञा.गा.०४५४.०५।। | उतावेळ पिंड ब्रह्मांडासहित। नेत्रीं विकासत ब्रह्मतेज |
| २१८१ | ।।ज्ञा.गा.०४५४.०६।। | ज्ञानदेव विनवी निवृत्तीस काज। हरपली लाज संदेहेंसी |
| २१८२ | ।।ज्ञा.गा.०४५५.०१।। | अरे अरे ज्ञाना झालासी पावन। तुझें तुज ध्यान कळों आलें |
| २१८३ | ।।ज्ञा.गा.०४५५.०२।। | तुझा तूंचि देव तुझा तूंचि भाव। फिटला संदेह अन्यतत्त्वीं |
| २१८४ | ।।ज्ञा.गा.०४५५.०३।। | मुरडूनियां मन उपजलासी चित्तें। कोठें तुज रितें न दिसे रया |
| २१८५ | ।।ज्ञा.गा.०४५५.०४।। | दीपकीं दीपक मावळल्या ज्योती। घरभरी वाती शून्य झाल्या |
| २१८६ | ।।ज्ञा.गा.०४५५.०५।। | वृत्तीची निवृत्ति आपणांसकट। अवघेंची वैकुंठ चतुर्भुज |
| २१८७ | ।।ज्ञा.गा.०४५५.०६।। | निवृत्ति परमानुभव नेमा। शांतिपूर्ण क्षमा ज्ञानदेवो |
| २१८८ | ।।ज्ञा.गा.०४५६.०१।। | अवेवी सावेव सम साम्य बुद्धि। शांती दया सिद्धी प्रगटल्या |
| २१८९ | ।।ज्ञा.गा.०४५६.०२।। | वोळली हे कृपा निवृत्ति दयाळा। सर्व रोम पाल्हाळा प्रेमांकुर |
| २१९० | ।।ज्ञा.गा.०४५६.०३।। | दिवसाचें चांदिणें रात्रीचें उष्ण। सांगितला प्रश्न निवृत्तिराजें |
| २१९१ | ।।ज्ञा.गा.०४५६.०४।। | सोहंसिद्धमंत्रें प्रोक्षिला संसार। मरणाची येरझार खुंटियेली |
| २१९२ | ।।ज्ञा.गा.०४५६.०५।। | चित्तवित्तगोत आपण पैं जाला। देहीं देह गेला भाव माझा |
| २१९३ | ।।ज्ञा.गा.०४५६.०६।। | ज्ञानदेवा रसीं स्नान दान गंगे। प्रपंचेसी भंगे विषयजात |
| २१९४ | ।।ज्ञा.गा.०४५७.०१।। | आदिमध्यअंत तुजमाजीं बिंबे। ब्रह्मीं ब्रह्म थांबे लवण जळीं |
| २१९५ | ।।ज्ञा.गा.०४५७.०२।। | तैसें झालें ज्ञाना उन्मनीं उलथा। प्रपंच चळथा उडालिया |
| २१९६ | ।।ज्ञा.गा.०४५७.०३।। | रिगु निगु काज जालें तुझें घर। अवघाचि संसार कळला आम्हां |
| २१९७ | ।।ज्ञा.गा.०४५७.०४।। | गोप्य गुजराज उमजलासे हरि। दिसे अभ्यंतरीं आत्माराम |

| | | |
|---|---|---|
| २१९८ | ।।ज्ञा.गा.०४५७.०५।। | न दिससी ज्ञाना देहीं तुझ्या राम। घेतला विश्राम ऐसें दिसे |
| २१९९ | ।।ज्ञा.गा.०४५७.०६।। | निवृत्ति निवांत समरसें पाहात। अवघाचि दिसत देहीं विदेह |
| २२०० | ।।ज्ञा.गा.०४५८.०१।। | निज तेज बीज नाठवे हे देहो। हरपला मोहो संदेहेसीं |
| २२०१ | ।।ज्ञा.गा.०४५८.०२।। | काय करूं सये कोठें गेला हरि। देहीं देह मापारी हरि जाला |
| २२०२ | ।।ज्ञा.गा.०४५८.०३।। | विदेह पैं गंगा पारुषली चित्तीं। चिद्रूपीं हे वृत्ति बुडीयेली |
| २२०३ | ।।ज्ञा.गा.०४५८.०४।। | गुरुलिंगीं भेटी निवृत्ति तटाक। देखिलें सम्यक् समरसें |
| २२०४ | ।।ज्ञा.गा.०४५८.०५।। | दत्तचित्तवृत्ति ज्ञेयज्ञानकळा। समाधि सोहळा विष्णुरूपीं |
| २२०५ | ।।ज्ञा.गा.०४५८.०६।। | ज्ञानदेव गाय हरिनामामृत। निवृत्ति त्वरित घरभरी |
| २२०६ | ।।ज्ञा.गा.०४५९.०१।। | सुखीं सुख मुरे तेथें कोण झुरे। जळीं लवण विरे तैसें जालें |
| २२०७ | ।।ज्ञा.गा.०४५९.०२।। | ज्ञान तें विज्ञान प्रपंचेंसि भान। तेजोरूप गगन बिंबलें दिसे |
| २२०८ | ।।ज्ञा.गा.०४५९.०३।। | आत्मा आत्मरूप परमात्मा समीप। कोटि कोटिरूप एकलेंचि दिसे |
| २२०९ | ।।ज्ञा.गा.०४५९.०४।। | नानातेजीं भासे प्रपंचीं प्रकाशे। विरुळा समरसें ध्याये त्यासी |
| २२१० | ।।ज्ञा.गा.०४५९.०५।। | ऐसें जालें तुज प्रगटलें निज। कांसवीचें बीज अंकुरलें |
| २२११ | ।।ज्ञा.गा.०४५९.०६।। | निवृत्ति निजबोध आनंदादि कंद। शाखाद्रूम भेद हरि जाला |
| २२१२ | ।।ज्ञा.गा.०४६०.०१।। | आत्मरूपीं रूप रंगलें सहज। रिगोनी निजगुज सतेजिलें |
| २२१३ | ।।ज्ञा.गा.०४६०.०२।। | तेज बीज बिवडे पेरिलें निवाडे। उगवलें चोखडें ब्रह्मरूप |
| २२१४ | ।।ज्ञा.गा.०४६०.०३।। | शांतीची गोफण उडविला प्रपंच। धारणा आहाच स्थिर केली |
| २२१५ | ।।ज्ञा.गा.०४६०.०४।। | वेटाळिलें धान्य खळेदान दिठी। दिधलें शेवटीं भोक्तियासी |
| २२१६ | ।।ज्ञा.गा.०४६०.०५।। | देते घेते जीवें नुरेचि शेखीं। शिवमय खोपी समरसीं |
| २२१७ | ।।ज्ञा.गा.०४६०.०६।। | ज्ञानदेव म्हणे निवृत्ति उदारा। ऐसा एकसरा तुष्टलासी |
| २२१८ | ।।ज्ञा.गा.०४६१.०१।। | खळेंदान देसी भोक्तया सांपडे। ऐसें तुवां चोखडें रूप केलें |
| २२१९ | ।।ज्ञा.गा.०४६१.०२।। | ज्ञान तेंचि धन ज्ञान तेंचि धान्य। जालें रे कारण ज्ञानदेवा |
| २२२० | ।।ज्ञा.गा.०४६१.०३।। | तळवटीं पाहे तंव रचिलें दान अपार। वेदवक्ते साचार बुझावले |
| २२२१ | ।।ज्ञा.गा.०४६१.०४।। | सा चार आठरा भासासी। उपरती भूसि निवडली |
| २२२२ | ।।ज्ञा.गा.०४६१.०५।। | मोक्ष मुक्ति फुका लाविली तुवां दिठी। तुझा तूं शेवटीं निवडलासी |
| २२२३ | ।।ज्ञा.गा.०४६१.०६।। | निवृत्ति प्रमाण केलें तुवां ज्ञाना। ब्रह्मींब्रह्म अगम्या रातलासी |

| | | |
|---|---|---|
| २२२४ | ।।ज्ञा.गा.०४६२.०१।। | रवितेजकिरण फांकलीया तेज। उरे रे सहज तिमिर रया |
| २२२५ | ।।ज्ञा.गा.०४६२.०२।। | तैसा तूं गभस्ति निवृत्ति उदारा। उगवोनी चराचरां तेज केलें |
| २२२६ | ।।ज्ञा.गा.०४६२.०३।। | तेजीं तेज दिसे अव्यक्ताचा ठसा। उमजोनी प्रकाशा न मोडे तुझा |
| २२२७ | ।।ज्ञा.गा.०४६२.०४।। | चंद्रोदयीं कमळें प्रकाशिलीं सितें। तैसें तुझें भरितें करीं आम्हां |
| २२२८ | ।।ज्ञा.गा.०४६२.०५।। | वृत्तीची निवृत्ति देखिली म्यां तुझी। हरपली माझी चित्तवृत्ति |
| २२२९ | ।।ज्ञा.गा.०४६२.०६।। | ज्ञान ऐसें नांव ज्ञानदेवा देसी। शेखीं तुवां रूपासी मेळविलें |
| २२३० | ।।ज्ञा.गा.०४६३.०१।। | आत्मतेजें तेज रवितेज बिंबे। जीव शीवीं बिंबे ज्ञानतेजें |
| २२३१ | ।।ज्ञा.गा.०४६३.०२।। | तैसें तुज ज्ञान जालें रे हें काज। केशवीं विराज चित्त जोडे |
| २२३२ | ।।ज्ञा.गा.०४६३.०३।। | समाधीचें रूप रूपासी आलें काह्या। पसरुनी बाह्या देती क्षेम |
| २२३३ | ।।ज्ञा.गा.०४६३.०४।। | प्रवृत्ति निवृत्ति दोहींची तटाक। उतरलासी एक सिंधोदकें |
| २२३४ | ।।ज्ञा.गा.०४६३.०५।। | क्षीर नीर हरि जाला असे स्वादु। अवघाची गोविंदु नानादेहीं |
| २२३५ | ।।ज्ञा.गा.०४६३.०६।। | निवृत्तिसंपत्ति आलिया पैं हातां। तत्त्वीं तत्त्व निमथा उलथा तूं |
| २२३६ | ।।ज्ञा.गा.०४६४.०१।। | देहधर्मीं काज गुरुराज चित्तीं। तरीच या संपत्ती फळद होती |
| २२३७ | ।।ज्ञा.गा.०४६४.०२।। | तैसें तुझें ध्यान करितां उद्भट। सांपडली वाट वैकुंठीची |
| २२३८ | ।।ज्ञा.गा.०४६४.०३।। | ज्ञेय ज्ञाता ज्ञान ध्येय ध्याता हरि। समरसें श्रीहरि तत्त्व जालें |
| २२३९ | ।।ज्ञा.गा.०४६४.०४।। | पृथ्वी आप तेज गगनाकृति वायो। फिटला संदेहो ये जन्मींचा |
| २२४० | ।।ज्ञा.गा.०४६४.०५।। | उपदेश द्रष्टा जरी असे श्रेष्ठ। तरीच भाग्य विनट विष्णुरूपीं |
| २२४१ | ।।ज्ञा.गा.०४६४.०६।। | ज्ञानदेवीं सिद्धी साउली श्रीहरि। गुरुकृपा करीं कुरवाळिलें |
| २२४२ | ।।ज्ञा.गा.०४६५.०१।। | अनुपम्य तेजें धवळलें ब्रह्मांड। विश्वरूपीं अखंड तदाकार |
| २२४३ | ।।ज्ञा.गा.०४६५.०२।। | रसीं रस मुरे प्रेमाचें स्फुंदन। एकरूपीं धन हरि माझा |
| २२४४ | ।।ज्ञा.गा.०४६५.०३।। | नाद आणि ज्योति परिपूर्ण आम्हां। परेसी महात्मा उजेडला |
| २२४५ | ।।ज्ञा.गा.०४६५.०४।। | जाला अरुणोदयो उजळलें सूर्यतेज। त्याहूनी सतेज तेज आलें |
| २२४६ | ।।ज्ञा.गा.०४६५.०५।। | हरपल्या रश्मी देहभाव हरि। ऋद्धि सिद्धि कामारी जाल्या कैशा |
| २२४७ | ।।ज्ञा.गा.०४६५.०६।। | निवृत्ति उपदेश ज्ञानिया लाधला। तत्त्वीं तत्त्व बोधला ज्ञानदेव |
| २२४८ | ।।ज्ञा.गा.०४६६.०१।। | त्रिपदा चतुष्पदा गायत्रीस्मरण। त्याचें विस्मरण हरिप्रेमें |
| २२४९ | ।।ज्ञा.गा.०४६६.०२।। | निवृत्ति सांगे हरिनामगंगे। जलासी सर्वांगें गंगोदक |

| | | |
|---|---|---|
| २२५० | ।।ज्ञा.गा.०४६६.०३।। | पाणिपद चित्तवृत्ति हे बुडाली। देहीं देहा गेली प्रीति सदा |
| २२५१ | ।।ज्ञा.गा.०४६६.०४।। | चक्षुद्वय तेज हरिरूपीं बिंब। पृथ्वीतळ अंभ हरि दिसे |
| २२५२ | ।।ज्ञा.गा.०४६६.०५।। | सुलज्ज निर्लज्ज मेघवर्ण शाम। सांवळा सप्रेम गुणग्राह्य |
| २२५३ | ।।ज्ञा.गा.०४६६.०६।। | थोडेनी आतुडे सडेनी पदार्थे। येतु असे अर्थे ह्रदयामाजीं |
| २२५४ | ।।ज्ञा.गा.०४६६.०७।। | नाममंत्र रूप इतुकेन संकेत। देतुसे अर्थ दीनाचा दाता |
| २२५५ | ।।ज्ञा.गा.०४६६.०८।। | बाप रखुमादेविवरु विनत सोपारा। मरणाच्या येरझारा दूर केल्या |
| २२५६ | ।।ज्ञा.गा.०४६७.०१।। | आधींच तूं ज्ञान वरी जालें उन्मन। हरि हें जीवन ह्रदयीं आलें |
| २२५७ | ।।ज्ञा.गा.०४६७.०२।। | स्थिरावलें ध्यान ज्ञानाचिये वृत्ति। विज्ञानसंपत्ति साधलिया |
| २२५८ | ।।ज्ञा.गा.०४६७.०३।। | अंधकारपट नासला समतेज। रामरूपीं पैज दीपज्ञान |
| २२५९ | ।।ज्ञा.गा.०४६७.०४।। | संतशांत शांति उलथीचा ठसा। कृष्णरूपीं दिशा तेजो तेज |
| २२६० | ।।ज्ञा.गा.०४६७.०५।। | अलक्ष लक्षिते अगोचर पर। तेथेंही गव्हर संचलें असे |
| २२६१ | ।।ज्ञा.गा.०४६७.०६।। | ज्ञानदेव सुखी जालीसे विश्रांति। परमानंद चित्तीं निरंतर |
| २२६२ | ।।ज्ञा.गा.०४६८.०१।। | भ्रमर रस द्वंद्व विसरला भूक। त्याहुनी एथें सुख अधिक दिसे |
| २२६३ | ।।ज्ञा.गा.०४६८.०२।। | जंववरी भुली तंववरी बोली। समुद्रींची खोली विरळा जाणे |
| २२६४ | ।।ज्ञा.गा.०४६८.०३।। | आशापाश परी निवृत्ति तटाक। पडियेले ठक चिद्रुपरूपीं |
| २२६५ | ।।ज्ञा.गा.०४६८.०४।। | प्रकाश हरीचा प्रकाशला देहीं। नेणतीच कांहीं मूढजन |
| २२६६ | ।।ज्ञा.गा.०४६८.०५।। | ऐलतीरीं ठाके पैलतीरीं ठाके। तेथें कैसेनी सामर्थ्यें पाहों आतां |
| २२६७ | ।।ज्ञा.गा.०४६८.०६।। | जाणीव शहाणीव तूंचि निवृत्ति देवा। हरि उभय भावा ज्ञान देशी |
| २२६८ | ।।ज्ञा.गा.०४६८.०७।। | ज्ञानदेवा शांति उन्मनी रहस्य। हरिरूप भाष्य करविलें |
| २२६९ | ।।ज्ञा.गा.०४६८.०८।। | बाप रखुमादेविवर विठ्ठल ह्रदयीं। आलिंगितां बाही भ्रमर जाला |
| २२७० | ।।ज्ञा.गा.०४६९.०१।। | ऐकें तूं ज्ञाना सुख आणि विश्रांति रूपा। हरिरूप दीप पाहे ऐसा |
| २२७१ | ।।ज्ञा.गा.०४६९.०२।। | चित्तवृत्तिचिया आदिमध्य अंतीं। रूपींरूप आनंदी समरसें |
| २२७२ | ।।ज्ञा.गा.०४६९.०३।। | निवृत्ति सांगे ज्ञाना योगाची धारणा। जीवशीव करूणा चक्षु दृढ करी |
| २२७३ | ।।ज्ञा.गा.०४७०.०१।। | साध्यसाधनकाज निवृत्तीचें गुज। केशव सहज सर्वभूतीं |
| २२७४ | ।।ज्ञा.गा.०४७०.०२।। | रामकृष्ण मंत्रें प्रोक्षियेलीं गात्रें। हरिरूप सर्वत्र भरला दिसे |
| २२७५ | ।।ज्ञा.गा.०४७०.०३।। | गुरुगम्य चित्त जालें माझें हित। दिनदिशीं प्राप्त हरि आम्हां |

| | | |
|---|---|---|
| २२७६ | ।।ज्ञा.गा.०४७०.०४।। | पूर्णिमाप्रकाशचंद्र निराभास। हरि हा दिवस उगवला |
| २२७७ | ।।ज्ञा.गा.०४७०.०५।। | चकोरें सेविती आळीउळें पहाती। घटघटा घेती अमृतपान |
| २२७८ | ।।ज्ञा.गा.०४७०.०६।। | ऐसें हें पठण ज्ञानदेवा जालें। निवृत्तीनें केलें आपणा ऐसें |
| २२७९ | ।।ज्ञा.गा.०४७१.०१।। | पहाते पहाणें पहातां निरुतें। पाहिलिया तेथें तेंचि होय |
| २२८० | ।।ज्ञा.गा.०४७१.०२।। | तोचि तो आपण श्रीमुखें जाण। आणिक साधन नलगे कांहीं |
| २२८१ | ।।ज्ञा.गा.०४७१.०३।। | भानुबिंबेवीण निरसलें तम। ज्ञानदेवीं वर्म सांगितलें |
| २२८२ | ।।ज्ञा.गा.०४७२.०१।। | सकळ तीर्थें निवृत्तीच्या पायीं। तेथें बुडी देई माझ्या मना |
| २२८३ | ।।ज्ञा.गा.०४७२.०२।। | आतां मी न करी भ्रांतीचें भ्रमण। वृत्तीसीं मार्जन केलें असे |
| २२८४ | ।।ज्ञा.गा.०४७२.०३।। | एकार्णव जाला तरंगु बुडाला। तैसा देह जाला एकरूप |
| २२८५ | ।।ज्ञा.गा.०४७२.०४।। | बाप रखुमादेविवरें विठ्ठलें नवल पैं केलें। तारूं हारपलें मृगजळीं |
| २२८६ | ।।ज्ञा.गा.०४७३.०१।। | देहभाव ठेवावे योगभाव सेवावे। हें बोलणें जाणणें सोय नव्हे गे माये |
| २२८७ | ।।ज्ञा.गा.०४७३.०२।। | जिचे मरिजे ऐसें नाहीं आमुतें। सांगों कोणातें तुजवांचुनी |
| २२८८ | ।।ज्ञा.गा.०४७३.०३।। | देंठीहूनी सुटलें जीवनासी आलें। बाप रखुमादेविवरें ऐसें केलें गे माये |
| २२८९ | ।।ज्ञा.गा.०४७४.०१।। | विश्रांतीचें स्थान कोण रूप आम्हां। ऐसा हा महिमा सांगा स्वामी |
| २२९० | ।।ज्ञा.गा.०४७४.०२।। | चित्त नेई चित्ता चेत नेई तत्त्वा। कर्म परतत्त्वा हरवी रया |
| २२९१ | ।।ज्ञा.गा.०४७४.०३।। | हें तत्त्व सांगे ज्ञानदेवा निवृत्ति। संसार पुढती नाहीं बापा |
| २२९२ | ।।ज्ञा.गा.०४७५.०१।। | निजाचें तेज कीं तेजाचें निज। तेथील तें गुज सांग मज |
| २२९३ | ।।ज्ञा.गा.०४७५.०२।। | ब्रह्म तें कायी ब्रह्म तें कायी। ब्रह्म तें कायी सांगा गोसावी |
| २२९४ | ।।ज्ञा.गा.०४७५.०३।। | ब्रह्म सदोदित असे सर्वभूतीं। म्हणउनी सांगे जनांप्रती |
| २२९५ | ।।ज्ञा.गा.०४७५.०४।। | ब्रह्म ऐसें नामयाने जाणिलें। हृदयीं धरिलें प्राणलिंग |
| २२९६ | ।।ज्ञा.गा.०४७५.०५।। | बाप रखुमादेविवरु हृदयीं प्रगटला। निवांत राहिला ज्ञानदेवो |
| २२९७ | ।।ज्ञा.गा.०४७६.०१।। | सोंग संपादणी एका रूपें करी। आत्मा घरोघरीं वर्ततुसे |
| २२९८ | ।।ज्ञा.गा.०४७६.०२।। | माय सांग आम्हां कोण सुख ब्रह्मा। तुम्हां आम्हां समा कोण्या रूपें |
| २२९९ | ।।ज्ञा.गा.०४७६.०३।। | चेतनें चेतवी बुद्धीतें पाचारी। कल्पना मापारी निवृत्ति ठायीं |
| २३०० | ।।ज्ञा.गा.०४७६.०४।। | ज्ञानदेव दिवटा विठ्ठलीं रमला। संसार अबोला एकातत्त्वें |
| २३०१ | ।।ज्ञा.गा.०४७७.०१।। | परब्रह्मीं वस्ती कोण्या रूपें करूं। सकळ हें भरूं आत्मतत्त्वें |

| | | |
|---|---|---|
| २३०२ | ।।ज्ञा.गा.०४७७.०२।। | देहाचा दीप कीं समत्व पैं ज्योती। एकरूपें वाती सर्वांरूपीं |
| २३०३ | ।।ज्ञा.गा.०४७७.०३।। | तें रूप सांगा निवृत्ति उदारा। संसार एकसरा तयामाजीं |
| २३०४ | ।।ज्ञा.गा.०४७७.०४।। | समान निघोट क्षेमत्वें अवीट। श्रीगुरुने वाट सांगितली |
| २३०५ | ।।ज्ञा.गा.०४७७.०५।। | ज्ञानदेवीं घर वस्तीसी बिढार। तळींवरी साचार एक तत्त्व |
| २३०६ | ।।ज्ञा.गा.०४७८.०१।। | आकारीं नाहीं तें निराकारीं पाहीं। निराकारीं राहीं शून्याशून्य |
| २३०७ | ।।ज्ञा.गा.०४७८.०२।। | जेथें शून्यचि मावळलें तेथें काय उरलें। हेंचि सांगे एके बोले मजपाशीं |
| २३०८ | ।।ज्ञा.गा.०४७८.०३।। | शून्य कासया पासाव जालें शून्य तें कवणें केलें। हें सांगिजो जी एक्या बोलें गुरुराया |
| २३०९ | ।।ज्ञा.गा.०४७८.०४।। | आपण शून्याकार कीं आपण निराकार। आकार निराकार मूर्तिमंत दाऊं। आकार निराकार ये दोन्ही नाहीं। तेंचि तूं पाहीं आपणपें |
| २३१० | ।।ज्ञा.गा.०४७८.०५।। | जेथें अनुभवचि नाहीं तेंचि तूं पाहीं। स्वानुभवीं राहीं तुझा तूंचि |
| २३११ | ।।ज्ञा.गा.०४७८.०६।। | जेथें चंद्र सूर्य एक होती तेथें कैचि दिनराती। ऐसें जे जाणती ते योगेश्वर |
| २३१२ | ।।ज्ञा.गा.०४७८.०७।। | कर्माकर्म पारुषलें देवधर्म लोपले। गुरुशिष्य निमाले जाले क्षीरसिंधु |
| २३१३ | ।।ज्ञा.गा.०४७८.०८।। | तेथें गोडीवीण चाखणें जिव्हेवीण बोलणें। नेत्रेंवीण पाहणें तेंचि ब्रह्म |
| २३१४ | ।।ज्ञा.गा.०४७८.०९।। | हातीं घेऊनियां दिवटी लागिजे अंधारापाठीं। अंधार न देखे दृष्टि उजियेडू तो |
| २३१५ | ।।ज्ञा.गा.०४७८.१०।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलु देखणा। दृष्यद्रष्टेपणा माल्हावले |
| २३१६ | ।।ज्ञा.गा.०४७९.०१।। | चौदा विद्या जरी पूर्ण अभ्यासिले। व्यर्थचि जाहले ज्ञानेवीण |
| २३१७ | ।।ज्ञा.गा.०४७९.०२।। | तीन वीस चारी कळा अनुभविले। व्यर्थचि जाहले ज्ञानेवीण |
| २३१८ | ।।ज्ञा.गा.०४७९.०३।। | अष्टांगादि योग प्रयासें जोडलें । व्यर्थचि जाहले ज्ञानेवीण |
| २३१९ | ।।ज्ञा.गा.०४७९.०४।। | कर्मधर्मक्रिया नाना आचरले। व्यर्थचि जाहले ज्ञानेवीण |
| २३२० | ।।ज्ञा.गा.०४७९.०५।। | ज्ञानेश्वर म्हणे ब्रह्म साधियेलें। कीर आथीयलें ज्ञानेवीण |
| २३२१ | ।।ज्ञा.गा.०४८०.०१।। | शत अश्वमेध घडलें जयाला। तरी ब्रह्म त्याला अगम्य हें |
| २३२२ | ।।ज्ञा.गा.०४८०.०२।। | सोमयागाची हे नाहीं ज्या गणना। तरी आत्मखुणा अलभ्य तें |
| २३२३ | ।।ज्ञा.गा.०४८०.०३।। | लक्ष अनुष्ठान त्रिभुवनीं अन्नदान। तरी ब्रह्मज्ञान अतर्क्य हें |
| २३२४ | ।।ज्ञा.गा.०४८०.०४।। | ज्ञानदेव म्हणे शुद्ध ब्रह्मज्ञान। पावले हे खूण संतसंगें |
| २३२५ | ।।ज्ञा.गा.०४८१.०१।। | त्रिवेणीचें स्नान अखंडित करा। काशीवासीं मरा ज्ञानेंवीण |
| २३२६ | ।।ज्ञा.गा.०४८१.०२।। | तया नाहीं गती वस्ती निरंजनीं। भोगी रुद्रयोनी कर्म वसे |
| २३२७ | ।।ज्ञा.गा.०४८१.०३।। | लिंगदेहभंग जंव झाला नाहीं। तोंवरी बा पाहीं मुक्ति कैची |

| | | |
|---|---|---|
| ४२५९ | ।।ज्ञा.गा.०९२४.०२।। | तपें अनेक विधी। करावीं हे मनाची आधीं। करितां करणें सिद्धि। नव्हे यासी म्हणोनि वाउगाचि वळसा। पडे या धिंवसा। तैसा कल्पनेचा फांसा। मायाबंधु |
| ४२६० | ।।ज्ञा.गा.०९२४.०३।। | ऐसीयाच्या पाठी। कां होसी हिंपुटी। नलगे तुज सुखाचा स्वादु या गोष्टी। येणें ऐसेंचि विचारी। एकुचि धीर धरी। नलगे या द्वैतासाठीं रया |
| ४२६१ | ।।ज्ञा.गा.०९२४.०४।। | म्हणोनि डोळियांचे देखणें। लाघव तो देखणा जाणे। तेथें आपपर पिसुणें। न देखे कांहीं। तें शब्देवीण बोलतां। निशब्दें ये हातां। ऐसा उपावो करीं कांहीं। जोडिलियां धना वाढी बहु असे। तेथें वेचलें न दिसे कांहीं । बाप रखुमादेविवरु विठ्ठलु चिंतितां। सुखाचेनि सुखें राही निवृत्तिरायें खुणा दाऊनियां। सकळ पुनरपि येणें नाहीं |
| ४२६२ | ।।ज्ञा.गा.०९२५.०१।। | ये सातें आलिया वोळंगा सारंगधरु। नाहीं तरी संसारु। वायां जाईल लया |
| ४२६३ | ।।ज्ञा.गा.०९२५.०२।। | कवणाचें मायबाप कवणाचें गणगोत। मृगजळवत् जाईल लया |
| ४२६४ | ।।ज्ञा.गा.०९२५.०३।। | विषयाचें समसुख बेगडाची बाहुली। अभ्राची साउली जाईल लया |
| ४२६५ | ।।ज्ञा.गा.०९२५.०४।। | ज्ञानदेव म्हणे पाहतां पाहिलें। स्वप्नीचें चेईलें जाईल लया |
| ४२६६ | ।।ज्ञा.गा.०९२६.०१।। | रुणुझुणु रुणुझुणु रे भ्रमरा। सांडी तूं अवगुणु रे भ्रमरा |
| ४२६७ | ।।ज्ञा.गा.०९२६.०२।। | चरणकमळदळु रे भ्रमरा। भोगी तूं निश्चळु रे भ्रमरा |
| ४२६८ | ।।ज्ञा.गा.०९२६.०३।। | सुमनसुगंधु रे भ्रमरा । परिमळ विद्गदु रे भ्रमरा |
| ४२६९ | ।।ज्ञा.गा.०९२६.०४।। | सौभाग्य सुंदरु रे भ्रमरा। बाप रखुमादेविवरु रे भ्रमरा |
| ४२७० | ।।ज्ञा.गा.०९२७.०१।। | आनंदु रे आजी आनंदु रे। सबाह्य अभ्यंतरीं अवघा परमानंदु रे |
| ४२७१ | ।।ज्ञा.गा.०९२७.०२।। | एक दोन तीन चारी पांच सहा। इतुकें विचारूनि मग परमानंदीं रहा |
| ४२७२ | ।।ज्ञा.गा.०९२७.०३।। | सातवा अवतार आठवा वेळोवेळां। बाप रखुमादेविवरु विठ्ठलु जवळा |
| ४२७३ | ।।ज्ञा.गा.०९२८.०१।। | सुखसोज्वळ मोतियाचें लेणें। दिधलें जाई जणें बाईये वो |
| ४२७४ | ।।ज्ञा.गा.०९२८.०२।। | देशीं नाहीं देशाउरी नाहीं। हाटणीं नाहीं तें पाटणीं नाहीं |
| ४२७५ | ।।ज्ञा.गा.०९२८.०३।। | लक्षाचेनि लाभें जोडलें निधान। बाप रखुमादेविवरा विठ्ठलु जाण |
| ४२७६ | ।।ज्ञा.गा.०९२९.०१।। | अनुभव रहणीवीण कायसें श्रवण। गर्भ अंधु नेणे रत्नकिरण |
| ४२७७ | ।।ज्ञा.गा.०९२९.०२।। | गेले मेले काय सांगाल गोष्टी। स्वयें आत्मज्ञानी घाला परमात्मीं मिठी |
| ४२७८ | ।।ज्ञा.गा.०९२९.०३।। | जीवा जीवन अंतरीं। बाहेजु निर्धारीं। सर्व निरंतरीं पूर्णभरित |
| ४२७९ | ।।ज्ञा.गा.०९२९.०४।। | बाहेजु प्रवृत्ति अंतरीं निवृत्ति। उभयतां गति एक आहे |
| ४२८० | ।।ज्ञा.गा.०९२९.०५।। | प्रसूतिकाळीं व्याली। वांझ अपत्यजवळी। वांझ क्रीडा विनोदें रळी। खेळतसे |

| | | |
|---|---|---|
| ४२८१ | ।।ज्ञा.गा.०९२९.०६।। | अनुभव रहणीविण जाला भगवा दिगांबरु। जैसा नग्नवरु हिंडे हाटाबिदीं |
| ४२८२ | ।।ज्ञा.गा.०९२९.०७।। | तीर्थक्षेत्र व्रत दान। यागादिक साधन। अनुभव रहाणीविण। शून्य धिक् गेलें |
| ४२८३ | ।।ज्ञा.गा.०९२९.०८।। | सगुण निर्गुण पाहीं। या दोहींमाजीं होऊनि राहीं। तरी निवसी ठाईंच ठायीं अरे जना |
| ४२८४ | ।।ज्ञा.गा.०९२९.०९।। | सगुण निर्गुण पाहीं जयापासुनीं। ते राहे अनुभउनी येर वाउगेचि रया |
| ४२८५ | ।।ज्ञा.गा.०९२९.१०।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलेंसि एकांतु। द्वैताद्वैताची मातु उरेचिना |
| ४२८६ | ।।ज्ञा.गा.०९३०.०१।। | स्वरूपावबोधु कां फावला। इंद्रियीं डवरिला प्रेमभावो |
| ४२८७ | ।।ज्ञा.गा.०९३०.०२।। | जाणते निवाले नेणते गुंतले। भजनेंचि गोंविले विसर जावो |
| ४२८८ | ।।ज्ञा.गा.०९३०.०३।। | शांतता समता निवृत्ति उदारु। वर्षोनी उद्गारु देतु असे |
| ४२८९ | ।।ज्ञा.गा.०९३०.०४।। | ज्ञानदेवा धीर घटमठीं सामा। अधऊर्ध्व व्योमा हरि दिसे |
| ४२९० | ।।ज्ञा.गा.०९३१.०१।। | सायुज्यसदनीं ज्ञानाचा उद्धार। विज्ञानें अमर पावता हे |
| ४२९१ | ।।ज्ञा.गा.०९३१.०२।। | साधनबाधन धन गोत वित्त। हरिवीण हित मनीं नाहीं |
| ४२९२ | ।।ज्ञा.गा.०९३१.०३।। | मार्गींचा कापडी धरुनियां वोढीं। ईश्वरीं उघडी उडी घाली |
| ४२९३ | ।।ज्ञा.गा.०९३१.०४।। | ज्ञानदेवा सिद्धी साधन सपूर। कलेवर कापूर मुरालेंसे |
| ४२९४ | ।।ज्ञा.गा.०९३२.०१।। | आवो कमळनयनीं चांदिणें भासिलें। तयामाजीं एक निराकार देखिलें |
| ४२९५ | ।।ज्ञा.गा.०९३२.०२।। | हेंही नव्हे तेंही नव्हे। कांहीं नव्हे तोचि पैं होय |
| ४२९६ | ।।ज्ञा.गा.०९३२.०३।। | बाप रखुमादेविवरु नव्हताचि पैं जाला। होऊनियां फावला फावो सरला गे माये |
| ४२९७ | ।।ज्ञा.गा.०९३३.०१।। | मेरुपरतें एक व्योम आहे। तेथें एकु पाहे तेज:पुंजू |
| ४२९८ | ।।ज्ञा.गा.०९३३.०२।। | तेज नव्हे तेज:पुंजू नव्हे |
| ४२९९ | ।।ज्ञा.गा.०९३३.०३।। | शितळ नव्हे शांतही नव्हे |
| ४३०० | ।।ज्ञा.गा.०९३३.०४।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलही नव्हे। नव्हे तो होये चतुर्देहेंवीण |
| ४३०१ | ।।ज्ञा.गा.०९३४.०१।। | पाहतां पाहणें दृश्याही वेगळें। तें कैसें आकळे ब्रह्मतेसी |
| ४३०२ | ।।ज्ञा.गा.०९३४.०२।। | पाहे तेंचि पाही नाहीं तें काई। गगनीच्या पायीं तूंचि होसी |
| ४३०३ | ।।ज्ञा.गा.०९३४.०३।। | स्वरूपीं रमतां हृदयस्थ आप। तयाचें स्वरूप आदि मध्यें |
| ४३०४ | ।।ज्ञा.गा.०९३४.०४।। | बाप रखुमादेविवरु सगुणीं न माये। निर्गुण दिसताहे जनीं वनीं |
| ४३०५ | ।।ज्ञा.गा.०९३५.०१।। | त्रिपुटी उलटु निर्गुणीं अरुता। पाहातां दृष्टांता भेदु नाहीं |
| ४३०६ | ।।ज्ञा.गा.०९३५.०२।। | भेदु अभेदु अवघाचि गोविंदु। बिंबे बिंब छंदु हरिलीला |

| | | |
|---|---|---|
| ४३०७ | ।।ज्ञा.गा.०९३५.०३।। | नाहीं आला गेला शब्द पैं दृष्टांतें। दृश्यादृश्य भूतें एकतत्त्वीं |
| ४३०८ | ।।ज्ञा.गा.०९३५.०४।। | बाप रखुमादेविवरु अधऊर्ध्व शेज। वेगीं तूं उमज अरे रया |
| ४३०९ | ।।ज्ञा.गा.०९३६.०१।। | व्यक्ताचें अव्यक्तीं पाहतां पैं न दिसे। आपींआप रसें व्यक्त हरि |
| ४३१० | ।।ज्ञा.गा.०९३६.०२।। | बाहेजु भीतरीं आदिमध्य ऊर्ध्व। हृदयीं सन्निध बिंबलासे |
| ४३११ | ।।ज्ञा.गा.०९३६.०३।। | ऐसीये दशे ते अव्यक्त भुंजसी। मी माझ्या मोहासी सांडी रया |
| ४३१२ | ।।ज्ञा.गा.०९३६.०४।। | बाप रखुमादेविवर व्यक्त व्यक्तीं अव्यक्त। अवघें संचित हरि आहे |
| ४३१३ | ।।ज्ञा.गा.०९३७.०१।। | नित्यता समाधी असोनि पैं साधी। मायेची शुद्धि पुसे रया |
| ४३१४ | ।।ज्ञा.गा.०९३७.०२।। | साधन विधान पूजा अनुष्ठान। नित्यता कीर्तन सोहंभावें |
| ४३१५ | ।।ज्ञा.गा.०९३७.०३।। | स्मरण विलास तत्त्वीं तत्त्व हाला। उपदेशु बोला बोलों नये |
| ४३१६ | ।।ज्ञा.गा.०९३७.०४।। | ज्ञानदेवा सिद्धि नित्यता समृद्धि। जीवशिवबुद्धि समाधी त्याची |
| ४३१७ | ।।ज्ञा.गा.०९३८.०१।। | पाहोनियां दिठीं नवजाय भुली। मायेची घरकुली खेळतुसे |
| ४३१८ | ।।ज्ञा.गा.०९३८.०२।। | माया मन पाही मायेसीही पर। परते सत्वर निमिष्य नाहीं |
| ४३१९ | ।।ज्ञा.गा.०९३८.०३।। | खेळतां बाहुली स्वप्नचि वर्तवी। रावोरंक दावी भेदबुद्धि |
| ४३२० | ।।ज्ञा.गा.०९३८.०४।। | बाप रखुमादेविवर अभेदु हे अभिन्न। हरिरूपीं लीन जीवशिवीं |
| ४३२१ | ।।ज्ञा.गा.०९३९.०१।। | अहंते न पाहे नाहीं तेंची पाहे। भुलिसवें जाय काय करूं |
| ४३२२ | ।।ज्ञा.गा.०९३९.०२।। | सोहंभावें सोकरी कोहंभावें हो करी। पाहे दुरीच्या दुरी एकतत्त्वीं |
| ४३२३ | ।।ज्ञा.गा.०९३९.०३।। | आदि हें माजिठें रूपीं रूप पैठें। असोनियां द्रष्टे न पाहे भुली |
| ४३२४ | ।।ज्ञा.गा.०९३९.०४।। | बाप रखुमादेविवर भुलिभूल रे हरि। माजिठा श्रीहरि आपरूपें |
| ४३२५ | ।।ज्ञा.गा.०९४०.०१।। | जनवन हरि न पाहतां भासे। घटमठीं दिसे तदाकारु |
| ४३२६ | ।।ज्ञा.गा.०९४०.०२।। | फिटती भुर रे धुम उठी तेज। अक्षरीं उमज गुरुकृपें |
| ४३२७ | ।।ज्ञा.गा.०९४०.०३।। | खुंटली मुक्ति राहिलें अव्यक्तीं । एकरूप ज्योती तदाकार |
| ४३२८ | ।।ज्ञा.गा.०९४०.०४।। | ज्ञानदेव क्षर अक्षर उमजे। बाप रखुमादेविवर हृदयीं विराजे |
| ४३२९ | ।।ज्ञा.गा.०९४१.०१।। | दिव्य औषधीची वार्ता ऐकोनियां कानीं व्याधी टाकी तनु। धालियाचें सुख भुकेला केवीं जाणें कैसें निवे त्याचें मनु रया |
| ४३३० | ।।ज्ञा.गा.०९४१.०२।। | सुखाचा अनुभव कैसेंनि जाणावा। भेटीचें आर्त सकळांसही सारिखें होईजे देखा |
| ४३३१ | ।।ज्ञा.गा.०९४१.०३।। | आपण जालिया जागा नलगे सांगावें। बाप रखुमादेविवर विठ्ठल भेटलिया। तरी तुझी तुटतील सकळिक विंदानें रया |
| ४३३२ | ।।ज्ञा.गा.०९४२.०१।। | सर्वांग देखणें हाचि भावो जाण। येर निकारणें वायां वोझें |

| | | |
|---|---|---|
| ४३३३ | ।।ज्ञा.गा.०९४२.०२।। | शक्तीचा पडिभरु वाहासील वायां। श्रीगुरुपाया शरण जाई |
| ४३३४ | ।।ज्ञा.गा.०९४२.०३।। | न संडी वेदसिंधु सांडी मांडी कर्म। उपाधीचा धर्म करूं नको |
| ४३३५ | ।।ज्ञा.गा.०९४२.०४।। | बाप रखुमादेविवर देखणा सर्व दृष्टी। तेथें प्रपंच गोष्टी मुरालिया |
| ४३३६ | ।।ज्ञा.गा.०९४३.०१।। | संसारकथा प्रपंच चळथा। मनाचा उलथा विरुळा जाणे |
| ४३३७ | ।।ज्ञा.गा.०९४३.०२।। | होतें तें पाहीं नव्हे तें घेई । द्वैतबुद्धि ठायीं गुंफों नको |
| ४३३८ | ।।ज्ञा.गा.०९४३.०३।। | चित्तवृत्ति ध्यानीं मनाची निशाणी। भ्रमभेद कानीं ऐकों नको |
| ४३३९ | ।।ज्ञा.गा.०९४३.०४।। | ज्ञानदेव गंगा नि:संगाच्या संगा। पावसी अभंगा भेदरहित |
| ४३४० | ।।ज्ञा.गा.०९४४.०१।। | येथें तेथें दुरी तो नांदे मंदिरीं। आत्मा चराचरीं एकपणें |
| ४३४१ | ।।ज्ञा.गा.०९४४.०२।। | ऐसा पाहें दृष्टि चैतन्याची सृष्टि। तरी सुदर्शन घरटीं आपेंआप |
| ४३४२ | ।।ज्ञा.गा.०९४४.०३।। | जात जात पणें प्रपंच शोधणें। गाळूनियां गगन हंस घेई |
| ४३४३ | ।।ज्ञा.गा.०९४४.०४।। | ज्ञानदेव संधी साधूनियां सिद्धि। छपनाची संधी टाकुनी गेला |
| ४३४४ | ।।ज्ञा.गा.०९४५.०१।। | शांती क्षमा दया निवती निर्व्यंग। होउनी सर्वांग आत्माभोगी |
| ४३४५ | ।।ज्ञा.गा.०९४५.०२।। | नाहीं अंतरूप सर्वही चैतन्य। चिदानंदघन बिंबलेंसे |
| ४३४६ | ।।ज्ञा.गा.०९४५.०३।। | मायीकवृत्तीचा झणीं धरिसी संग। इंद्रियांचा पांग सांडी रया |
| ४३४७ | ।।ज्ञा.गा.०९४५.०४।। | ज्ञानदेव म्हणे कल्पना काजळी। दीपीं दीपमेळीं पाजळी वो जगीं |
| ४३४८ | ।।ज्ञा.गा.०९४६.०१।। | असार घेईंजे सार पारखूनियां विचार। जेणें तुटे येरझार मरणजन्मीं |
| ४३४९ | ।।ज्ञा.गा.०९४६.०२।। | तें रूपस रूपडें पाहतां न संपडे। ह्रदयीं सांपडे ज्ञान गोष्टी |
| ४३५० | ।।ज्ञा.गा.०९४६.०३।। | सांगतां अनुमान अद्वैत सार पूर्ण। ज्ञानाज्ञानी सज्ञान विरुळा जाणे |
| ४३५१ | ।।ज्ञा.गा.०९४६.०४।। | ज्ञानदेव सोपान सांगितलिया संपन्न। हरितत्त्व अनुप्रमाण लाधे पूर्वपुण्यें |
| ४३५२ | ।।ज्ञा.गा.०९४७.०१।। | निर्मिला म्हणसी परेचा विस्तार। तेथें हा विचार वायांवीण |
| ४३५३ | ।।ज्ञा.गा.०९४७.०२।। | पर नाहीं तेथे अरुतें कैचें। आदिमध्य साचें कळिका हरि |
| ४३५४ | ।।ज्ञा.गा.०९४७.०३।। | नाहीं तें सन्मान विकृति उपरमु। त्या दिपीं दीप समु शेजेबाजे |
| ४३५५ | ।।ज्ञा.गा.०९४७.०४।। | बाप रखुमादेविवरु परेसी परता। हा विचारु अरुता दिसे भान |
| ४३५६ | ।।ज्ञा.गा.०९४८.०१।। | सज्ञानी पाहतां अज्ञानी तत्त्वता। अज्ञानी अमृता सद्गुरु जाणे |
| ४३५७ | ।।ज्ञा.गा.०९४८.०२।। | गुरुगम्य सत्ता शिष्य होय सरता। पूर्णी पूर्ण हातां ब्रह्म येत |
| ४३५८ | ।।ज्ञा.गा.०९४८.०३।। | आदि मध्य घर हरीचा शेजार। हरिवीण थार नाहीं कोठें |

| | | |
|---|---|---|
| ४३५९ | ।।ज्ञा.गा.०९४८.०४।। | ज्ञानदेवीं चित्त गुरु धर्म वित्त। अवघें जीवित हरि केला |
| ४३६० | ।।ज्ञा.गा.०९४९.०१।। | मनाची सृष्टि स्वप्न वर्तवी दृष्टी। अळंकारलें उठी गंधर्वनगर। तेथिचिये राणिवेसाठीं। कां भ्रमु धरितोसी पोटीं। जेथें पाहतां पाहणें नुठी। तोचि होई। म्हणोनी देखणिया जवळीके। कीं दृष्टिवीण सुके। तैसें स्वानुभवें स्वानुभव मावळे। ज्याच्या ठायीं। ते अवस्थेवीण दृष्टि। गोचर होई वेगीं। ते देखणेंचि दृष्टि। विठ्ठल रया |
| ४३६१ | ।।ज्ञा.गा.०९४९.०२।। | तुझें तूंचि विंदान जाणोनि  पाहीं। आपेंआपवीण विचारु नाहीं |
| ४३६२ | ।।ज्ञा.गा.०९४९.०३।। | म्हणोनी एकमेक मज आठवे। आठवेचि विसरोनि फावे। पैं देहद्वयभाव विरोनी जाय। तेथें पदत्रयाची मांडणी। कीं तत्त्वत्रयाची वाणी। या पांचांतें जेथ न फावे। कर्मेंद्रिया ज्ञानेंसी। ज्ञानेंद्रियें जो नेमेसी। तंव ते विस्मो करूनि पाहे। सुखस्वानुभवा दु:ख प्रकाशलें। तें सुख केवीं फावे। याचिया गुणागुण न गुंतिजे। हृदयीं सुखावोनि तेंचि तूं राहें रया |
| ४३६३ | ।।ज्ञा.गा.०९४९.०४।। | मग आंगें शेजबाज। कीं हे बाह्येंद्रियांचे उपभोग। मानिसी साच जरी सोंग। स्वप्नींचें असे ऐसें जाणतां। निदसुरा होसी दातारा। या स्वप्नींच्या वोरबारा बापा। वोथरसी कांपा। म्हणोनि बाप रखुमादेविवरु विठ्ठलु। उघडे डोळांचि निधान देखिजे तंव मार्ग सोपा। म्हणोनि जेथींच्या तेथें पाहतां यावीण नाहीं दुजें। वायां खटपट करिसी बापा रया |
| ४३६४ | ।।ज्ञा.गा.०९५०.०१।। | शून्याशून्याधार शून्यशेजे  हरि। शून्यामाजीं घरीं बिंबलासे |
| ४३६५ | ।।ज्ञा.गा.०९५०.०२।। | आधीं आप पाहीं शून्याशून्य देहीं । मग उमजोनी ठायीं घेईजे सुखें |
| ४३६६ | ।।ज्ञा.गा.०९५०.०३।। | शून्य तें काई शून्याशून्य पुशिलें। हृदयस्था जालें कोण्या गुणें |
| ४३६७ | ।।ज्ञा.गा.०९५०.०४।। | बाप रखुमादेविवर विठ्ठल अवघा। शून्याशून्य वेग ज्ञानघन |
| ४३६८ | ।।ज्ञा.गा.०९५१.०१।। | शांति दिसे कोहं पर दिसे सोहं। क्षमा हे कोहं कारुण्य सदा |
| ४३६९ | ।।ज्ञा.गा.०९५१.०२।। | स्नेहाची दिवाळी फेडूनि काजळी। या दीपें वोवाळी जीवशिवीं |
| ४३७० | ।।ज्ञा.गा.०९५१.०३।। | ज्ञेय ज्ञाता ज्ञान दृश्य द्रष्टा दर्शन। रूपीं रूपस्थिति अंकुरलीसे |
| ४३७१ | ।।ज्ञा.गा.०९५१.०४।। | बाप रखुमादेविवर विठ्ठल साच। मी माझें आहाच वायांवीण |
| ४३७२ | ।।ज्ञा.गा.०९५२.०१।। | साऊमा जंव जाये तंव हृदयींच आहे। चित्त विकासुनी पाहे चित्तामाजीं |
| ४३७३ | ।।ज्ञा.गा.०९५२.०२।। | तंव चतुर्भुज हरि हृदयमंदिरीं। तया नमन करीं विज्ञानेंसी |
| ४३७४ | ।।ज्ञा.गा.०९५२.०३।। | शांति धरूनी वाही आपेआप पाही। नमनीं निर्वाहीं न्याहाळिला |
| ४३७५ | ।।ज्ञा.गा.०९५२.०४।। | ज्ञानदेवा रूप बिंबोनी समीप। प्रपंच दु:खरूप सुख जालें |
| ४३७६ | ।।ज्ञा.गा.०९५३.०१।। | औट हात चर्म देह बांदवडी। त्रिगुणाची घडी नुगवे रया |
| ४३७७ | ।।ज्ञा.गा.०९५३.०२।। | सोकरितां धाया काय करील माया। श्रीगुरुच्या पायां विरुळा जाणें |
| ४३७८ | ।।ज्ञा.गा.०९५३.०३।। | सोहंकरा सोहंकरा हरि पोकारा। वायांच मायेचा वारा भरूं नका |

| | | |
|---|---|---|
| ४३७९ | ।।ज्ञा.गा.०९५३.०४।। | सप्तद्वीप पृथ्वी नवखंडें देव। स्वर्ग भोगभाव राणीव व्यर्थ |
| ४३८० | ।।ज्ञा.गा.०९५३.०५।। | ज्ञानदेवीं सार हरिपंथ पार। एकतत्त्व उच्चार तिहीं लोकीं |
| ४३८१ | ।।ज्ञा.गा.०९५४.०१।। | दीपकेमाजीं दीपक दीप्ती सतेज। बिंबोनी सहज बिंबीं न मिळे |
| ४३८२ | ।।ज्ञा.गा.०९५४.०२।। | बिंब नाहीं पाहासील काई। ठायींच्या ठायीं होऊनि राही |
| ४३८३ | ।।ज्ञा.गा.०९५४.०३।। | सर्वी सर्वरस समरसोनी आहे। उभारूनी बाहे वेद सांगे |
| ४३८४ | ।।ज्ञा.गा.०९५४.०४।। | ज्ञानदेव निजीं निजोनी सहज। देहींचा निर्लज्ज रुसला सये |
| ४३८५ | ।।ज्ञा.गा.०९५५.०१।। | जिणें देउनी देहीं नि:शंक होईजे। मां मरणें मरण तयासी म्हणिजे |
| ४३८६ | ।।ज्ञा.गा.०९५५.०२।। | जिणें तें काई मरणें तें काई। जिणें मरणें दोन्ही चोजवेना |
| ४३८७ | ।।ज्ञा.गा.०९५५.०३।। | सिंधु बुडबुडा क्षणामाजीं आटे । सिंधु बुडबुडा कांहीं तें नाटे |
| ४३८८ | ।।ज्ञा.गा.०९५५.०४।। | बाप रखुमादेविवराच्या पायीं। ज्ञानदेवो पाही मरण जाणें |
| ४३८९ | ।।ज्ञा.गा.०९५६.०१।। | सायखडियाचें बिक। अचेत करी परिपाक। जनदृष्टीचें कवतुक। स्फुरे वेगीं |
| ४३९० | ।।ज्ञा.गा.०९५६.०२।। | तैसें हें देहरूप जालें। न होतेंचि होणें आलें। तंव सद्गुरु जाणितलें। येथीचें रया |
| ४३९१ | ।।ज्ञा.गा.०९५६.०३।। | सतधनि म्हणे गुरु जत सांभाळी विवरु। ऐसेंनि तुज वोगरु। वाढिला ब्रह्मीं |
| ४३९२ | ।।ज्ञा.गा.०९५६.०४।। | निराकार अलिप्त वसे। शरीरीं असतुचि नसे। एकतत्त्व मनोद्देशे। हृदयीं ध्याये |
| ४३९३ | ।।ज्ञा.गा.०९५६.०५।। | सोडी रसाची सोये। नको भुलों मायामोहें। सत्रावी दोहतु जाये। जीवन भातें |
| ४३९४ | ।।ज्ञा.गा.०९५६.०६।। | ज्ञानदेव म्हणे श्रीगुरु। ऐसा सांगती विचारु। मग ब्रह्मीं चित्तानुसारु। निरोपिला सर्व |
| ४३९५ | ।।ज्ञा.गा.०९५७.०१।। | आपीं आप माये तेजीं तेज समाये। पवनीं पवन माये पृथ्वी जाये |
| ४३९६ | ।।ज्ञा.गा.०९५७.०२।। | हंस कोठें गेला तूं पाहों विसरला। भ्रमेंचि भुलला कोहं शब्दें |
| ४३९७ | ।।ज्ञा.गा.०९५७.०३।। | सांडीं तूं रे जाती होई रे विजाती। येणें रूपें समाप्ती प्रपंचाची |
| ४३९८ | ।।ज्ञा.गा.०९५७.०४।। | ज्ञानदेवा घर विठ्ठल आचार। वेगीं पर पार हंस पावे |
| ४३९९ | ।।ज्ञा.गा.०९५८.०१।। | अनंतीं अनंत तत्त्वता तंव एक। विरुळा जाणें। एक बिंबताहे |
| ४४०० | ।।ज्ञा.गा.०९५८.०२।। | एका तेजीं बहु बहु तेज दृष्टी। एकतत्त्व सृष्टी मेळु शिवीं |
| ४४०१ | ।।ज्ञा.गा.०९५८.०३।। | तर्काचाही तर्क विवेक सकळ। तेणेंवीण गोपाळ आकळेना |
| ४४०२ | ।।ज्ञा.गा.०९५८.०४।। | ज्ञानदेव जाणें प्रसाद निवृत्ति। मौनाची मुक्ति वाट आहे |
| ४४०३ | ।।ज्ञा.गा.०९५९.०१।। | स्वभावें विचरतां मही। सम ब्रह्म दिशा दाही। एकु एकला असे पाहीं। सर्वांघटीं बाईये वो |
| ४४०४ | ।।ज्ञा.गा.०९५९.०२।। | दुजें द्वैत हेतु सांडी। एकतत्त्वसार मांडी। हरिवीण इये पिंडीं। नाहीं वासु वो माये |

| | | |
|---|---|---|
| ४४०५ | ।।ज्ञा.गा.०९५९.०३।। | काय सांगों याच्या गोष्टी। अवघा दिसे हाचि सृष्टी। विश्वरूप स्वरूप किरिटी। अर्जुना दिठीं दावियलें |
| ४४०६ | ।।ज्ञा.गा.०९५९.०४।। | ज्ञानदेवीं दीप उघड। उजळुनी केलासे वाड। माया देवीं आम्हां नाहीं चाड। अवघा गोड हरि आम्हां |
| ४४०७ | ।।ज्ञा.गा.०९६०.०१।। | बाहिजु भीतरीं भीतरलेपणा उरी । उरी उरैल साचारी जेणें निवविजे। तेथिंचि सारा मुसें मुसल्या आकारा। सोय सांडू नको येरझारा चुकतील |
| ४४०८ | ।।ज्ञा.गा.०९६०.०२।। | सहज भक्तिसुख पावसी। जाणु असतां कां नेणु होतासी। मागिलीं ये तुटीसाठीं। लाभु ये खेपेचा मनुष्यपणाचेनि मापें घेईजेसु रया |
| ४४०९ | ।।ज्ञा.गा.०९६०.०३।। | येकवटु वट वटाच्या पोटीं। बिजीं बीजा आंतवटु आपण पैं। तिहीं रजीं रजु सरे। सरोनियां जें उरे। तैसें एकसरा धुरें। तूं अनुसरें पां |
| ४४१० | ।।ज्ञा.गा.०९६०.०४।। | रविरश्मीचिया तेजा। कवण बैसविलिया वोजा। कैशा सांगती त्या गुजा। सामावेलपणें। जळीं तरंगु भेदु। तैसा परमात्मा परमानंदु। ऐसा सांडूनि गोविंदु। झणें विलया जासी |
| ४४११ | ।।ज्ञा.गा.०९६०.०५।। | जळें जळ पियीजे। तेथें काय उरे दुजें। वोघें वोघुचि गिळिजे। बाप सागरापोटीं। सिंधु नेणें अव्हांटा। नदीचिया वाटा। तैसा करील रे हरि सांठा। तुज आपणांमाजीं |
| ४४१२ | ।।ज्ञा.गा.०९६०.०६।। | तेथें जगचि परतलें। जग जगपणा मुकलें। मोहो अभावीं उरलें। उरतां ठायीं। तेथें सिंधुचि अवघा अवघेपणें नये मागा। यापरी लागवेगा। हरि पावसी रया |
| ४४१३ | ।।ज्ञा.गा.०९६०.०७।। | ऐसे सुखाचे सोहळे। माजीं सुख प्रेम वोळे। कवण सुख बोले। सुख सुकाळें मातलें तें। तेथें मी तूं सरे। सेखीं भक्त तोहि नुरे। शिवीं शिव विरे मोहरे। जालया रया |
| ४४१४ | ।।ज्ञा.गा.०९६०.०८।। | अमृतीं अमृता गोडी। बोल बोलतां बोबडी। पुण्य मनोधर्मी गुढी। उभारिली जेणें। अमर वोघाचेनि वोघें। अफाविजे जिवलगे। बाप रखुमादेविवरा विठ्ठलासंगें सांपडलें |
| ४४१५ | ।।ज्ञा.गा.०९६१.०१।। | दृष्टीचें सुख अंतरीं देख। ओंकार अरुष बोलताती |
| ४४१६ | ।।ज्ञा.गा.०९६१.०२।। | नादुलें ऐकसीं बिंदुलें न देखसी। कोंदलें चौपासी सांवरेना |
| ४४१७ | ।।ज्ञा.गा.०९६१.०३।। | तें आतु ना बाहेरी आणि अभ्यंतरीं। एकलेंचि निर्धारीं वसतसे |
| ४४१८ | ।।ज्ञा.गा.०९६१.०४।। | उफराटिये दृष्टि निवृत्तीच्या शेवटीं। ज्ञानदेवा भेटी होउनी ठेली |
| ४४१९ | ।।ज्ञा.गा.०९६२.०१।। | सांगेन तें एक दावीन तें पाहें। या मनाचि मूळ सोय आठवीं पां |
| ४४२० | ।।ज्ञा.गा.०९६२.०२।। | आठवितां तूं तया ठकशील कैसा। सांजवेळें लाहोसी उदो कां जैसा |
| ४४२१ | ।।ज्ञा.गा.०९६२.०३।। | बुडोनियां राहीं आनंदसागरीं। आठवितां असे जन्मवरी रया |
| ४४२२ | ।।ज्ञा.गा.०९६२.०४।। | पडतासि दृष्टि निवृत्तीच्या चरणीं। मा ज्ञानदेवो मनीं धरुनी ठेला |
| ४४२३ | ।।ज्ञा.गा.०९६३.०१।। | जिता जिणें लागे गोड परत्रीं तें अवघड। अवघीयाहूनि तनु वाड मरण भलें |

| | | |
|---|---|---|
| ४४२४ | ।।ज्ञा.गा.०९६३.०२।। | जिता मरिजे मरोनियां उरिजे। इतुलें जाणिजे तरी जपणेंचि नलगे |
| ४४२५ | ।।ज्ञा.गा.०९६३.०३।। | बाप रखुमादेविवरा विठ्ठलाच्या पायीं। ज्ञानदेव पाहीं मरण सांगें |
| ४४२६ | ।।ज्ञा.गा.०९६४.०१।। | देखणें देखाल तरी हरे मन। सामावलें जीवन मुक्तरत्न रया |
| ४४२७ | ।।ज्ञा.गा.०९६४.०२।। | भला भला तूं भला रे ज्ञाना। निवृत्ति आपणा दावियेलें |
| ४४२८ | ।।ज्ञा.गा.०९६४.०३।। | गुरुमुखें ज्ञान पाविजे निर्वाण। तें निवृत्ति म्हणे ज्ञाना पावशील |
| ४४२९ | ।।ज्ञा.गा.०९६५.०१।। | सकळहि कळा बिंबोनी निराळें। तें तूं घेउनी उगलें राहें रया |
| ४४३० | ।।ज्ञा.गा.०९६५.०२।। | तें तत्त्वता तत्त्व घेई का एकत्व। या मना महत्त्व देऊनियां |
| ४४३१ | ।।ज्ञा.गा.०९६५.०३।। | निरालंब निराकार पाहे तें अपरंपार। तें तूं परात्पर होऊनि राहें |
| ४४३२ | ।।ज्ञा.गा.०९६५.०४।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठल सकळहि कळा प्रकाशकु। तोचि सर्वव्यापकु जाणोनि राहीं |
| ४४३३ | ।।ज्ञा.गा.०९६६.०१।। | जगत्र धांवताहे सैरा म्हणोनी धांवसी। थोर कष्टलासी वायांवीण। धावोनि जावोनि काय करिसी। सहज अहर्निशीं भेटी नाहीं |
| ४४३४ | ।।ज्ञा.गा.०९६६.०२।। | जीवा जाणवेना जीवा जाणवेना। जिवाचें वर्म तें जीवा चोजवेना |
| ४४३५ | ।।ज्ञा.गा.०९६६.०३।। | जिवाशिवा दोन्ही भिन्न भेदु नाहीं। विचारूनि पाहीं हृदयामाजीं। जिऊ सर्वांठायीं असे योगिया न दिसे। कुडी सांडुनि वसे कवणे ठायीं? |
| ४४३६ | ।।ज्ञा.गा.०९६६.०४।। | जिऊ जैसाचि आला तैसाचि गेला। तो कोठें सामावला जाणतीना। ज्ञानदेवो म्हणे जिऊ कोठें गेला। जिवा जन्म जाला कवणे ठायीं |
| ४४३७ | ।।ज्ञा.गा.०९६७.०१।। | भलें बोलोनी दाविलें मज। आत्मज्ञान सांगेन तुज |
| ४४३८ | ।।ज्ञा.गा.०९६७.०२।। | मनाचा प्रकाशु थोरु। मनेंचि ब्रह्म उजियेडु |
| ४४३९ | ।।ज्ञा.गा.०९६७.०३।। | निवृत्ति सेवियेला सुघडु। तेणें मज जाहाला ब्रह्माचा पाडु |
| ४४४० | ।।ज्ञा.गा.०९६८.०१।। | आपणांसी आपण उपदेशु कीजे। गुरुमुख बुझिजे तेंचि तूं |
| ४४४१ | ।।ज्ञा.गा.०९६८.०२।। | मी तें कवण हें तूं जाण। बुझें निर्वाण तेंचि तूं |
| ४४४२ | ।।ज्ञा.गा.०९६८.०३।। | सिद्धचि सांडूनि निघसि अनानी ठायीं। तूं रिघें पां सोई संताचिये |
| ४४४३ | ।।ज्ञा.गा.०९६८.०४।। | जें तपाव्रताचे ठायीं तें तेथेंचि पाहीं। परी तें ठायींच्या ठायीं म्हणे ज्ञानदेवो |
| ४४४४ | ।।ज्ञा.गा.०९६९.०१।। | पाहणें पाहाते सांडुनी निरुतें। पाहिलिया त्यातें तूंचि होसी |
| ४४४५ | ।।ज्ञा.गा.०९६९.०२।। | तोचि तूं आपण तत्त्व तें तूं जाण। नलगे साधन आन कांहीं |
| ४४४६ | ।।ज्ञा.गा.०९६९.०३।। | भानुबिंबेंवीण भासलें तम। ज्ञानदेव वर्म अनुवादला |
| ४४४७ | ।।ज्ञा.गा.०९७०.०१।। | तूं तो माझें मी तो तुझें। ऐक्य जालें तेथें कैचें दुजें |

| | | |
|---|---|---|
| ४४४८ | ।।ज्ञा.गा.०९७०.०२।। | तूं हो मी गा मी तो तूं गा। अज्ञानें बापुडीं नेणती पैं गा |
| ४४४९ | ।।ज्ञा.गा.०९७०.०३।। | सगुण होतें तें गुणासी झालें। सगुण निगुण एकचि जालें |
| ४४५० | ।।ज्ञा.गा.०९७०.०४।। | ज्ञानदेव म्हणे परतूनि पाही। जिवाचा जिवनु कवणीये ठायीं |
| ४४५१ | ।।ज्ञा.गा.०९७१.०१।। | अमोलिक रत्न जोडलें रे तुज। कां रे ब्रह्मबीज नोळखसी? |
| ४४५२ | ।।ज्ञा.गा.०९७१.०२।। | न बुडे न कळे न भीये चोरा। ते वस्तु चतुरा सेविजेसु |
| ४४५३ | ।।ज्ञा.गा.०९७१.०३।। | ज्ञानदेवो म्हणे अविनाश जोडलें। आणुनी ठेविलें गुरुमुखीं |
| ४४५४ | ।।ज्ञा.गा.०९७२.०१।। | पढियंतें कीरु जाणसी तरी। तो ठावो दृष्टीसी दुरी। सिंहुरी मोकारेवीण प्रतिबिंबासी। चेतना लाहे ऐसें कीजे रया |
| ४४५५ | ।।ज्ञा.गा.०९७२.०२।। | आवडी वेचूनियां डोळियां। पुढें रिता कां रिगतोसी। तूंचि तूं सर्वांभूतीं ऐसें जरी जाणसी। तरी साचे भेटी केउता जासी रया |
| ४४५६ | ।।ज्ञा.गा.०९७२.०३।। | अरे हा दुजेवीण खेळु मांडिला। हरिजैत अनुठायीं नाहीं। बाप रखुमादेविवरा विठ्ठला। तुज जाणतयासी काय जाणणें रया |
| ४४५७ | ।।ज्ञा.गा.०९७३.०१।। | मन मुरे मग जें उरे। तें तूं कां रे सेवीसिना |
| ४४५८ | ।।ज्ञा.गा.०९७३.०२।। | दिसतें परी न धरवे हातें। तें संतांतें पुसावें |
| ४४५९ | ।।ज्ञा.गा.०९७३.०३।। | तेथींची खूण विरुळा जाणे। निवृत्तिप्रसादें ज्ञानदेवो म्हणे |
| ४४६० | ।।ज्ञा.गा.०९७४.०१।। | व्रतें तपें तीर्थें तंवचि वरी गर्जते। जंव देखिलें नाहीं तुवां तूंतें। जेथें वेदा मौन्य पडे। श्रुति नेति नेति म्हणोनी बहुडे। तें सुख वाडेंकोडें। भोगिजेसु |
| ४४६१ | ।।ज्ञा.गा.०९७४.०२।। | नाहीं आपण पैं सौरसु। कां करिसी हव्यासु। लटिकाचि मायाभासु। मिथ्या भ्रमु। सिद्धचि असतां करीसी साधनाची चाड। सुख सांडुनी दुःख वाड। भोगितोसी रया |
| ४४६२ | ।।ज्ञा.गा.०९७४.०३।। | या विश्वायेवढा जगडंबरु पसारा। देखोनियां सैरा। मन धांवे तुझें। मृगजळ देखोनी मृगें आलीं टाकोनी। जीवन म्हणौनि तान्हा फुटोनि मेलीं |
| ४४६३ | ।।ज्ञा.गा.०९७४.०४।। | आतां तुज नलगे कष्टावें। जें असेल स्वभावें। नेमिलें देवें तें न चुके ब्रह्मादिकां। उमप सांडुनि करिसी दैन्याचे डोहळे। निधान देखोनियां डोळे। वायां झांकू नको |
| ४४६४ | ।।ज्ञा.गा.०९७४.०५।। | थोडें हें सांडीं परौतें। बहुत तें घेईजे अरौतें जें चाळिते तूंतें आणि विश्वातें। मागें जें केलें तें। अवघे यांतुचि निमालें। आतां पाहतां तुझियेनि बोलें बंधमुक्त रया |
| ४४६५ | ।।ज्ञा.गा.०९७४.०६।। | पुत्र कलत्र वित्त हा तो मिथ्या मोहो। आतां आपुला साची वावो मानेल तुज। नखापासूनि शिखा व्यापूनियां आहे। बाप रखुमादेविवरु विठ्ठलु हृदयींचा ध्यायीं सुखें रया |
| ४४६६ | ।।ज्ञा.गा.०९७५.०१।। | नाहीं तें तूं काय गिळिसीं। आत्मा ओळखोनि होय तत्त्वमसी |
| ४४६७ | ।।ज्ञा.गा.०९७५.०२।। | सांडी सांडी सगुणांची भ्रांतीसी। तूंचि निर्गुण आहासी तत्त्वमसी |

| | | |
|---|---|---|
| ४४६८ | ।।ज्ञा.गा.०९७५.०३।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलु पंढरीयेसी। कांहीं न व्हावा अवघा होसी |
| ४४६९ | ।।ज्ञा.गा.०९७६.०१।। | पाहाणेंचि पाहासी काय। पाहणें तेथें नाहीं। पाहणेंचि पाही। पाहणें रया |
| ४४७० | ।।ज्ञा.गा.०९७६.०२।। | खुंटलें बोलणें बोलीं बोला। बोलुचि मौन्य ठेला मौन्यामाजीं |
| ४४७१ | ।।ज्ञा.गा.०९७६.०३।। | बाप रखुमादेविवरा विठ्ठलाचिये खुणें। अनुभविया बोलणें पारुषलें |
| ४४७२ | ।।ज्ञा.गा.०९७७.०१।। | पिंड निर्माण जीवकळा सरिसी। गति प्रवेशीं कैसी जाली |
| ४४७३ | ।।ज्ञा.गा.०९७७.०२।। | तेथींची रचना न कळे हो देवा। अनुभवाचा ठेवा काढुनी पाहें |
| ४४७४ | ।।ज्ञा.गा.०९७७.०३।। | वरपंगाचें लेंणें लेवविसी जाईजणें। परी घरांतील ठेवणें नुमगसी |
| ४४७५ | ।।ज्ञा.गा.०९७७.०४।। | अणूचें प्रमाण न साहे डोळां। कैसा मुक्तीचा सोहळा घेवों पाहसी |
| ४४७६ | ।।ज्ञा.गा.०९७७.०५।। | जळीं नांदला तो तरंगीं उमटला। मिळोनियां गेला सागरासी |
| ४४७७ | ।।ज्ञा.गा.०९७७.०६।। | बाप रखुमादेविवरा विठ्ठला उदारा। ज्ञानाचा वेव्हारा होई बापा |
| ४४७८ | ।।ज्ञा.गा.०९७८.०१।। | कापुरा अग्नि स्नेह जाला। मी नाहीं तेथें काय उरला |
| ४४७९ | ।।ज्ञा.गा.०९७८.०२।। | मी नाहीं तेथें कवणिये ठायीं। देखत देखत पाहीं भुललासी |
| ४४८० | ।।ज्ञा.गा.०९७८.०३।। | बाप रखुमादेविवर विठ्ठलीं खूण। जाणते जाणती तें अनुभविये |
| ४४८१ | ।।ज्ञा.गा.०९७९.०१।। | स्वप्नाचेनि भ्रमें धरिसी स्थूलाकृति। परि सिद्धि नव्हे सत्य त्याच्या पायीं। कारण महाकारण लिंगादि चतुष्टय। हे शाब्दिक उपाय बोलों ठाती |
| ४४८२ | ।।ज्ञा.गा.०९७९.०२।। | येक नाहीं तेथें दुजें कायिसें। देहद्वय पाहातां दुजें न दिसे |
| ४४८३ | ।।ज्ञा.गा.०९७९.०३।। | तेचि ते संकल्प स्थूळ नैश्वर्याचें भान। त्या म्हणती कारण नवल पाहीं। महाकारण लिंगदेह शाब्दिकीं धरिला। तो शास्त्रज्ञीं पाहिला अर्थीं साही |
| ४४८४ | ।।ज्ञा.गा.०९७९.०४।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलुचि देहीं। अवस्थातीत पाहीं तोचि एक। निवृत्तिरायें अंजन लेवऊनि पायाळा। निजसदन तें विश्व जालें |
| ४४८५ | ।।ज्ञा.गा.०९८०.०१।। | बोधलिया अंजनासीं पायाळू हा काय। निधान जवळी आहे परी शब्द नेणें। परादिकां वाचा मौन पडिलें जाण। तेथें पायाळाची खूण कोण लेखी |
| ४४८६ | ।।ज्ञा.गा.०९८०.०२।। | सुखाचा संवाद आपण्यामाजीं पाहीं। देहींचा देहीं विदेही होऊनि ठेला। अविकल्पवृत्ति भानु संकल्पें हा नातळे। कर्म तया न मिळे करिजे कोणें। बाप रखुमादेविवरु कर्ता कर्म न पडे कांहीं दृष्टी। वायांचि भ्रमें सृष्टी बांधलासी रया |
| ४४८७ | ।।ज्ञा.गा.०९८१.०१।। | श्रुतीं सांगितलें उपनिषदीं अनुवादलें। आम्हां लाधलें निरुतें वर्म। अनुभवें गोविंदु करितां अनुवादु। परब्रह्म आनन्दु तरी तें नव्हे |
| ४४८८ | ।।ज्ञा.गा.०९८१.०२।। | बोलिजे तें नव्हे दाविजे तें नव्हे। गुरुमुखीं पाहावें परमानंदे |
| ४४८९ | ।।ज्ञा.गा.०९८१.०३।। | अरूप परी बरवें दिसे। भीतरीं कैसें विनवीतुसे |

| | | |
|---|---|---|
| ४४९० | ।।ज्ञा.गा.०९८१.०४।। | अनुभविया प्रति बोलिजे लक्षण। ज्ञानदेवें खूण सांगितली |
| ४४९१ | ।।ज्ञा.गा.०९८२.०१।। | निर्गुणाची वार्ता सगुणीं मांडिली। सगुण निर्गुण दोन्ही एकरूपा आलीं |
| ४४९२ | ।।ज्ञा.गा.०९८२.०२।। | सगुण नव्हे तें निर्गुण नव्हे। गुरुमुखें चोजवे जाणितलें पां |
| ४४९३ | ।।ज्ञा.गा.०९८२.०३।। | रखुमादेविवरु साकारु निराकारु नव्हे। कांहीं नहोनि होये तोचि बाईये वो |
| ४४९४ | ।।ज्ञा.गा.०९८३.०१।। | प्रकाशें देखिलें त्याहुनी वेगळें। नाहीं तें धरिलें सोहं मार्गें |
| ४४९५ | ।।ज्ञा.गा.०९८३.०२।। | या मार्गापंथीं तूं तुझें नाहीं। बिंब हारपलें तें तत्त्व पाहीं |
| ४४९६ | ।।ज्ञा.गा.०९८३.०३।। | बीजाचा प्रकाश तुझा तूं नेणसी। हारपलें मन हें दाही दिशीं रया |
| ४४९७ | ।।ज्ञा.गा.०९८३.०४।। | पुराणप्रसिद्ध निवृत्ति लाधलें। गुरुमुखें लक्षीं चोजवलें रया |
| ४४९८ | ।।ज्ञा.गा.०९८४.०१।। | अलाडु आडु पालाडु आडु मध्यें वाहे पाणी। तिहीं संधि खेळु मांडिला सीतादेवी राणी |
| ४४९९ | ।।ज्ञा.गा.०९८४.०२।। | सुखाती चांदिणें राती। बहुतें खेळती येकु देखो |
| ४५०० | ।।ज्ञा.गा.०९८४.०३।। | खेळतां खेळतां नवल पाहे देखणा खिर खाये। सांपडे तें कोण्हा न संगें भोग्या शिवोन राहे |
| ४५०१ | ।।ज्ञा.गा.०९८४.०४।। | भोगिया शिवोन उतरला डायीं। ज्ञानदेव सांगे निवृत्तीच्या पायीं |
| ४५०२ | ।।ज्ञा.गा.०९८५.०१।। | एक पाहतां दुजें गेलें। शेखीं पाहतां सर्व शून्य जालें |
| ४५०३ | ।।ज्ञा.गा.०९८५.०२।। | पाहतां तयाचा विचारु। निवृत्ति जाणे तो श्रीगुरु |
| ४५०४ | ।।ज्ञा.गा.०९८५.०३।। | एक मूळ एक आदि। शून्य मांडिली उपाधी |
| ४५०५ | ।।ज्ञा.गा.०९८५.०४।। | निवृत्तिदासाचें बोलणें। जाणा मीपणा उमाणें |
| ४५०६ | ।।ज्ञा.गा.०९८६.०१।। | ॐ ओंखट सांडुनि अंतरापासुनि। लागावें भजनीं गोविंदाचे |
| ४५०७ | ।।ज्ञा.गा.०९८६.०२।। | नामाचे चिंतनीं असावें नित्यानीं। हरिचे कीर्तनीं जात जावें |
| ४५०८ | ।।ज्ञा.गा.०९८६.०३।। | मान अपमान पाहूं नये संतीं। जोडावा श्रीपति निशिदिनीं |
| ४५०९ | ।।ज्ञा.गा.०९८६.०४।। | शिकविलें संतीं ऐकावें वचन। अनाचारीं मन पाळूं नये |
| ४५१० | ।।ज्ञा.गा.०९८६.०५।। | धनाचिये आशा करूं नये चोरी। वडील वंशघरीं भांडू नये |
| ४५११ | ।।ज्ञा.गा.०९८६.०६।। | अवचित हात घालूं नये बिळीं। खळाचिये बोलीं पडूं नये |
| ४५१२ | ।।ज्ञा.गा.०९८६.०७।। | आशा धरुनियां सांगूं नये ज्ञान। निष्ठुर वचन बोलूं नये |
| ४५१३ | ।।ज्ञा.गा.०९८६.०८।। | इष्टमित्र सखेसोयरे जावई। यांचि आस कांहीं करूं नये |
| ४५१४ | ।।ज्ञा.गा.०९८६.०९।। | ईश्वरीं आपुला घालुनिया भार। करावा विचार आलियाचा |
| ४५१५ | ।।ज्ञा.गा.०९८६.१०।। | उसंती संसारीं असावें अखंड। धरूनियां चाड गोविंदाची |

| | | |
|---|---|---|
| ४५१६ | ।।ज्ञा.गा.०९८६.११।। | उमेच्या भ्रतारा भजावें नित्यानि। हरिचे कीर्तनीं जात जावें |
| ४५१७ | ।।ज्ञा.गा.०९८६.१२।। | रिकामा हा काळ जाऊं न द्यावा। हिताचा करावा लागपाट |
| ४५१८ | ।।ज्ञा.गा.०९८६.१३।। | रिकामी ही तोंडीं न करावी बडबडी। अवगुणीची खोडी टाकून द्यावी |
| ४५१९ | ।।ज्ञा.गा.०९८६.१४।। | लिगटूनी रहावें आवरावें मन। करावा जतन विश्वास हा |
| ४५२० | ।।ज्ञा.गा.०९८६.१५।। | लीला भाविकांची ओळखावी बरी। रात्रीं दारोदारीं हिंडूं नये |
| ४५२१ | ।।ज्ञा.गा.०९८६.१६।। | यातना जे तुटे तो उपाय कीजे। सर्वत्रासी दीजे अन्नदान |
| ४५२२ | ।।ज्ञा.गा.०९८६.१७।। | यावें जावें तरी संताचिया द्वारां। मनांत द्वैतभारा धरूं नये |
| ४५२३ | ।।ज्ञा.गा.०९८६.१८।। | ओंकाराचे मूळ पाहिलें जे ठाईं। मग त्याचे पायीं लीन व्हावें |
| ४५२४ | ।।ज्ञा.गा.०९८६.१९।। | ज्ञानदेव म्हणे ओंनामा सकळ। भजावा गोपाळ निशिदिनीं |
| ४५२५ | ।।ज्ञा.गा.०९८७.०१।। | तीर्थें पाहसी तूं कायी। तुजपाशीं आहे तें कुठेंच नाहीं |
| ४५२६ | ।।ज्ञा.गा.०९८७.०२।। | दगडाचिया देवा घेतां डोईं। कपाळ फुटेल परी मोक्ष नाहीं |
| ४५२७ | ।।ज्ञा.गा.०९८७.०३।। | झळझळित धोतरें देवतार्चनाचा पसारा। दिवसाचीं सोवळीं दहा बारा |
| ४५२८ | ।।ज्ञा.गा.०९८७.०४।। | अरे कसे ज्ञाना एकचि बोला। विश्वात्मा देवचि भरला |
| ४५२९ | ।।ज्ञा.गा.०९८७.०५।। | ज्ञानदेव म्हणे बोलूं आलें मुखा। कानीं एक पाठ पडलें |
| ४५३० | ।।ज्ञा.गा.०९८८.०१।। | अभिमानें करुनी व्यर्थ कां फुगसी। भ्रांता ऐसा होसी मतिमंदा |
| ४५३१ | ।।ज्ञा.गा.०९८८.०२।। | सर्व ब्रह्मरूप ही खूण ओळखी। भिन्नपणा टाकी अंतरींचा |
| ४५३२ | ।।ज्ञा.गा.०९८८.०३।। | प्रारब्ध आणि देह भोगिताहे भोग। कासयासि सांग भ्रांति तुज |
| ४५३३ | ।।ज्ञा.गा.०९८८.०४।। | मान अपमान तुज दोन्ही नाहीं। तूं तो विदेही नित्यशुद्ध |
| ४५३४ | ।।ज्ञा.गा.०९८८.०५।। | साध अपरोक्ष वस्तु सर्वगत। वोळख म्हणत ज्ञानदेव |
| ४५३५ | ।।ज्ञा.गा.०९८९.०१।। | कामक्रोधलोभ घेउनिया संगें। परमार्थासि रिघे तोचि मूर्ख |
| ४५३६ | ।।ज्ञा.गा.०९८९.०२।। | बांधोनिया शिळा पोहों जातां सिंधू। पाहे मतिमंदू मृत्यु शीघ्र |
| ४५३७ | ।।ज्ञा.गा.०९८९.०३।। | देह गेह भ्रांति सोडुनिया द्यावी। साधनें करावीं शुद्ध मार्गें |
| ४५३८ | ।।ज्ञा.गा.०९८९.०४।। | ज्ञानदेव म्हणे तरीच साधलें। ना तरी चळेल मध्यभागीं |
| ४५३९ | ।।ज्ञा.गा.०९९०.०१।। | सदामुक्त असतां बद्ध जालों कैसा। विषयाची आशा धरोनिया |
| ४५४० | ।।ज्ञा.गा.०९९०.०२।। | विषय त्यागितां तोचि होय मुक्त। या नांव विरक्त राजयोगी |
| ४५४१ | ।।ज्ञा.गा.०९९०.०३।। | विरक्त तो कवण त्रिवर्गाचें शून्य। वृत्ति हे सुलीन स्वरूपीं राहे |

| | | |
|---|---|---|
| ४५४२ | ।।ज्ञा.गा.०९९०.०४।। | ध्येय ध्याता ध्यान तिन्ही एकपण। होय तंव साधन करित जाय |
| ४५४३ | ।।ज्ञा.गा.०९९०.०५।। | ज्ञानदेव म्हणे आधीं करुनी पाही। निवृत्तिकृपा ही साधकासी |
| ४५४४ | ।।ज्ञा.गा.०९९१.०१।। | संसारा येउनी नि:संग होईजे। नाहीं तरी जाईजे देशत्यागें |
| ४५४५ | ।।ज्ञा.गा.०९९१.०२।। | परि नको नको दु:ख धुरंधर। पुढें अंध:कार दिसतसे |
| ४५४६ | ।।ज्ञा.गा.०९९१.०३।। | गर्भवास येरझारा न सोसती दातारा। बाप रखुमादेविवर विठ्ठला गा |
| ४५४७ | ।।ज्ञा.गा.०९९२.०१।। | राम सर्वत्र देखणा सर्वांघटीं असे। ऐसें हें पिसें परि वेगळेंचि |
| ४५४८ | ।।ज्ञा.गा.०९९२.०२।। | मायेच्या भूरें भुलले हे जन। जनीं जनार्दन न दिसे त्यांसी |
| ४५४९ | ।।ज्ञा.गा.०९९२.०३।। | ज्ञानदेव म्हणे भावें परिपूर्ण। निवृत्तिनें खूण सांगितली |
| ४५५० | ।।ज्ञा.गा.०९९३.०१।। | संन्याशाची पूजा करावी दुरून। शरीर स्पर्शन करूं नये |
| ४५५१ | ।।ज्ञा.गा.०९९३.०२।। | अग्निमुखीं हवन घालावें दुरून। अंगसंग स्पर्शन करूं नये |
| ४५५२ | ।।ज्ञा.गा.०९९३.०३।। | व्याघ्रासर्पा चारा घालावा दुरून। अंगसंग स्पर्शन करूं नये |
| ४५५३ | ।।ज्ञा.गा.०९९३.०४।। | धर्मार्थकामाचा जालासे अभाव। तेव्हांचि तो शिव श्रुति बोले |
| ४५५४ | ।।ज्ञा.गा.०९९३.०५।। | ज्ञानदेव म्हणे त्यासी करावें नमन। प्रापंचिक जनें शिवूं नये |
| ४५५५ | ।।ज्ञा.गा.०९९४.०१।। | भगवद्गीता हेचि थोर। येणें चुके जन्म वेरझार। वैकुंठवासीं निरंतर। भवसागर उतरेल |
| ४५५६ | ।।ज्ञा.गा.०९९४.०२।। | राम नाम सार धरीं। तेंचि तारक सृष्टीवरी। त्याचेनि संगें निरंतरीं। भवसागर तरसील |
| ४५५७ | ।।ज्ञा.गा.०९९४.०३।। | व्यर्थ प्रपंच टवाळ। येणें साधिली काळवेळ। नाम तुझें जन्म मूळ। हें केवळ परिसावें |
| ४५५८ | ।।ज्ञा.गा.०९९४.०४।। | त्रिकाळ साधिलें नाम। दूर होतील विघ्न कर्म। साधितील धर्म नेम। हें पुरुषोत्तम बोलियले |
| ४५५९ | ।।ज्ञा.गा.०९९४.०५।। | तंव अनुष्ठान सुगम। साधिलें सर्व सिद्धी नेम। क्षेम असेल सर्व धर्म। सर्वकाळ फळलें |
| ४५६० | ।।ज्ञा.गा.०९९४.०६।। | ज्ञानदेव कर्म अकर्ता। पावन जाला श्रीअनंता। सुखदु:खाचा हरि भोक्ता। सर्वकाळ आम्हां आला |
| ४५६१ | ।।ज्ञा.गा.०९९५.०१।। | व्यर्थ प्रपंच टवाळ। सार एक निर्मळ। कृपा करी हरी कृपाळ। दीन दयाळ हरि माझा |
| ४५६२ | ।।ज्ञा.गा.०९९५.०२।। | क्षमा शांति दया रूपीं। तोची उरेल स्वरूपीं। नामें तरले महापापी। ऐसा ब्रह्मा बोलिला |
| ४५६३ | ।।ज्ञा.गा.०९९५.०३।। | गीतेमाजीं अर्जुनाशी। हरि सांगे साक्षी जैशी। जो रत होतसे हरिभक्तीशीं। तो नेमेशी तरेल |
| ४५६४ | ।।ज्ञा.गा.०९९५.०४।। | ज्ञानदेवें भाष्यें केलें। गीताज्ञान विस्तारलें। भक्ती भाग्यवंतीं घेतलें। भाष्येंकरुनी गीतेच्या |
| ४५६५ | ।।ज्ञा.गा.०९९६.०१।। | वेदांत सिद्धांत देतात पैं हाक। स्तब्ध ते जंबुक येर शास्त्रें |
| ४५६६ | ।।ज्ञा.गा.०९९६.०२।। | तेंचि कीं प्रमाण साधनानुक्रम। येर भवभ्रम रूप आथी |
| ४५६७ | ।।ज्ञा.गा.०९९६.०३।। | ऐकजे तीं शास्त्रें पडिलीं संदेहीं। होय नाहीं कांहीं म्हणूनियां |

| | | |
|---|---|---|
| ४५६८ | ।।ज्ञा.गा.०९९६.०४।। | वेदांतींही भिन्न जाणा पूर्वपक्ष। लक्षितेती लक्ष अती मूर्ख |
| ४५६९ | ।।ज्ञा.गा.०९९६.०५।। | काय बहिर्मुख नेणतीच येर। म्हणे ज्ञानेश्वर राजयोगी |
| ४५७० | ।।ज्ञा.गा.०९९७.०१।। | या अमरामाजीं एखादा वोळगों म्हणे। तरी तो ठावो ठाकितां अतिदुस्तरु। भूमंडळीचें राज्य वोळगों म्हणे। तंव तेथें न लभे अवसरू। नि:संग होऊनि यतिधर्म चाळूं म्हणे। तरी भिक्षेसी पडे विचारु। नि:प्रपंच हातीं टाळ दिंडी। घेऊनियां वोळगे तो हरिहरु रे रे |
| ४५७१ | ।।ज्ञा.गा.०९९७.०२।। | हरीचे विद्यावंत जालों रे। आम्ही जाऊनि पंढरपुरीं राहिलों। कळिकाळाच्या माथां पाय देऊनियां। वैकुंठभुवनासी गेलों रे रे |
| ४५७२ | ।।ज्ञा.गा.०९९७.०३।। | अष्टांगयोगें शरीर दंडूं पाहे। तंव येवढें कैचें कष्टसाधन। लय लक्ष लावुनी गुरुमंत्र जपों म्हणों। तरी स्थिर नव्हे अंत:करण। तल्लीन होऊन हरिकथा आयिकों। म्हणों तरी ठायींचेचि बधिर श्रवण। उदंड वाचें हरिहरि म्हणतां। फुकासाठीं चुके पतन रे रे |
| ४५७३ | ।।ज्ञा.गा.०९९७.०४।। | चहूं वेदांचें गव्हर धांडोळितां। वेडावलीं साही दर्शनें। शून्य स्थावर जंगम सर्वत्र व्यापून असणें। जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं सरिसें। या दृष्टी पाहाणें। ऐसियातें सेवितां अविद्या लोपे। मा विश्वास मानिला मनें |
| ४५७४ | ।।ज्ञा.गा.०९९७.०५।। | जयाचिये वोळगों जातां आडकाठीच नाहीं। भीतरीं गेलिया मान पाविजे। अरोधें विरोधें समतुल्य देणें। न मगतां अमरा होईजे। तो क्षणामाजीं दे तें न सरे। कल्पकोटि ऐसिया धुरे कां दुऱ्हाविजे। ऐसियाचे गांवींची सुखवस्तीचे पुरे। मा बहुत कार्य अनुवादिजे रे रे |
| ४५७५ | ।।ज्ञा.गा.०९९७.०६।। | ऐसा वैकुंठपुरपती। पुंडलिकाचिये भक्ति। अमूर्त मूर्तीस आला। भक्तां अमरपद देतुसे। अवलीळा नामें यमलोक विभांडिला। जिहीं जैसा भाविला। त्या तैसा पालटु दाविला परी। अणु एक नाहीं वेंचला। बापरखुमादेविवरु विठ्ठलु। आम्हां गीतीं गातां जोडला रे रे |
| ४५७६ | ।।ज्ञा.गा.०९९८.०१।। | काय करिसी सकळ देवांचें वैभव विलास। माझिया स्वामीवीण ते अवघे उद्वसु रया |
| ४५७७ | ।।ज्ञा.गा.०९९८.०२।। | तपन त्या कमळा कमळीं विकासु। सुकवी मयंकु काय करिसी बा सुधांशु |
| ४५७८ | ।।ज्ञा.गा.०९९८.०३।। | साताही वारांचे दिवसु एकियाचि सुरिजे। तैसें सर्वीं सर्वपण माजींये न श्रीराजे |
| ४५७९ | ।।ज्ञा.गा.०९९८.०४।। | सर्वज्ञ सुंदर देव होतु कां भलतैसे। परी जडातें चेष्टविते आणिकां पैं नसे |
| ४५८० | ।।ज्ञा.गा.०९९८.०५।। | जया नांव नाहीं रूप चिन्ह कांहीं। नामरूप चिन्ह स्वयेंचि पाहीं |
| ४५८१ | ।।ज्ञा.गा.०९९८.०६।। | बाप रखुमादेविवरु आहे तैसाचि पुरे। काय करिसी आणिकां देवांचीं गोवारें रया |
| ४५८२ | ।।ज्ञा.गा.०९९९.०१।। | उपदेश उपरती ज्ञान ध्यान एकनिष्ठ। विज्ञान तें आटलें रे दृश्यादृश्य तेथें दृष्ट। आदिअंत हरपला सर्व ब्रह्म एक वाट। नित्य नेम चालतां रे होय वैकुंठ प्रगट |
| ४५८३ | ।।ज्ञा.गा.०९९९.०२।। | जे जो जे जो निजानंदें आत्माराम प्रसिद्ध। उपदेश ऐकें बाळा मदालसा प्रबोध। उपजोनी संसारीं रे एकतत्त्व तेंची सिद्ध |
| ४५८४ | ।।ज्ञा.गा.०९९९.०३।। | द्वैताद्वैत खोडी नि:शेष आटली आस। कल्पना हो बुडाली रे सर्व दिसे हृषिकेश। ममता हे समूळ माया हेही न दिसे उद्वस। हरपती स्वयंज्योती ऐसा होई रे उदास |

| | | |
|---|---|---|
| ४५८५ | ।।ज्ञा.गा.०९९९.०४।। | विकृतिभान गाढे तेथें न दिसे बिरडें। इंद्रिय रसना दृढ याचें निरसलें कोडें। मिथ्या हे मोहपाश तोडी व्यसन सांकडें। मानस परीकर हेही शोधी निवाडे |
| ४५८६ | ।।ज्ञा.गा.०९९९.०५।। | प्रपंच झोंबो नेदी यांचें उठवी धरणें। शरीर जन्ममरण याचें करी कां रे पारणें । निवटुनी सांडी बापा सर्वभरी नारायणें |
| ४५८७ | ।।ज्ञा.गा.०९९९.०६।। | मी माझें दुजेपणा तेथें वायां घेसी लाहो। निरसी ममता बापा करीं हरिनामें टाहो। शून्य हें भेदी कां रे जन्ममरण निर्वाहो |
| ४५८८ | ।।ज्ञा.गा.०९९९.०७।। | धारणा धीट करी ध्येयपण रे हें सांडी। अखंडता निजसुख कामधाम रे मांडी। स्मरतां नामावळी विषय हे शरीर सांडी। क्रूर रे नव्हे बापा सदा आत्मा ने ब्रह्मांडीं |
| ४५८९ | ।।ज्ञा.गा.०९९९.०८।। | त्रिकाळज्ञान गुज अखंड आत्मा रे चेतवी। नित्यता हरिकथा विष्णु कृष्ण मन रंजवी। सकळ परिपूर्ण होशी जीव शिव रे भावी। मन ध्यान एकरूप सर्वदा हरि गोसावी |
| ४५९० | ।।ज्ञा.गा.०९९९.०९।। | शांति निवृत्ति क्षमा दया सर्वभूतीं भजन। आचरण एकपक्षें सर्वरूपीं जनार्दन। अलक्षसंकल्प भावीं सर्व होई नारायण। विसरें कामना रे सेवीं ब्रह्मसनातन |
| ४५९१ | ।।ज्ञा.गा.०९९९.१०।। | एकट मन करी निवृत्ति धरी निर्वाहो। चेतवितांना इंद्रियांसी आत्मारामें नित्य टाहो। सेवा सुख करी बापा प्रसन्न लक्ष्मीचा नाहो |
| ४५९२ | ।।ज्ञा.गा.०९९९.११।। | सुति मांडी नाममात्रें सेवी तत्पर रसना। उपरती तितिक्षा रे लय लक्षी ध्यासी ध्याना। हरपेल मी माझें होसील ब्रह्मांड येसणा। जिव्हा हें मन चक्षु करी श्रीगुरु निरोपणा |
| ४५९३ | ।।ज्ञा.गा.०९९९.१२।। | तुझा तूंची विदेहीयां आत्मनाथ एकतत्त्वीं। हरपती इंद्रियें रे जीवशिव एके पंक्तीं। नाहीं नाहीं अन्य रूप स्वयें परमात्मा ज्योति। सुटेल जन्ममरण उपजेल प्रत्यक्ष दीप्ती |
| ४५९४ | ।।ज्ञा.गा.०९९९.१३।। | आकाश तुजमाजीं हरपसी परब्रह्मीं। न भजतां इंद्रियांसी हरपती यया उर्मी। बीज तें निरुपिलें सहज राहें रे तूं समी। शमदम रिगुनिगु याचा दाह रे संगमीं |
| ४५९५ | ।।ज्ञा.गा.०९९९.१४।। | तटाक देहभूमी रेचक कुंभक आगमी। चंद्रसूर्य ऐसे जाणा पूर्ण परिपूर्ण रे रमी। लोलुंगता ऋद्धिसिद्धी धारणातें मनोरमी। होसील तूंचि सिद्ध गुरुशिष्य सर्व समी |
| ४५९६ | ।।ज्ञा.गा.०९९९.१५।। | राहो नेदी विषयसुख वायां उद्वेग विस्तार। प्रेमामृत हरिनाम हेंचि सेवीं रे तूं सार। भजतां नित्यकाळ तुटे विषयाचार। तया योगें होईल रे वृत्ति हे एकाकार |
| ४५९७ | ।।ज्ञा.गा.०९९९.१६।। | उद्‍भट सुख साधीं जेणें दिसे आत्मानाथ। बिंबामाजीं बिंब पाहें सर्व होई तूं सनाथ। निश्चित निराळा रे निगम साधीं परमार्थ। धिटिव ऐसी आहे सर्व पुरती मनोरथ |
| ४५९८ | ।।ज्ञा.गा.०९९९.१७।। | उष्णातें घोंटी बापासम चांदिणें धरीं। तेथील अमृतमय चकोर होईं झडकरी। लक्ष हें परब्रह्मीं सदा पूर्णिमा ते सारी। निवतील अष्टही जंगें वोल्हावती शरीरीं |

| | | |
|---|---|---|
| ४५९९ | ।।ज्ञा.गा.०९९९.१८।। | त्रिकाळ ज्ञानकळा येणें साधलें रे निज। तितिक्षा मनोवेगें नित्य प्रत्यक्ष ब्रह्मबीज। साकार निजघटीं तो प्रगटे अधोक्षज। पर्वकाळ ऐसा आहे गुरुमुखें रे चोज |
| ४६०० | ।।ज्ञा.गा.०९९९.१९।। | हें ऐकोनियां पुत्र मातें विनवितां पैं जाला। उपदेश ब्रह्म लक्षी सर्वत्र केला वो काला। सांडिलें संप्रधार आत्मा एकत्र वो केला। कैसें हें उपदेशणें वेदांसी अबोला |
| ४६०१ | ।।ज्ञा.गा.०९९९.२०।। | ऐकें तूं मदालसे मज बोध आत्मारामीं। ऐकतां वो उपदेश बहुत संतोषलों उर्मी। प्रेमामृत जीवनकळा वोल्हावतु असे धर्मी। नि:शेष विषये वो ते समर्पिलें परब्रह्मीं |
| ४६०२ | ।।ज्ञा.गा.०९९९.२१।। | विपरीत माते जालें आप आपामाजीं थोर। चैतन्य हें क्षरलेंसे हाची धरीला वो विचार |
| ४६०३ | ।।ज्ञा.गा.०९९९.२२।। | माझा मी गुरु केला मातेचा उपदेश। न दिसे जनवन सर्वरूप महेश। निराकारी एक वस्तु अवघा दिसे जगदीश। हरपले चंद्रसूर्यो त्याचीमाजीं रहीवास |
| ४६०४ | ।।ज्ञा.गा.०९९९.२३।। | अनंत नामें ज्याचें त्याचा बोध प्रगट। गुरुखूण ऐसी आहे नित्य सेवी वैकुंठ। नेणें हें शरीर माया रामकृष्ण नीट वाट। उच्चारु वो एकतत्त्व सेवा सुख वो धीट |
| ४६०५ | ।।ज्ञा.गा.०९९९.२४।। | हें ऐकोनी मदालसा म्हणे भला भला पुत्रराया। उपजोनी संसारीं रे तोडीं तोडीं विषया। मुक्त तूं अहासी सहज शरण जाय सद्‌गुरु पाया। आदिनाथ गुरु माझा त्या निवृत्तीसी भेटावया |
| ४६०६ | ।।ज्ञा.गा.०९९९.२५।। | तेथुनी ब्रह्मज्ञान उपदेश अपार। समरसें जनींवनीं राज्य टाकीं असार। यामाजीं हिंसा तुज द्वेषिता रे चराचर। चैतन्य ब्रह्म साचें एकरूपें श्रीधर |
| ४६०७ | ।।ज्ञा.गा.०९९९.२६।। | ज्ञानदेव निवृत्तीसी शरण गेला लवलाहीं। हरपली निज काया मन गेलें ब्रह्मडोहीं। निरसली माया मोहो द्वैत न दिसे कांहीं। अद्वैत बिंबलेंसे जनवन ब्रह्म पाही |
| ४६०८ | ।।ज्ञा.गा.१०००.०१।। | उपदेश अगोचर उपदेशी मदालसा पुत्रालागीं रहीवासु। ध्यानरूप येक करीं सर्वांघटीं महेशु। जातीधर्म लोपीं बा न करीं तूं आळसू। उठी जाय योगपंथें जेथें वैकुंठनिवासु |
| ४६०९ | ।।ज्ञा.गा.१०००.०२।। | जे जो जे जो नित्य हरि जनीं वनीं जो आहे। त्याचें तूं ध्यान करीं नित्य तेथेंची राहें। परतोनी येवों नको प्रपंच न पाहें। जठराग्नीं पचों नको वेगीं तूं योगीया होय |
| ४६१० | ।।ज्ञा.गा.१०००.०३।। | जपतप वाचे एक अखंड श्रीराम उच्चार। नित्य धर्म संतांचा रे हाची करीं रे विचार। संगदोष बोधिती तुज म्हणोनी होईं खेचर। अतळों नको द्वैतबुद्धी सदा अद्वैत निरंतर |
| ४६११ | ।।ज्ञा.गा.१०००.०४।। | एक लक्ष एक पक्ष एक तत्त्व हृदयीं। एक ध्यान एक मन त्याचें लागे तूं सोयीं। एक हरि हाचि खरा एक नेम तूं राहीं। आणिक जपों नको देवोदेवीं कांहींबाहीं |

| | | |
|---|---|---|
| ४६१२ | ।।ज्ञा.गा.१०००.०५।। | देव तो वैकुंठींचा निरालंबी रे आहे। निराळ सर्व जीवा म्हणोनी ध्यातु जाये। जीव हा शीव करी ऐसें करुनी राहे। रामनाम मंत्र ध्वनी कळीकाळ वास न पाहे |
| ४६१३ | ।।ज्ञा.गा.१०००.०६।। | कोहं हें उपजतां टाकिलें तुवां सोहं। गर्भी होतासी सावध आतां म्हणतासी हूं हूं। अहंकार जपों नको मन मुंडी संमोह। एकट मन करीं रामनामीं धरीं भाव |
| ४६१४ | ।।ज्ञा.गा.१०००.०७।। | शांति करीं जीवशिवीं सर्व क्षरलासे हरि। क्षमा दया बहिणी तुझ्या माया सांडीं भीतरीं। बंधु पिता सखि जणें टाकीं तूं दुरीच्या दुरी। मत्सर हा घेवों नको मद टाकीं हा बाहेरी |
| ४६१५ | ।।ज्ञा.गा.१०००.०८।। | हरिरूप निखळ आहे योगी जाणती यासी। अंतर तें दुरांतर हें तूं जप मानसीं। कर्म हें ब्रह्म जाण ऐसा होईं समरसीं। तत्काळ होशी योगी संदेह नाहीं त्यासी |
| ४६१६ | ।।ज्ञा.गा.१०००.०९।। | सत्त्व रज तमीं गुंफों नको एकतत्त्वीं आहे भाव। नानातत्त्वीं धरिसी व्यर्थ मग तुज न पवे देव। मी माझें वाहों नको व्यर्थ करिसी उपाव। शिणलासी येतां जातां हा तुज नाहीं आठव |
| ४६१७ | ।।ज्ञा.गा.१०००.१०।। | शरीर हें नव्हे तुझें तरुण बाळ रे वृद्ध। जंववरी सावध आहे तंववरी करीं प्रबोध। एकनामीं विष्णूचे रे जाणती तेचि सिद्ध |
| ४६१८ | ।।ज्ञा.गा.१०००.११।। | नि:शंक मार्ग चाळी आडकाठी नाहीं तेथें। विहंगमीं चाड धरी पिपीलिका नेघे हित। अजप तेथें जपें सदा पूर्ण अनंत। न धरीं विकल्प कांहीं उद्धरसी त्वरित |
| ४६१९ | ।।ज्ञा.गा.१०००.१२।। | कामना चित्तवृत्ति अनुग्रह हे उपदेश। ग्रहभूतपिशाच्च रे याचा नव्हे तुज त्रास। कळिकाळ पडेल तेथें पावसी परमपरेश। झणें हें पावतील शरीर न करी न करी आळस |
| ४६२० | ।।ज्ञा.गा.१०००.१३।। | अंतीं अंत उर्ध्व अध दिशा नांदे एक। हरिवीण न दिसे कांहीं संत जाणती विवेक। निरसली त्यांची माया हरि भरला दिसे एक। नयनीं दृष्टि चोख जैसा अमृताचा मयंक |
| ४६२१ | ।।ज्ञा.गा.१०००.१४।। | योगिया तूंचि जाण योगयाग तपें हरि। न भजे हरिवीण उगा नसे क्षणभरी। रामकृष्ण वाचे सदा नित्य जपे निरंतरीं। हरिध्यान ऐसें आहे पुत्रा हेंचि तूं स्वीकारीं |
| ४६२२ | ।।ज्ञा.गा.१०००.१५।। | लोपतील मन संग संग भंग सांगडी। अवचिती पडेल कव जन्ममरणाची उडी। न मिळे आयुष्य तुज मनुष्यजन्म अर्ध घडी। उठीचि उठोनियां जाय तूं तांतडी |
| ४६२३ | ।।ज्ञा.गा.१०००.१६।। | विवेक करीं बाळा पुराणप्रसिद्ध पाहे। वेदशास्त्रें बोलिले हरि हें पाहोनी उगा राहें। योगिये विसावले तेथें दिव्यचक्षु करुनी पाहें। सत्रावी हे संजीवनी उलट करी लवलाहे |
| ४६२४ | ।।ज्ञा.गा.१०००.१७।। | मातृका भेदूनियां षट्चक्रें टाकीं वेगीं। तेथें तूं गुंफो नको चाल विहंगममार्गीं। अनंत सिद्ध गेले ऋषिमुनीच्या संगीं। नारदादि अवधूत ते प्रपंचीं नि:संगी |

| | | |
|---|---|---|
| ४६२५ | ।।ज्ञा.गा.१०००.१८।। | हनुमंत कपिराज भीष्मादिक उत्तम। परीक्षिति प्रल्हाद ते पैं जाले आत्माराम। ध्रुव आणि अंबऋषी पावले वैकुंठधाम। यांचा तूं संग करी होई कां रे नि:काम |
| ४६२६ | ।।ज्ञा.गा.१०००.१९।। | मदालसा म्हणे पुत्रा ऐसा आहे उपदेश। भाव गर्भींचा रे तुज विचरे पृथ्वी नि:शेष। सरता होई संतामाजीं चित्तीं ध्याई हृषीकेश। परब्रह्म तूंचि होसी ऐसें बोलियेले व्यास |
| ४६२७ | ।।ज्ञा.गा.१०००.२०।। | शुकादिक पुत्र ज्याचे तो साक्षात् नारायण। अवतरले मनुष्यवेषें तारियेले अवघे जन। ऐसाचि होईं तूं रे विसरे मीतूंपण। उठीं जाये ऊर्ध्व पंथें करील कृपा हरि आपण |
| ४६२८ | ।।ज्ञा.गा.१०००.२१।। | नाम हें अमृतसिंधु हृदयीं जपे सदाकाळ। नाहीं तुज रोगराई तुज देखोनी पळेल काळ। हरिसी जो विनटला तया नाहीं काळ वेळ। नामधारकाचें तीर्थ वंदीं तीर्थकल्लोळ |
| ४६२९ | ।।ज्ञा.गा.१०००.२२।। | पुत्र म्हणे अवो माते गुरु तूंचि जालिसी। नसवे क्षणभरी जपतप मानसीं। हरि हा श्रेष्ठ राणा तूंचि तारक जीवासी। भवार्णवीं तारियेले म्यां दृढ धरिलें मानसीं |
| ४६३० | ।।ज्ञा.गा.१०००.२३।। | खेचर बुद्धि केली खेळीनलों चौऱ्यांशी। खुंटल्या जन्मयोनी पावलों मोक्षसुखाशी। खेचराखेचर माये मी तुझा वो उपदेशी। गुरुगम्य उपदेशिलें शिष्य निवाला मानसीं |
| ४६३१ | ।।ज्ञा.गा.१००१.०१।। | उपदेश ब्रह्मज्ञान पुत्रा ऐक रे बीज। सांडीं सांडीं मायामोहो मुक्त विचरे रे सहज। आशा मनसा गुंफो नको सोहं धरी का रे नीज। अखंड गुरुचरणीं मौन्य धरी का रे काज |
| ४६३२ | ।।ज्ञा.गा.१००१.०२।। | उपदेश मदालसा निज का रे आधीं। पूर्णबोधें उमजे रे हेंचि साधी समाधी। लटिका हा मायामोह लक्ष लावीं गोविंदीं। सांडीं मांडी कोहंवेगीं लीन होईं परमानंदीं। जे जो जे जो जे जो बाळा |
| ४६३३ | ।।ज्ञा.गा.१००१.०३।। | चौऱ्यांशीं लक्ष जीव जन शिणले योगी येतां जातां। विरळा देखों परतला जो पारुषला पूर्णता। मनबुद्धि एकचित्तें दृढ धरी अनंता। उपरती चित्तें करीं सावध होईं त्वरिता |
| ४६३४ | ।।ज्ञा.गा.१००१.०४।। | जन्म हें दुर्लभ जाणा मनुष्यजन्म अगाध। ज्ञानध्यान बुझिजे आधीं वरी गुरूचा प्रबोध। तरीच साधेल तुज नाहीं तरी होसी मुढ अंध। नेमिलें आयुष्य वेचे कोण तोडी भवबंधकंद |
| ४६३५ | ।।ज्ञा.गा.१००१.०५।। | नवमास होतासी गर्भीं अधोवदनें दु:खित। तैं होतां उमज तुज कां रे येथें निश्चित। परतोनि पाहें वेगीं मनीं धरीं अच्युत। तुटेल योनिपंथू मग तूं सर्वांतीत |
| ४६३६ | ।।ज्ञा.गा.१००१.०६।। | जंववरी माझें माझें मन न संडी तुझें। तंववरी मोहोपाश व्यर्थ धरणिये ओझें। विष्ठामूत्र जंतगर्भीं म्यां पाहिलें तुझें ओझें |
| ४६३७ | ।।ज्ञा.गा.१००१.०७।। | उठीं पुत्रा सावध होईं मी माझें सांडी धरीं। कोशकीटकें जन्मलासी तैसें तूं बा न करीं। आपण्या आपण होसी तुझा तूंचि रे वैरी। जंव नाहीं आलें काळ। चक्र वेगीं स्मरे मुरारी |

| | | |
|---|---|---|
| ४६३८ | ।।ज्ञा.गा.१००१.०८।। | इंद्रियें सावध अहाती तंव करी धांवाधांवीं। मग विस्मृति पडेल बुद्धि मग न साधे हरि गोसावी। सर्वघटीं हरि ध्याय मनचक्षु एक भावीं। नारायण नामपाठ वेदशास्त्र अनुभवी |
| ४६३९ | ।।ज्ञा.गा.१००१.०९।। | दिननिशीं शरीर तुझें बाळतरुणवृद्ध होय। काया हे नव्हे तुझी सांडीं सांडीं ममता माया। निर्गुणरूप हरिरूप त्यासी तूं शरण जाय। सगुणीं झोंबों नको हरिहरू तल्लीन राहें |
| ४६४० | ।।ज्ञा.गा.१००१.१०।। | मृगजळ मायापूर व्यर्थ इंद्रियांची झोंबी। कामना लपवी आधीं लय लावी हरिच्या बिंबीं। चक्षें पक्षें मन गोंवीं बिरडें घाली निरालंबीं। शुद्धबुद्ध तत्त्व हरि एकतत्त्व नितंबी |
| ४६४१ | ।।ज्ञा.गा.१००१.११।। | गुरुगम्य आगमाचें हेंचि तत्त्व उत्तम। सत्त्व रज तमीं गुंफों नको मा मार्ग धरी उपम। प्राण लपवी प्राणामाजीं वासना करी नि:काम |
| ४६४२ | ।।ज्ञा.गा.१००१.१२।। | हेंचि साधन योगियांचें शिवाचें मनोगत। उठोनियां प्रात:काळीं तनुमनध्यान नित्य। जागरणीं हरिकीर्तना उद्धरसी त्वरित। नाशिवंत शरीर जाण मग तुज न घडे हित |
| ४६४३ | ।।ज्ञा.गा.१००१.१३।। | क्षणां एका शरीर नासे हें तुझें तुज न कळे। अवचिता येईल काळ झांकतील देखणें डोळे। मग हे नाठवे तुज करी गुरुमेळीं निर्मळ। सांडीं मांडी करूं नको टाकीं टाकीं मनींचें सकळ |
| ४६४४ | ।।ज्ञा.गा.१००१.१४।। | व्यर्थ रे राहसी येथें पडशील मोहोफांसा। दशदिशा हरि आहे अर्ध उर्ध्व महेशा। मही हें अंथरुण आकाश करीं अवकाशा। या परी विचरें रे राहावें प्रमाण सरिसा |
| ४६४५ | ।।ज्ञा.गा.१००१.१५।। | तत्त्व हें एकरूप हरिवीण नाहीं कोठें। द्वैतभाव न धरीं मनीं नीट जाय वैकुंठें। हा मार्ग योगियांचा संत गेले नीट वाटे। अभक्त गुंफले येथें तेही पडिलें आड वाटे |
| ४६४६ | ।।ज्ञा.गा.१००१.१६।। | सनकादिकां पंथ हाचि सेविला उपजतां। नारदें विचार केला मग न राहे तो निवांता। गोरक्ष बुझला वेगीं दृढ कास हनुमंता। अवधूत याचि परी दत्तामाजीं पूर्णता |
| ४६४७ | ।।ज्ञा.गा.१००१.१७।। | उन्मनी साधीं बाळा रूप न्याहाळीं नयनीं। नासिकीं ठेउनी दृष्टि खेंचरी मुद्रा निर्वाणीं। शरीर हें असो जावो याची न करीं तूं करणी। रामकृष्ण वाचा पाठ हेंचि धरीं निर्वाणीं |
| ४६४८ | ।।ज्ञा.गा.१००१.१८।। | अष्टदळ हृदयीं आहे तोचि आत्मा ये करी। मन बुद्धि वित्त चित्त दिसों नेदी बाहेरी। मातापिता प्राण तुझे तो दाखवील शरीरीं। स्त्रीपुत्र इंद्रियद्वारा सांडी परती माघारी |
| ४६४९ | ।।ज्ञा.गा.१००१.१९।। | मन हे कोंडी पिंडीं तंतू तुटों नेदी याचा। मार्ग हे जिव्हे पारुष रे हरि राम कृष्ण वाचा। रिकामा क्षणभरी पंथ धरी प्रेमाचा। आदि मध्य हरि एकु तोचि ध्यायीं हृदयींचा |
| ४६५० | ।।ज्ञा.गा.१००१.२०।। | श्रवण स्मरण करी काळ घाली आंकणा। भीष्में साधिलें हरि तो पावला नारायणा। लक्ष्मणें धरिली बुद्धि वोळगिला रामराणा। निमिष एक न भरतां शरीर सांडिलें प्राणा |

| | | |
|---|---|---|
| ४६५१ | ।।ज्ञा.गा.१००१.२१।। | हित तेंचि करी बाळा हरिप्रेमें मन करी। सावधान चित्त आहे तंव हें सर्व दृढ निवारी। भुली पडेल अंतीं तुज मग नाहीं कैवारी। ममतेचें बिरडें फेडी उठे चाले योगरीतीं |
| ४६५२ | ।।ज्ञा.गा.१००१.२२।। | म्हणे माते परियेसी कैसें उपदेशिलें ज्ञान। गुरु हा कोण करूं अवघें दिसे विज्ञान। मज याचें स्मरण झालें सोहं होतें मज ध्यान। कोहं हें विसरलों जालें संसार मौन्य |
| ४६५३ | ।।ज्ञा.गा.१००१.२३।। | परतले प्रेमभाव उद्‌बोध आला धांवया। कळिकाळ न दिसे दृष्टि पापपुण्य रहावया। सभराभरित हरि दिसे माझें कैचें उरावया। तूं तंव विदेही माया मदालसा मज राखावया |
| ४६५४ | ।।ज्ञा.गा.१००१.२४।। | मदालसा म्हणे पुत्रा जो उपदेश करुणा। ब्रह्म हें जीवीं शिवीं भोगी योनी नारायणा। शांति क्षमा बाणली तुज कैचें उमटलें गुज |
| ४६५५ | ।।ज्ञा.गा.१००१.२५।। | हे स्थिति बाणली ज्यासी तो मी परिपूर्ण योगी। दया मुक्ति जाली दासी नित्य उन्मनीं भोग भोगी। त्याचिया दर्शनें जीव तरतील वेगीं। उठीं पुत्रा जाय पंथें जेथें सत्रावी उगी |
| ४६५६ | ।।ज्ञा.गा.१००१.२६।। | मुक्तामुक्त अभयदान मुक्त झाला अनुभवीं। राहिली निरालंबी रातलासे सतरावी । मुक्ताबाई मुक्त ज्ञानें मदालसा नांवानांवी। मुक्तलग उपदेश चांगया दिधला पाहीं |
| ४६५७ | ।।ज्ञा.गा.१००२.०१।। | उपदेश मदालसा देहो निर्मिला कैसा। आलासी कवण्या वाटा मातेचिया गर्भवासा। जो पंथ वोखटा रे पचलासी कर्मकोठा। अविचार बुद्धि तुझी पुत्रराया अदटा |
| ४६५८ | ।।ज्ञा.गा.१००२.०२।। | पर्ये दे मदालसा सोहं जो जो रे बाळा। निजध्यानीं नीज पां रे लक्ष लागो दे डोळां। निज तें तूं विसरलासी होसी वरपडा काळा |
| ४६५९ | ।।ज्ञा.गा.१००२.०३।। | नवमास कष्टलासी दहाव्यानें प्रसूत जाली। येतांचि कर्मजाड तुझी मान अडकली। आकांतु ते जननीये दुःखें धाय मोकली। स्मरे त्या हरिहरा ध्यायीं कृष्णमाउली |
| ४६६० | ।।ज्ञा.गा.१००२.०४।। | उपजोनी दुर्लभ रे मायबापा जालासी। वाढविती थोर आशा थोर कष्टी सायासीं। माझें माझें म्हणोनियां झणी वायां भुलसी। होणार जाणार रे जाण नको गुंफों भवपाशीं |
| ४६६१ | ।।ज्ञा.गा.१००२.०५।। | हा देहो नाशिवंत मळमूत्राचा बांधा। वरि चर्म घातलें रे कर्मकीटकांचा सांदा। रवरव दुर्गंधी रे अमंगळ तिचा बांधा। स्मरे त्या हरिहरा शरण जाईं गोविंदा |
| ४६६२ | ।।ज्ञा.गा.१००२.०६।। | या देहाचा भरंवसा पुत्रा न धरावा ऐसा। माझें माझें म्हणोनियां बहु दुःखाचा वळसा। बहुत ठकियेलें मृगजळाच्या आशा। तृष्णा सांडूनियां योगी गेले वनवासा |
| ४६६३ | ।।ज्ञा.गा.१००२.०७।। | या पोटाकारणें रे काय न करिजे एक। यालागीं सोय धरी रे तिहीं भुलविले लोक। ठाईंचें नेमियेले त्याचें आयुष्य भविष्य। लल्लाटीं ब्रह्मरेखा नेणती ते ब्रह्मादिक |
| ४६६४ | ।।ज्ञा.गा.१००२.०८।। | जळींचीं जळचरें रे जळींचिया रमती। भुललीं तीं बापुडीं रे तें कांहीं नेणती। जंव नाहीं पुरली त्याची आयुष्यप्राप्ती। वरी घालुनी भोंवराजाळ बापा तयातें गिवसिती |

| | | |
|---|---|---|
| ४६६५ | ।।ज्ञा.गा.१००२.०९।। | पक्षिणी पक्षीया रे नीरंजनीं ये वनीं। पिलिया कारणें रे गेली चारया दोन्ही। अवचिती सांपडली पारधिया लागुनि। गुंतुनी या मोहोपाशीं प्राण त्यजिती दोन्ही |
| ४६६६ | ।।ज्ञा.गा.१००२.१०।। | मृग हा चारिया रे अतिमानें सोकला। अविचार बुद्धि त्याची परतोनी मागुता आला। तंव त्या पारधियानें गुणीं बाणु लाविला। आशा रे त्यजूनियां थिता प्राण मुकला |
| ४६६७ | ।।ज्ञा.गा.१००२.११।। | अठरा भार वनस्पती फुलीं फळीं वोळती। बावित्या पोखरणीं नदी गंगा वाहती। ज्या घरीं कुलस्त्रिया राज्य राणीव संपत्ती। हे सुख सांडूनियां कासया योग सेविती |
| ४६६८ | ।।ज्ञा.गा.१००२.१२।। | हें सुख सांडूनियां कोण फळ तयासी। कपाट लंघूनियां योगी ध्याती कवणासी। योग तो सांग मज कवण ध्यान मानसीं। सर्वत्र गोविंदु रे हृदयीं ध्याई हृषिकेशी |
| ४६६९ | ।।ज्ञा.गा.१००२.१३।। | इतुकिया उपरी रे पुत्रा घेई उपदेशु। नको भुलों येणें भ्रमें जिवित्वाचा होईल नाशु। क्षीरा निरा पारखी रे परमात्मा राजहंसु। निर्गुण निर्विकार पुत्रा सेवीं ब्रह्मरसु |
| ४६७० | ।।ज्ञा.गा.१००२.१४।। | इतुकिया उपरी रे पुत्र मातें विनविता जाला। संसारसोहळा हा थोरा कष्टीं जोडला। पंचभूतें निवती येथें म्हणोनि विश्रामु केला। वोखटा गर्भवासु कवणा कार्या रचिला |
| ४६७१ | ।।ज्ञा.गा.१००२.१५।। | गर्भीची यातना रे पुत्रा ऐकें आपुल्या कानीं। येतां जातां येणें पथें सांगाती नाहीं रे कोण्ही। अहंभावो प्रपंचु पुत्रा सांडी रे दोन्ही। चौऱ्यांशीं जीवयोनी प्रवर्तले मुनिजन तत्क्षणीं |
| ४६७२ | ।।ज्ञा.गा.१००२.१६।। | वाहतां महापुरीं रे पुत्रा काढिलें तुज। रक्षिलासी प्रसिद्ध सांपडलें ब्रह्मबीज। मग तुज वोळखी नाहीं का रे नेणसी निज। आपेंआप सद्गुरु कृपा करील सहज |
| ४६७३ | ।।ज्ञा.गा.१००२.१७।। | उपजत रंगणा रे पुत्रा तुवां जावें वना। बैसोनी आसनीं रे पाहें निर्वाणीच्या खुणा। प्राणासी भय नाहीं तापत्रयाचाराणा। मग तुज सौरसु पाहा रे परब्रह्मीच्या खुणा |
| ४६७४ | ।।ज्ञा.गा.१००२.१८।। | बैसोनी आसनीं रे पुत्रा दृढ होई मनीं। चेतवीं तूं आपणापे चेतविते कुंडलिनी। चालतां पश्चिमपंथें जाई चक्र भेदुनी। सतरावी जीवनकळा पाहे आत्मा हा चिंतुनी |
| ४६७५ | ।।ज्ञा.गा.१००२.१९।। | मग तूं देखसी त्रिभुवन स्वर्ग मृत्यु पाताळ। नको भुलों येणें भ्रमें सांडीं विषयपाल्हाळ। आपणापे देख पां रे स्वरूप नाहीं वेगळें। परमात्मा व्यापकु रे पाहा परब्रह्म सांवळें |
| ४६७६ | ।।ज्ञा.गा.१००२.२०।। | इतुकिया उपरी रे पुत्रा विनवी ते जननी। परियेसी माउलीये संतोषलों तत्क्षणीं। इंद्रायणी महातटीं विलासलों श्रीगुरुचरणीं। बोलियेले ज्ञानदेवो संतोषलों वो मनीं |
| ४६७७ | ।।ज्ञा.गा.१००३.०१।। | श्रीगुरु देवराया प्रणिपातु जो माझा। मनादि मुळ तूंचि विश्वव्यापका बीजा। समाधी घेई पुत्रा स्वानंदाचिया भोजा। पालखी पौढलिया नाशिवंत रे माया |

| | | |
|---|---|---|
| ४६७८ | ।।ज्ञा.गा.१००३.०२।। | जाग रे पुत्रराया जाईं श्रीगुरु शरण। देह तूं व्यापिलासी चुकवी जन्ममरण। गर्भवासु वोखटा रे तेथें दु:ख दारुण। सावध होईं का रे गुरुपुत्र तूं सुजाण |
| ४६७९ | ।।ज्ञा.गा.१००३.०३।। | मदालसा म्हणे पुत्रा ऐक बोलणें माझें । चौऱ्यांशी घरामाजीं मन व्याकुळ तुझें। बहुत सीणतोसी पाहतां विषयासी वांझे। जाण हें स्वप्नरूप येथें नाहीं बा दुजें |
| ४६८० | ।।ज्ञा.गा.१००३.०४।। | सांडीं रे सांडीं बाळा सांडीं संसारछंदु। माशिया मोहळ रे तेणें रचियेला रे कंदु। झाडूनि आणिखी नेला तया फुकटचि वेधु । तैसी परी होईल तुज उपदेशें आनु |
| ४६८१ | ।।ज्ञा.गा.१००३.०५।। | सत्त्व रज तम हे तुज लाविती चाळा। काम क्रोध मद मत्सर तुज गोंविती खेळा। यासवें झणें जासी सुकुमारा रे बाळा। अपभ्रंशीं घालतील मुकसील सर्वस्वाला |
| ४६८२ | ।।ज्ञा.गा.१००३.०६।। | कोसलियानें घर सुदृढ पैं केलें। निर्गमु न विचारितां तेणें सुख मानियेलें। जालें रे तुज तैसें यातायाती भोगविलें। मोक्षद्वार चुकलासी दृढ कर्म जोडलें |
| ४६८३ | ।।ज्ञा.गा.१००३.०७।। | सर्पें दर्दुर धरियेला रे मुखीं तेणें हिरे माशीं धरियेली रे पक्षी। तैसा नव्हे ज्ञानयोगु आपआपणातें भक्षी। इंद्रिया घालीं पाणी संसारीं होई रे सुखी |
| ४६८४ | ।।ज्ञा.गा.१००३.०८।। | पक्षिया पक्षिणी रे निरंजनीं ये वनीं। पिलिया कारणें रे गेली चारया दोन्ही। मोहोजाळें गुंतली रे प्राण दिधले टाकुनी। संसार दुर्घट हा विचारु पाहे परतुनी |
| ४६८५ | ।।ज्ञा.गा.१००३.०९।। | जाणत्या उपदेशु नेणता भ्रांति पडिला। तैसा नव्हे ज्ञानप्रकाशु ज्ञानदेवो अनुवादला। अनुभवीं गुरुपुत्र तोचि स्वयें बुझाला। ऐक त्या उद्धरणा गायक सहज उद्धरला |
| ४६८६ | ।।ज्ञा.गा.१००४.०१।। | मदालसा म्हणे पुत्रा तूं मुक्त होतासी। संसारमायामोहें कां रे बद्ध जालासी। सिद्ध तें विचारी पां जेणें सुखीया होसी |
| ४६८७ | ।।ज्ञा.गा.१००४.०२।। | चेई तूं रे तानुलिया जाई श्रीगुरुशरण। देहभावीं व्यापिलासी मग तुज शिकवील कवण। अज्ञानपण सांडूनियां तूं चुकवीं जन्ममरण। गर्भवास वोखटा रे गर्भीं दु:ख दारुण |
| ४६८८ | ।।ज्ञा.गा.१००४.०३।। | जागृति आणि निद्रा तुज स्वप्नीं भरु। सुषुप्ती वेळोवेळां तुज पडिला विसरु। तें जंव नेणसी रे तंव तुज नाहीं निर्धारु |
| ४६८९ | ।।ज्ञा.गा.१००४.०४।। | देह नाशिवंत तूं कां रे भुललासी। अखंड तें विचारीं पां जेणें सुखिया होसी। दु:ख तें आठवीं रे गर्भीं काय भोगसी। जठराग्नीं कृमींकुंडीं वेळोवेळां पडसी |
| ४६९० | ।।ज्ञा.गा.१००४.०५।। | कोसलियानें घर रे सृदृढ पैं केलें। रिगुनिगु न विचारितां तेणें सुख मानिलें। जाहालें बाळा तुज तैसें यातायाती भोगविलें। मोक्षद्वार चुकलासी सकळही कर्में संचिलें |
| ४६९१ | ।।ज्ञा.गा.१००४.०६।। | सर्पें दर्दुर धरियेला रे मुखीं तंव तेणें माशी तोंडीं धरियेली शेखीं। तैसा हा मायामोहो तुज कां रे नुपेक्षी। इंद्रियें व्यापूनियां संसारीं सुखी दु:खी |

| | | |
|---|---|---|
| ४६९२ | ।।ज्ञा.गा.१००४.०७।। | मृग रे जळ जैसें हेलावत पैं दिसे। तैसी हे भ्रांती माया तुज नाथिली आभासें। उत्पत्ती प्रळय दोन्ही ये तरी तुज सरीसे। स्थिर होउनी विचारीं पां आणिक नाहीं बा तैसें |
| ४६९३ | ।।ज्ञा.गा.१००४.०८।। | मृग पक्षी कीटकु पतंगु होसी। आक्षेपीं संचर रे नाना योनी पावसी। पूर्ण ज्ञानसुख जेणें तें तूं कां रे नेणसी। अविनाश तेंची तूं रे वायां सबळ कां करिसी |
| ४६९४ | ।।ज्ञा.गा.१००४.०९।। | परब्रह्म बाप तुझा इच्छा माया हे तुझी। अंश रे तूं तयाचा सबळ कां रे बुद्धी तुझी। अज्ञान तुज व्याली ते नव्हे का रे वांझी। तेणें तूं भुललासी ऐक शिकवण माझी |
| ४६९५ | ।।ज्ञा.गा.१००४.१०।। | परतत्त्वा आणि तुज बाळा नाहीं रे भिन्न। अनादि तूं आहेसी रे परी हें न देखे मन। अकर्म कर्म केलें तेणें जालें अज्ञान। निष्कर्म होय जेणें तें तूं करी कां रे ज्ञान |
| ४६९६ | ।।ज्ञा.गा.१००४.११।। | पुत्र म्हणे वो माते मी अनादि कैसा। मी माझें जाणता वो मी अज्ञान कैसा। उकलु केवीं होय तुज कैसा भरंवसा। जीवन्मुक्त होय दृष्टि दाखवी तैसा |
| ४६९७ | ।।ज्ञा.गा.१००४.१२।। | पापपुण्य दोन्ही मजसवेंची असती। करणी माते थोर त्याची ते आहे चालती। उकलु केवीं होय होय तें सांग मजप्रती। बुझावी वो माझे माते ऐसी करी विनंति |
| ४६९८ | ।।ज्ञा.गा.१००४.१३।। | केली कर्में जरी तुवां न सांडिवो पाठी। कवण ते प्रकाशील हे विपरीत गोष्टी। उकलू केवीं होय तें सांग मजप्रती। जेणें मी दृढ होय ते बुद्धी देईं वो लाठी |
| ४६९९ | ।।ज्ञा.गा.१००४.१४।। | अनंत कर्में मातें घडलीं वो मज। तीं तव न संडिती ऐसें ज्ञान पैं तुज। तरी म्यां काय कीजे केवीं पावणें सहज। दुर्घट वाट आहे कैशानी निफजेल काज |
| ४७०० | ।।ज्ञा.गा.१००४.१५।। | उठी पुत्रा जाईं बाळा तीर्थे रे हिंड। साधु आणि संत जेथें असती बा उदंड। तयामाजीं आत्मज्ञानी जो कां न बोले वितंड। तो तूं गुरु करीं तो तुज बुझवील प्रचंड |
| ४७०१ | ।।ज्ञा.गा.१००४.१६।। | ज्ञानविज्ञान रे गुरुमुखें बुझसी। विचारुनी अनुभऊ आपेंआप जाणसी। जेणें जालें अनंत सिद्ध तें तूं कां रे नेणसी। हरिहर ब्रह्मादिक तेही ध्याती तयासी |
| ४७०२ | ।।ज्ञा.गा.१००४.१७।। | नव्हता बाळा नादबिंद तैं तूं रे सहज। तेथेंचि तूं होतासी ऐसें ज्ञान पैं तुज। तेथें तूं लीन होईं करीं आपुलें काज। संसार साभिमानें घेई तेथीचें व्याज |
| ४७०३ | ।।ज्ञा.गा.१००४.१८।। | उपजतां गर्भ अंधु जया नाहीं प्रकाशु। पूर्वी तो योगभ्रष्टु चुकवी गर्भवासु। गुरुवचनीं भजे पुत्रा परब्रह्मीं करी वासु। अमृत सेवी पारे झणीं होसी उदासु |
| ४७०४ | ।।ज्ञा.गा.१००४.१९।। | तुज ऐसें रत्न बाळा कवणें रे केलें। आणिक अनंत जीव चराचर भुतले। तेणें रे इच्छामात्रें क्षणामाजीं रचिलें। तें तूं रे नेणसीच येवढें कैसें चुकविलें |

| | | |
|---|---|---|
| ४७०५ | ।।ज्ञा.गा.१००४.२०।। | सांडी बाळा कामक्रोधु हा दुर्जन विचारु। जिहीं तुज अंतरविलें त्याचा करी का संहारु। गुरुचरणीं भजे पुत्रा तो तुज देईल विचारु। अविनाशपद पावशी मग तुज होईल निर्धारु |
| ४७०६ | ।।ज्ञा.गा.१००४.२१।। | सहज यम नेम गुरुकृपा रे करी। आसनें प्राणायामु प्रत्याहार उदरीं। धारणा होईल तुज मग ध्यान विचारी। समाधी होई पुत्रा तूं जाण निरंतरीं |
| ४७०७ | ।।ज्ञा.गा.१००४.२२।। | षड्चक्रा वेगळें रे तें जाणिजे कैसें। अनुभवें जाणसी रे तुज सहजे प्रकाशें। तैसा हा ज्ञानयोगु गुरुकृपा रे दिसे । अज्ञान निरसूनियां ज्ञान पैं समरसें |
| ४७०८ | ।।ज्ञा.गा.१००४.२३।। | अव्यक्त तिहीं लोकींचें तुजमाजीं रे असे। त्रैलोक्य जयामाजीं तैं तुज पैं दिसे । अविनाशपद होसी मग अज्ञान नासे। तुजमाजीं अमूर्त रे आपेंआप प्रकाशे |
| ४७०९ | ।।ज्ञा.गा.१००४.२४।। | अव्यक्त अगोचर तुज होईल निरंतर। इंद्रियें स्थिर होती हे तुझे अंकुर। अविनाशपद होसी मग नाहीं येरझार। अष्टमहासिद्धी जया वोळगती तुझें द्वार |
| ४७१० | ।।ज्ञा.गा.१००४.२५।। | ऋद्धिसिद्धि मायासिद्धी यासी दिधली। तुर्याचिया उपरी रे ज्ञान उन्मनी देखिली। आशापाश सबळ माया जीवबुद्धि निमाली। गर्भवास चुकला रे कैसी बुद्धी स्फुरली |
| ४७११ | ।।ज्ञा.गा.१००४.२६।। | संतोषोनी कृपादृष्टी ज्ञान पैं लाधविला। आत्मतत्त्व बोधु तुज प्रकाशु रे जाला। समरसीं सोहंसिद्धी प्रबोधु निमाला। निवृत्तिप्रसादें रे ज्ञानदेवो बोलिला |
| ४७१२ | ।।ज्ञा.गा.१००५.०१।। | ॐनमो भगवते वासुदेवाया। वोडियाणा बंदु घालुनि देहुडा लागसील पावो। ओतप्रोत सांडुनि मना तूं धरिसी अहंभावो। ॐकार बिंदूचा तूं न पवसी ठावो। वोळगे वोळगे वोळगे कृष्णद्वारावतीये रावो |
| ४७१३ | ।।ज्ञा.गा.१००५.०२।। | ॐनमो भगवते वासुदेवाय। द्वादशाक्षरी मंत्रु न जपसी काह्या |
| ४७१४ | ।।ज्ञा.गा.१००५.०३।। | नागिणि उत्साहें नवही द्वारें निरोधून। नाडित्रयामाजीं सुषुम्नासंचरण। न साधे हा मार्ग ऐसें बोलती मुनिजन। नरहरिचिंतनें अहर्निशीं मुक्तिस्थान |
| ४७१५ | ।।ज्ञा.गा.१००५.०४।। | मोडिसी करचरण तेणें पावसी अंत समो। मोहो तृष्णा न तुटे ब्रह्मविद्या केवीं गमो। मोठा हा अन्यावो जे हरिचरणीं नाहीं नमो। मोक्षाची चाड तरी मुकुंदीं मन रमो |
| ४७१६ | ।।ज्ञा.गा.१००५.०५।। | भांबावसीं झणें हें शरीर कर्दळीस्तंभ। भस्म कृमि विष्ठा उभें आहे तों सुशोभ। भाविता कीटकीं भृंगी जाली तिये क्रमियेलें नभ। भावें भक्ति सुलभ वोळगा वोळगा पद्मनाभ |
| ४७१७ | ।।ज्ञा.गा.१००५.०६।। | गति मती इंद्रियें जव आहेती समयोग। गणिता आयुष्य न पुरे जंव हें न वचे भंग। गमला हाचि योग जे अनुसरावा श्रीरंग। गरुडध्वजप्रसादें निस्तरिजे भवतरंग |

| | | |
|---|---|---|
| ४७१८ | ।।ज्ञा.गा.१००५.०७।। | वनीं सिंह वसतां गजीं मदु केवीं धरावा। वन्हिदग्धबीज त्यासी अंकुर केवीं फुटावा। वज्रपाणी कोपलिया गिरीं उदधि केवीं लंघावा। वदनीं हरिनाम उच्चारीं तेणें संसार केवीं भुंजावा |
| ४७१९ | ।।ज्ञा.गा.१००५.०८।। | तेज नयनींचा भानु जेणें तेजें मीनले ते। त्याचे मानसींचा चंद्रमा तो सिंपोते अमृतें। त्याचे नाभिकमळीं ब्रह्मा तेणें सृजिलीं सकळही भूतें। तें विराटस्वरूप ओळखावें विष्णुभक्तें |
| ४७२० | ।।ज्ञा.गा.१००५.०९।। | वाताघातें फुटे गगनीं मेघाचा मेळावा। वारिबिंदु पद्मिणिपत्रीं केवीं हो ठेवावा। वानराच्या हातीं चिंतामणी केवीं द्यावा। वासुदेव स्मरणें तोचि कल्मषा उठावा |
| ४७२१ | ।।ज्ञा.गा.१००५.१०।। | स्थूल सूक्ष्म भूतें चाळीतां हे परम हंसु। शूळपाणी देवोदेवी जयाचा रे अंशु। शुभाशुभ कर्मीं न करी नामाचा आळसु। सुखें निरंतरी ध्याई ध्याई हृषिकेशु |
| ४७२२ | ।।ज्ञा.गा.१००५.११।। | देव देऊनि उदार भक्तां देतो अमरपदें। देतां न म्हणे सानाथोर वैरियासी तेंचि दे। देहें सार्थक अंतीं वासुदेव आद्य छंदें। देखा अजामिळ उद्धरिला नामें येणें मुकुंदें |
| ४७२३ | ।।ज्ञा.गा.१००५.१२।। | वाडा सायासी मनुष्यजन्म पावावा। वियाला पुरुषार्थ तो कां वायां दवडावा। वाचामनें करुनी मुरारी वोळगावा। व्रतें एकादशी करुनी परलोक ठाकावा |
| ४७२४ | ।।ज्ञा.गा.१००५.१३।। | या धनाचा न धरी विश्वास जैशी तरुवर छाया। यातायाती न चुके तरी हे मग भोगिशील काह्या । या हरिभजनेंवीण तुझे जन्म जाते वायां। यालागीं वैकुंठनाथाच्या तूं चिंती पां रे पायां |
| ४७२५ | ।।ज्ञा.गा.१००५.१४।। | इहींच द्वादशाक्षरीं ध्रुव अढळ पद पावला। प्रल्हाद रक्षिला अग्निशस्त्रापासुनी जळा। बाप रखुमादेविवरु विठ्ठलु तुम्ही घ्या रे वेळोवेळां।तो कळिकाळापासुनी सोडवील अवलीला |
| ४७२६ | ।।ज्ञा.गा.१००६.०१।। | बाबा ममतानिशी अहंकार दाट। रामनामें वासुदेवीं वाट। गुरुकृपें वोळलें वैकुंठ। तेणें वासुदेवो दिसे प्रगट गा |
| ४७२७ | ।।ज्ञा.गा.१००६.०२।। | वासुदेव हरि वासुदेव हरि। रामकृष्ण हरि वासुदेवा |
| ४७२८ | ।।ज्ञा.गा.१००६.०३।। | आला पुंडलिक भक्तराज। तेणें केशव वोळला सहज। दिधलें विठ्ठलमंत्र बीज। तेणें जालें सर्व काज गा |
| ४७२९ | ।।ज्ञा.गा.१००६.०४।। | रामकृष्णवासुदेवें वैष्णव गाताती आघवें। दिंडी टाळ प्रेमभावें। वासुदेवीं मन सामावें गा |
| ४७३० | ।।ज्ञा.गा.१००६.०५।। | शांती क्षमा दया पुरी। वासुदेवो घरोघरीं। आनंदें वोसंडेल अंबरीं। प्रेमें डुले त्रिपुरारी गा |
| ४७३१ | ।।ज्ञा.गा.१००६.०६।। | वासुदेवीं ज्ञेय ज्ञान। ध्यानीं मनीं नारायण। वासुदेवो परिपूर्ण। कैसें क्षरलेंसें चैतन्य गा |
| ४७३२ | ।।ज्ञा.गा.१००६.०७।। | वासुदेवीं वाहूनि टाळी। पातकें गेलीं अंतराळीं। वासुदेवो वनमाळी। कीर्तन करूं ब्रह्ममेळीं गा |
| ४७३३ | ।।ज्ञा.गा.१००६.०८।। | ज्ञानदेवा वासुदेवीं। प्रीति पान्हा उजळी दिवी। टाळ चिपळी धरूनि जिवीं ध्यान मुद्रा महादेवीं गा |
| ४७३४ | ।।ज्ञा.गा.१००७.०१।। | घुळघुळा वाजती टाळ। झणझणां नाद रसाळ। उदो जाली पाहाली वेळ। उठा वाचे वदा गोपाळ |
| ४७३५ | ।।ज्ञा.गा.१००७.०२।। | कैसा वासुदेव बोलतो बोल। बाळापोटीं माय रिघेल। मेलें माणूस जीत उठवील। वेळ काळांतें ग्रासील |

| | | |
|---|---|---|
| ४७३६ | ।।ज्ञा.गा.१००७.०३।। | आतां ऐसेंचि अवघे जन। येतें जातें तयापासून। जगीं जग झालें जनार्दन। उदो प्रगटलें बिंबलें भान |
| ४७३७ | ।।ज्ञा.गा.१००७.०४।। | टाळटाळीं लोपला नाद। अंगोअंगीं मुराला छंद। भोग भोगितांचि आटला भोग। ज्ञान गिळूनि गावा गोविंद |
| ४७३८ | ।।ज्ञा.गा.१००७.०५।। | गांवा आंत बाहेरी हिंडे आळी। देवोदेविची केली चिपळी। चरण नसतां वाजे धुमाळी। ज्ञानदेवाची कांति सांवळी |
| ४७३९ | ।।ज्ञा.गा.१००८.०१।। | मृत्युलोका माझारी गा एक सद्गुरु साचारु। त्याचेनि गा दर्शनें तुटला हा संसारू। पांगुळा हस्तपाद देतो कृपाळु उदारु। यालागीं नांव त्याचे वेद न कळे पारु |
| ४७४० | ।।ज्ञा.गा.१००८.०२।। | धर्माचें वस्ती घर ठाकियलें वा आम्हीं। दान मागों ब्रह्म साचें नेघों द्वैत या उर्मी |
| ४७४१ | ।।ज्ञा.गा.१००८.०३।। | विश्रांती विजन आम्हां एक सद्गुरु दाता। सेवितां चरण त्याचे फिटली इंद्रियांची व्यथा। निमाली कल्पना आशा इळा परिसीं झगडतां। कैवल्य देह जालें उपरती देह अवस्था |
| ४७४२ | ।।ज्ञा.गा.१००८.०४।। | मन हें निमग्न जालें चरणस्पर्शे तत्त्वतां। ब्रह्माहंस्फूर्ति आधीं भावो उमटला उलथा। पांगुळलें गुह्य ज्ञान ब्रह्मरूपें तेथें कथा। अंध मग दृढ जालों निमाल्या विषयाच्या वार्ता |
| ४७४३ | ।।ज्ञा.गा.१००८.०५।। | ऋद्धिसिद्धि दास्य सख्य आपेआप वोळलीं। दान मान मंद बुद्धि ब्रह्मरूपें लीन झालीं। वोळली कामधेनु पंगु तनु वाळली। पांगळा जीवनमार्गु सतरावी हे वोळली |
| ४७४४ | ।।ज्ञा.गा.१००८.०६।। | पांगुळ मी कल्पनेचा पंगु जालों पैं मनें। वृत्ति हे हरपली एका सद्गुरुरूप ध्यानें। निवृत्तीसी कृपा आली शरण गेलों ध्येयध्यानें |
| ४७४५ | ।।ज्ञा.गा.१००९.०१।। | धर्म अर्थ काम मोक्ष दान मागें श्रीगुरु। हस्त पाद शरीर व्यथा पंगु झालों मी पुढारु। तिमिर आले पुढें मायामोहो अंधारु। तेणें मी जात होतों मग सहज भेटला सद्गुरु |
| ४७४६ | ।।ज्ञा.गा.१००९.०२।। | धर्म जागो सद्गुरु महिमा जेणें तुटे भवव्यथा। धर्म अर्थ काम मोक्ष तें मी नेघे वृथा |
| ४७४७ | ।।ज्ञा.गा.१००९.०३।। | एक नाम राम कृष्ण दान देई सद्गुरु। वेदशास्त्र मंथन केलें परी नव्हेचि पुढारु। शरण आलों निवृत्तिराया तोडीं माया मोहो संसारु। पाहतां इये त्रिभुवनीं तुजहूनी नाहीं उदारु |
| ४७४८ | ।।ज्ञा.गा.१००९.०४।। | ज्ञानेंसहित विज्ञान गिळी मी माझे पांगुळ। वृत्ति हे माझे ठायीं हृदयीं बुझे गोपाळ। शंख चक्र पद्म गदा ऐसा तूं दयाळ। बाप रखुमादेविवरें दान देऊनि केलें अढळ |
| ४७४९ | ।।ज्ञा.गा.१०१०.०१।। | पूर्वप्राप्ती दैवयोगें पंगु जालों मी अज्ञान। विषय बुंथी घेऊनियां त्याचें केलें पोषण। चालतां धर्म बापा विसरलों गुह्य ज्ञान। अवचटें गुरुमार्गें प्रगट ब्रह्मज्ञान |
| ४७५० | ।।ज्ञा.गा.१०१०.०२।। | दाते हो वेगें करा कृपाळुवा श्रीहरि। समता सर्व भावीं शांती क्षमा निर्धारीं। सुटेल विषयग्रंथी विहंगम आचारी |
| ४७५१ | ।।ज्ञा.गा.१०१०.०३।। | शरण रिघें सद्गुरु पायां पांग फिटेल पांचाचा। पांगुळलें आपेंआप हा निर्धारु पैं साचा। मनामाजीं रूप घाली मी माजीं तेथें कैंचा। हरपली देहबुद्धि एकाकार शिवाचा |

| | | |
|---|---|---|
| ४७५२ | ।।ज्ञा.गा.१०१०.०४।। | निजबोधें शुद्ध धवळायावरी आरूढ पैं गा। क्षीराब्धी बोध वाहे तेथें जाय पां वेगा। वासना माझी ऐसी करीं परिपूर्ण गंगा। नित्य हें ज्ञान घेई अद्वैत रूपलिंगा |
| ४७५३ | ।।ज्ञा.गा.१०१०.०५।। | पावन होशी आधीं पांग फिटेल जन्माचा। अंधपंग विषयग्रंथी पावन होशील साचा। पांडुरंग होसी आधीं फळ पीक जन्माचा। दुष्ट बुद्धि वेगीं टाकीं टाहो करी नामाचा |
| ४७५४ | ।।ज्ञा.गा.१०१०.०६।। | ज्ञानदेव पंगुपणें पांगुळली वासना। मुरालें ब्रह्मीं मन ज्ञेय ज्ञाता पुरातना। दृश्य हें लोपलें बापा परती नारायणा। निवृत्ति गुरु माझा लागो त्याच्या चरणा |
| ४७५५ | ।।ज्ञा.गा.१०११.०१।। | पूर्वजन्मीं पाप केलें तें म्यां बहु विस्तारलें। विषयसुख नाशिवंत सेवितां तिमिर कोंदलें। चौऱ्यांशी लक्ष योनी फिरतां दुःख भोगिलें। ज्ञानदृष्टि हारपली दोन्ही नेत्र आंधळे |
| ४७५६ | ।।ज्ञा.गा.१०११.०२।। | धर्म जागो सदैवांचा जे बा परउपकारी। आंधळ्या दृष्टि देतो त्याचें नाम मी उच्चारी |
| ४७५७ | ।।ज्ञा.गा.१०११.०३।। | संसार दुःखमूळ चहूंकडे इंगळ। विश्रांती नाहीं कोठें रात्रंदिवस तळमळ। कामक्रोध लोभ शुनीं पाठीं लागलीं ओढाळ। कवण शरण जाऊं आतां दृष्टि देईल निर्मळ |
| ४७५८ | ।।ज्ञा.गा.१०११.०४।। | मातापिता बंधु बहिणी कोणी न पवती निर्वाणीं। इष्टमित्रस्वजनसखे हे तो सुखाची मांडणी। एकला मी दुःख भोगी कुंभपाक जाचणी। तेथें कोणी सोडविना एका सद्गुरुवांचुनी |
| ४७५९ | ।।ज्ञा.गा.१०११.०५।। | साधुसंत मायबाप तिहीं मज केलें कृपादान। पंढरिये यात्रे नेलें घडलें चंद्रभागे स्नान। पुंडलिकें वैद्यराजें पूर्वीं साधिलें साधन। वैकुंठींचें मूळपीठ डोळां घातलें तें अंजन |
| ४७६० | ।।ज्ञा.गा.१०११.०६।। | कृष्णांजन एकवेळा डोळां घालितां अढळ। तिमिर दुःख गेलें फिटलें भ्रांती पडळ। श्रीगुरु निवृत्तिरायें मार्ग दाविला सोज्वळ। बाप रखुमादेविवरु विठ्ठल दिनाचा दयाळ |
| ४७६१ | ।।ज्ञा.गा.१०१२.०१।। | देवा तुज चुकलों गा। तेणें दृष्टि आलें पडळ। विषयग्रंथीं गुंतलोंसें तेणें होतसें विव्हळ। अंध मंद दृष्टि झाली। गिळूं पाहे हा काळ। अवचित दैवयोगें। निवृत्ति भेटला कृपाळ |
| ४७६२ | ।।ज्ञा.गा.१०१२.०२।। | धर्म जागो निवृत्तीचा। तेणें फेडिलें पडळ। ज्ञानाचा निजबोधु। विज्ञानरूप सकळ |
| ४७६३ | ।।ज्ञा.गा.१०१२.०३।। | तिहीं लोकीं विश्वरूप। दिव्य दृष्टि दिधली। द्वैत हें हरपलें। अद्वैतपणें माउली। उपदेश निजब्रह्म। ज्ञानांजन साउली। चिद्रूप दीप पाहे। तेथें तनुमनु निवाली |
| ४७६४ | ।।ज्ञा.गा.१०१२.०४।। | दान हेंचि आम्हां गोड। देहीं दृष्टि मुराली। देह हें हरपलें। विदेह वृत्ति स्फुरली। विज्ञान हें प्रगटलें। ज्ञेय ज्ञाता निमाली। दृश्य तें तदाकार ममता तेथें बुडाली |
| ४७६५ | ।।ज्ञा.गा.१०१२.०५।। | प्रपंचु हा नाहीं जाणा। एकाकार वृत्ति जाली। मी माझें हरपलें। विषयांध या बोली। उपरती सद्गुरु बोधु। तेथें प्रकृति संचली। शुद्ध धर्ममार्गें पंथ हातीं काठी दिधली |

| | | |
|---|---|---|
| ४७६६ | ।।ज्ञा.गा.१०१२.०६।। | वेदमार्गें मुनी गेले त्याची मार्गें चालिलों। न कळेचि विषय अंधा म्हणोनि उघड बोलिलों। चालतां धनुर्धरा। तरंगाकारी हरपलों। ज्ञानदेव निवृत्तीचा। द्वैत सर्व निरसलों |
| ४७६७ | ।।ज्ञा.गा.१०१३.०१।। | अंध पंगू दृढ जालों मायापडळ भ्रांती। करचरण विव्हळ गेले तंव भेटले निवृत्ति। ज्ञान मज उपदेशिलें नेलें अज्ञानक्षिती। वृक्ष एक तेथें होता त्या तळीं बैसविलें रीती |
| ४७६८ | ।।ज्ञा.गा.१०१३.०२।। | धर्म जागो निवृत्तीचा हरिनामें उत्सावो। कर्म धर्म लोपले माझे माझा फिटला संदेहो। धर्म अर्थ काम पूर्ण दान मान संमोहो। नेघे मी इंद्रियवृत्ति रामकृष्णनामीं टाहो |
| ४७६९ | ।।ज्ञा.गा.१०१३.०३।। | कल्पना मावळली कल्पवृक्षाचे तळवटीं। चिंता हे हरपली माझी नित्य अमृताची वाटी। मन हें निमग्न झालें वसे वैकुंठीं। तापत्रयें ताप गेले नाना दोषांचे थाटी |
| ४७७० | ।।ज्ञा.गा.१०१३.०४।। | अनंत हें मायामय लोपलें जिवाचिया साठीं। हरपल्या योनीमाळा चिंतामणी कसवटी। सिद्धि बुद्धि समरसल्या जीवशिव एकदाटी। आत्माराम मन जालें एकतत्त्व शेवटीं |
| ४७७१ | ।।ज्ञा.गा.१०१३.०५।। | आत्माराम निर्गमलें वेदशास्त्रगुह्यज्ञानें। वासनेचि मोहजाळी ते विराली नाना स्थानें। फुटले नाना घट तुटली नाना बंधनें। सुटल्या जीवग्रंथी ऐसें केलें त्या दानें |
| ४७७२ | ।।ज्ञा.गा.१०१३.०६।। | मोक्ष हे ठेले मार्गें मुक्तिमार्ग निमाला। वृत्ति हे बुडाली माझी निवृत्ति गळाला पाजीला। सत्रावी वोळली बाळा आत्माराम दाता जाला |
| ४७७३ | ।।ज्ञा.गा.१०१३.०७।। | बुद्धि बोध संवगडे साजीव करचरण। नयनीं नयन जाले चक्षु मी समाधान। दिव्य देह अमृत कळा दशदिशा परिधान। सर्व हें ब्रह्म जालें फळद फळलें विज्ञान |
| ४७७४ | ।।ज्ञा.गा.१०१३.०८।। | निवृत्ति गुरु माझा अंधपण फेडिलों। सर्वत्र दृष्टि जाली एकतत्त्वीं राहिलों। निरसली माया मोहो श्रीराम अंजन लेईलों। ज्ञानदेव ज्ञानगंगे निवृत्तीनें बुडविलों |
| ४७७५ | ।।ज्ञा.गा.१०१४.०१।। | आधीं चरे पाठीं प्रसवे। कैसी प्रतिदिनीं गाभासी जाये रे। विऊंनियां वांझ झाली रे। ती उन्हाळां मासां वोळली रे कान्हो |
| ४७७६ | ।।ज्ञा.गा.१०१४.०२।। | दुहतां पान्हा न संवरे रे। पैल पर्वता सुटले झरे रे कान्हो |
| ४७७७ | ।।ज्ञा.गा.१०१४.०३।। | मोहें चाटावयाच्या चाडा रे। दोहीं तयावरी पडे रे। वत्स देखोनी उफराटी उडे रे। तया केलिया तिन्ही वाडे रे कान्हो |
| ४७७८ | ।।ज्ञा.गा.१०१४.०४।। | तिहीं त्रिपुटी हे चरतां दिसे रे। तिहीं वाडियां वेगळी बैसे रे। ज्ञानदेव म्हणे गुरुतें पुसा रे। ते वोळतां लयलक्ष कैसें रे कान्हो |
| ४७७९ | ।।ज्ञा.गा.१०१५.०१।। | गायी तिचें निरंजनीं वाडे रे। तीसवें तिन्ही पाडे रे। तिनें दैत्य मारिले कुवाडें रे। गाईचें सांगतां बहुत पवाडे रे कान्हो |
| ४७८० | ।।ज्ञा.गा.१०१५.०२।। | ते सांग पां धेनु कवण रे। तिसी नाहीं तिन्ही गुण रे कान्हो |
| ४७८१ | ।।ज्ञा.गा.१०१५.०३।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलु रे। ते उभी पुंडलिकाचे द्वारीं रे कान्हो |
| ४७८२ | ।।ज्ञा.गा.१०१६.०१।। | तिहीं त्रिपुटी तिचे वाडे रे। सवालक्ष चरावया जाय रे। ते दैत्यापाठीं हुंबरत लागे रे। भक्ता घरीं दुभे सानुरागें रे कान्हो |

| | | |
|---|---|---|
| ४७८३ | ।।ज्ञा.गा.१०१६.०२।। | तिचें नाम शांभवी आहे रे। तिचि रूपरेखा ते काय रे कान्हो |
| ४७८४ | ।।ज्ञा.गा.१०१६.०३।। | येकी चौमुखी गाय पाहें रे। तिचा विस्तार बहु आहे रे। तिच्या नाभिकमळीं जन्म वासु सांगे रे। तिसी आदि पुरुष बापमाय रे कान्हो |
| ४७८५ | ।।ज्ञा.गा.१०१६.०४।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलु पाहीं रे। ते भक्तां ओळली आहे रे। तें दोहतां भरणा पोहे रे। चारी धारा वर्षत आहे रे कान्हो |
| ४७८६ | ।।ज्ञा.गा.१०१७.०१।। | काळी कोसी कपिला धेनु रे। तिचें दुभतें काय वानूं रे। तिसी बापमाय दोन्ही नाहीं रे। ते असक्रिया वेगळी पाहें रे कान्हो |
| ४७८७ | ।।ज्ञा.गा.१०१७.०२।। | ती अखरींच चरे रे। सर्वसाक्षी वरती जाय रे कान्हो |
| ४७८८ | ।।ज्ञा.गा.१०१७.०३।। | पैल येकी सहस्रमुखी रे। तिहींहूनी येकी आहे रे। तिचीं नांवें अनंत पाहें रे। तिसी बापमाय कोण रे कान्हो |
| ४७८९ | ।।ज्ञा.गा.१०१७.०४।। | बाप रखुमादेविवरीं विठ्ठलीं पाहे रे। ते पुंडलिकाचे द्वारीं जाय रे। तिचें दुभतें अपरंपार रे। तें दुभतें सहस्रधारी रे कान्हो |
| ४७९० | ।।ज्ञा.गा.१०१८.०१।। | आगरींचें क्षीर सागरीं पैल डोंगरीं दुभतें गाय रे। दोहो जाणे त्याचें दुभतें जेवित्याची मेली माय रे |
| ४७९१ | ।।ज्ञा.गा.१०१८.०२।। | कान्हो पाहालें रे कान्हो पाहालें रे नवल विपरीत कैसें। जाणत्या नेणत्या झांसा पैं चतुरा लागलें पिसें |
| ४७९२ | ।।ज्ञा.गा.१०१८.०३।। | पाणीयानें विस्तव पेटविला। वारियानें लाविली वाती। आपेंआप दीप प्रकाशला। तेथें न दिसे दिवस राती रे |
| ४७९३ | ।।ज्ञा.गा.१०१८.०४।। | खोकरीं आधन ठेविलें। तेथें न दिसे माझी भाक। इंधनावीण पेटविलें। तेथें चुली नाहीं राख |
| ४७९४ | ।।ज्ञा.गा.१०१८.०५।। | जाणत्या नेणत्या झांसा पैल चतुरा बोलिजे ह्याळीं। निवृत्तिप्रसादें ज्ञानदेव बोले ढिवर पडिलें जाळीं |
| ४७९५ | ।।ज्ञा.गा.१०१९.०१।। | साईखडियातें देखोनियां माते। तैसा संसारातें येत रया |
| ४७९६ | ।।ज्ञा.गा.१०१९.०२।। | सोय ध्यान उन्मनी पांचांची मिळणी। सत्रावीचे कानीं गोष्टी सांगे |
| ४७९७ | ।।ज्ञा.गा.१०१९.०३।। | दुभोनियां खडाणी नैश्वर्य ध्यान गगनीं। चेतलिया मन क्षीर देत |
| ४७९८ | ।।ज्ञा.गा.१०१९.०४।। | ज्ञानदेवीं समभाव त्रिगुणी नाहीं ठाव। आपेंआप राणीव साईखडिया |
| ४७९९ | ।।ज्ञा.गा.१०२०.०१।। | भवाब्धिसागरीं मांडिली टिपरी परी अनुहात वाजे गजरु वो। ताळक छंदें उमटती पद वरी टिपरे टिपरी गाजे वो |
| ४८०० | ।।ज्ञा.गा.१०२०.०२।। | टिपरिया घाई गोपाळ भाई। घुळुघुळु पाईं नादु वाजे वो |
| ४८०१ | ।।ज्ञा.गा.१०२०.०३।। | ताळकछंदें वेगु आल्हादें टिपरीनादें वाजती वो। सांडुनी ओहं धरिलें सोहं तयासी टिपरें साधली वो |
| ४८०२ | ।।ज्ञा.गा.१०२०.०४।। | औटहात भूमिका नीट तालछंदें टिपरी धरी वो। विरुळा जाणे एथींचे खुणें टिपरें वाजे शिरीं वो |
| ४८०३ | ।।ज्ञा.गा.१०२०.०५।। | एकटसंगें टिपरें वेगें ध्वनी गगनीं गाजे वो। बाप रखुमादेविवरु टिपरी गाजती घाई जाली टिपरियाजोगी वो |
| ४८०४ | ।।ज्ञा.गा.१०२१.०१।। | हमामा रे पोरा हमामा। घुमरी वाजे घुमामा |
| ४८०५ | ।।ज्ञा.गा.१०२१.०२।। | घुमरीचा नाद कानीं। घुमरी घालूं रानीं। रानीं सीतळ छाया। मेली तुझी माया। मायेचें घर दुरी। तुज मज कैंची उरी रे पोरा |
| ४८०६ | ।।ज्ञा.गा.१०२१.०३।। | उरी नाहीं तुज। मजसी मांडिलें जुंझ। जुंझी अहंकार ढळे। कल्पना समूळ गळे। गळतां गळतां पाहिली। कान्होबा चरणीं राहिली। कान्होबा पाहे दिठीं। तुज मज पडिली मिठी रे पोरा |

| | | |
|---|---|---|
| ४८०७ | ।।ज्ञा.गा.१०२१.०४।। | मिठी मिठी करी पाहासी। आतां कोठें राहसी। राहतां ठावो येकु। फटी तो तुझा लेकु। लेकु गाई राखे। बाप गोरसु चाखे। चाखतां घेतली गोडी। तोचि फांसा तोडीं रे पोरा |
| ४८०८ | ।।ज्ञा.गा.१०२१.०५।। | पोरा ऐक माझी गोठी। राग धरी न पोटीं। रागें काम नासे। अहंकारें बोचा वासे। वासिले रावणें डोळे। भेणें द्वैत कंस पळे। पळतां पळतां लागला पाठीं। तुज मज आतां गाठी रे पोरा |
| ४८०९ | ।।ज्ञा.गा.१०२१.०६।। | पोरा गोठी करी ऐसी। संतांसी मानेल तैसी। बाप रखुमादेविवरु ध्यासी। तरी वारिल्या गांवा जासी रे पोरा |
| ४८१० | ।।ज्ञा.गा.१०२२.०१।। | हमामा घाली बाळा। सांडी खोटा चाळा। फोडीन तुझा टाळा। वाकुल्या दावीन काळा |
| ४८११ | ।।ज्ञा.गा.१०२२.०२।। | हमामा रे पोरा हमामा रे |
| ४८१२ | ।।ज्ञा.गा.१०२२.०३।। | हमामा घालीं बा रे। अंगीं भरलें वारें। चाखतीं पिकलीं चारें। जाऊं वरिल्या द्वारें रे पोरा |
| ४८१३ | ।।ज्ञा.गा.१०२२.०४।। | हमामा घालीं नेटें। सांडीं बोलणें खोटें। आतां जासील कोठें। कान्होबाचें बळ मोठें रे पोरा |
| ४८१४ | ।।ज्ञा.गा.१०२२.०५।। | हमामा घालीं सोई। सांभाळीं सवा दोहीं एक नेमें तूं राहीं। तेथें बहु सुख पाहीं रे पोरा |
| ४८१५ | ।।ज्ञा.गा.१०२२.०६।। | हमामियाचा नादु वाजे। अनुहातें कोपर गाजे। बाप रखुमादेविवरु विठ्ठलु राजे। रत्नजडित मुगुट साजे रे पोरा |
| ४८१६ | ।।ज्ञा.गा.१०२३.०१।। | फुगडी फू गे बाई फुगडी फू। निजब्रह्म तूं गे बाई परब्रह्म तूं गे |
| ४८१७ | ।।ज्ञा.गा.१०२३.०२।। | मन चित्त धू। विषयावर थू |
| ४८१८ | ।।ज्ञा.गा.१०२३.०३।। | एक नाम मांडी। दुजा भाव सांडी |
| ४८१९ | ।।ज्ञा.गा.१०२३.०४।। | हरि आला रंगीं। सज्जनाचे संगीं |
| ४८२० | ।।ज्ञा.गा.१०२३.०५।। | सकळ पाहें हरि। तोचि चित्तीं धरीं |
| ४८२१ | ।।ज्ञा.गा.१०२३.०६।। | नमन ललाटीं। संसारेसी साटीं |
| ४८२२ | ।।ज्ञा.गा.१०२३.०७।। | वाम दक्षिण। चहूंभुजीं आलिंगन |
| ४८२३ | ।।ज्ञा.गा.१०२३.०८।। | ज्ञानदेवा गोडी। केली संसारा फुगडी |
| ४८२४ | ।।ज्ञा.गा.१०२४.०१।। | आकारेंवीण पाळणा पहुडलें। निराकार म्हणोनी वोसणाईलें |
| ४८२५ | ।।ज्ञा.गा.१०२४.०२।। | जो जो जो बाळा निराकार पाळणा। व्योमीं व्योमाकारीं झोंप घेई |
| ४८२६ | ।।ज्ञा.गा.१०२४.०३।। | चौदा नि:शब्दीं जागृत केलें। एकवीसीं हालवुनी बाळ उठविलें |
| ४८२७ | ।।ज्ञा.गा.१०२४.०४।। | बाप रखुमादेविवरु निजीं निजविलें। कांहीं नव्हे ऐसें कांहीं ना केलें |
| ४८२८ | ।।ज्ञा.गा.१०२५.०१।। | पाळण्याची परी सांगेन आतां। पाळण्या सान्हुलें देहेंवीण बोभातें ताता |
| ४८२९ | ।।ज्ञा.गा.१०२५.०२।। | तेथें जनकु नव्हे जननी नव्हे। बाळक नवे होये माझेवीण |
| ४८३० | ।।ज्ञा.गा.१०२५.०३।। | तेथें तेल सारुनी अभ्यंग केला। बाळक पुसिला अंबरवर्णे |

| | | |
|---|---|---|
| ४८३१ | ।।ज्ञा.गा.१०२५.०४।। | बाप रखुमादेविवरु अनुभवीत झाले। ते निजरूप पावलें परब्रह्मीं |
| ४८३२ | ।।ज्ञा.गा.१०२६.०१।। | अठरा दिगांतीहुनी पाळणा आणिला। तेथें एक निर्गुण बाळ पहुडला |
| ४८३३ | ।।ज्ञा.गा.१०२६.०२।। | बाळापें हें नाहीं बाळापें हें नाहीं। अंगुष्ठ पिउनी घेई निरालंबी |
| ४८३४ | ।।ज्ञा.गा.१०२६.०३।। | निरालंबी सादू आळवी ब्रह्मीं। तेथें एकु बाळ बोभाये निरंजनीं |
| ४८३५ | ।।ज्ञा.गा.१०२६.०४।। | बाप रखुमादेविवरु आदि अंतीं। त्याहुनी परती मज गती केली |
| ४८३६ | ।।ज्ञा.गा.१०२७.०१।। | पांच पाट्या नव खिडकिया। पाळणा पहुडाया निरंजनीं |
| ४८३७ | ।।ज्ञा.गा.१०२७.०२।। | एकवीस सहस्र श्वास हुंकार घाली। माया ते मारिली ज्ञानरूपी |
| ४८३८ | ।।ज्ञा.गा.१०२७.०३।। | तेथें निरंजन नाहीं कांहींचि नाहीं। तेथें नि:शब्द उठती पाहीं |
| ४८३९ | ।।ज्ञा.गा.१०२७.०४।। | बाप रखुमादेविवरु बाळका घेउनी गेला। मरोनियां झाला जितपणें गे माये |
| ४८४० | ।।ज्ञा.गा.१०२८.०१।। | शून्य नाहीं निरशून्य नाहीं। तेथें पाळणा पाही लावियेला |
| ४८४१ | ।।ज्ञा.गा.१०२८.०२।। | जातिवीण बाळ उपजलें पाहीं। तेथें परिये देते माय तेही नाहीं |
| ४८४२ | ।।ज्ञा.गा.१०२८.०३।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलीं पाळणा नाहीं। तेथें मी बाळ पाहीं पहुडलों |
| ४८४३ | ।।ज्ञा.गा.१०२९.०१।। | जालोनी पाईकें गोवीपण जिंकें। परी स्वामीया सेवक साचा होय। एक एकेविणें स्वामी सेवकपण। मिरविती हे खूण स्वामी जाणे |
| ४८४४ | ।।ज्ञा.गा.१०२९.०२।। | पाईक काय स्वामी स्वामीया काय पाईक। असतां एके एक दोन्ही नव्हती |
| ४८४५ | ।।ज्ञा.गा.१०२९.०३।। | स्वामीचें काज पाईकपणें वोज। करिसां होय चोज पैं गा। बाप रखुमादेविवरा विठ्ठलासी वोळगतां। पाईका स्वामी असतां निवृत्ति ऐसा |
| ४८४६ | ।।ज्ञा.गा.१०३०.०१।। | पाईका मोल नाहीं देशील तें काई। पाईक न मागें कांहीं भोगजात |
| ४८४७ | ।।ज्ञा.गा.१०३०.०२।। | देशील तें काई न देशील तें काई। पाईक न मागें कांहीं तुजवांचोनी |
| ४८४८ | ।।ज्ञा.गा.१०३०.०३।। | बाप रखुमादेविवर विठ्ठलाच्या पायीं। पाईका मोल नाहीं तैसें जालें |
| ४८४९ | ।।ज्ञा.गा.१०३१.०१।। | आणिक पाईक मोलाचे तुझे। तैसें नव्हे माझें पाईकपण |
| ४८५० | ।।ज्ञा.गा.१०३१.०२।। | न मगे वही मोल जीवन भातें। तें द्यावें मातें पाईकपण |
| ४८५१ | ।।ज्ञा.गा.१०३१.०३।। | बाप रखुमादेविवरा गोसांविया। पाईकपण मी पायां जोडलेती |
| ४८५२ | ।।ज्ञा.गा.१०३२.०१।। | देह दंडुनी पाईक अनुसरला जीवें। तव स्वामियाचें गूज हातासी आलें |
| ४८५३ | ।।ज्ञा.गा.१०३२.०२।। | पाईकपणें गेलें स्वामी होउनी ठेलें। परी नाहीं विसरलें स्वामियातें |
| ४८५४ | ।।ज्ञा.गा.१०३२.०३।। | पाईकपण ऐसा आठवुचि नाहीं। स्वामीवांचुनी कांहीं जाणेचीना |

| | | |
|---|---|---|
| ४८५५ | ।।ज्ञा.गा.१०३२.०४।। | बाप रखुमादेविवरु विठोजी उदारु। पाईक तो साचारु स्वामी केला |
| ४८५६ | ।।ज्ञा.गा.१०३३.०१।। | जागतां नीज आलें असे हातां। मग पाईक म्हणविता लाज वाटे। नव्हे कोणाजोगा नाईकें म्हणितलें। उणेपणें आलें पाईकपणा |
| ४८५७ | ।।ज्ञा.गा.१०३३.०२।। | पाईक शुद्धमति स्वामीया विवेकी। वेव्हारु लौकिकीं चाळीतु असे |
| ४८५८ | ।।ज्ञा.गा.१०३३.०३।। | निदसुरा होता तो जागसुदा जाला। स्वामियें आणिला आपणांपाशीं |
| ४८५९ | ।।ज्ञा.गा.१०३३.०४।। | पाईकपणें गेलें सन्निधान जालें। स्वामी एका बोलें निवांत ठेला |
| ४८६० | ।।ज्ञा.गा.१०३३.०५।। | मागावें तितुकें खुंटलें तेथें। न मागतां आपणांतें जाणितलें। बाप रखुमादेविवरा विठ्ठला प्रसादें। पाईक परी अभेदें उरला असे |
| ४८६१ | ।।ज्ञा.गा.१०३४.०१।। | आठवितां नुपरे मोविता न मोववे। सांगतां न सांगवे गुण त्याचे |
| ४८६२ | ।।ज्ञा.गा.१०३४.०२।। | परतलिया दृष्टि काळा देखिला जगजेठी। वेणिभागीं पृष्ठीं कैसा दिसतु असे |
| ४८६३ | ।।ज्ञा.गा.१०३४.०३।। | त्या गुणाच्या संगें कैसें अद्वैत जालें। मन म्हणोनी काळेपण बहु झालें गे माय |
| ४८६४ | ।।ज्ञा.गा.१०३४.०४।। | पुरे पुरे बुद्धि निमाली वेदवाणी। आतां केवीं वर्णूं चक्रपाणी बहु काळें गे माय |
| ४८६५ | ।।ज्ञा.गा.१०३४.०५।। | द्वादश मंडळें वोवाळुनी आलिये। तंव तंव काळें देखिलें रूपडें त्याचें |
| ४८६६ | ।।ज्ञा.गा.१०३४.०६।। | अनुमाना नये अनुमाना नये। परतल्या श्रुति चोजवेना |
| ४८६७ | ।।ज्ञा.गा.१०३४.०७।। | मनें बुडी दिधली दाही हारपली। चोवीस मावळलीं अगाध पंथीं |
| ४८६८ | ।।ज्ञा.गा.१०३४.०८।। | प्रीतीचें पांघरूण काळें घोंगडें। रखुमादेविवरें विठ्ठलें मज केलें उघडें |
| ४८६९ | ।।ज्ञा.गा.१०३५.०१।। | रात्री दिवस वाहातसे चिंता। केशव धडौता होईन मी |
| ४८७० | ।।ज्ञा.गा.१०३५.०२।। | खिरजट घोंगडें फाटकें तें कैसें। वेचिलें कैसें भोगिजे गा |
| ४८७१ | ।।ज्ञा.गा.१०३५.०३।। | वित्त नाहीं गाठी जीवित्वा आटी। उघडी पाठी हींव वाजे |
| ४८७२ | ।।ज्ञा.गा.१०३५.०४।। | घोंगडें देईल तो एक दाता। रखुमादेविवरा मागों रे आतां |
| ४८७३ | ।।ज्ञा.गा.१०३६.०१।। | तुझें घोंगडें ऐकची चोख। दुजे वोळख अमंगळ |
| ४८७४ | ।।ज्ञा.गा.१०३६.०२।। | दे धडुत न घोंगडें मोठें । खिरपटें जळो देवा |
| ४८७५ | ।।ज्ञा.गा.१०३६.०३।। | रखुमादेविवरु उदार जाला। धडौता केला ज्ञानदेवो |
| ४८७६ | ।।ज्ञा.गा.१०३७.०१।। | चौऱ्यांशीं लक्ष हिंडतां हाट। पुंजे दाट सांपडलें |
| ४८७७ | ।।ज्ञा.गा.१०३७.०२।। | हित ये खेपेसी बरवें जालें। सुरंग घोंगडें हाताशीं आलें |
| ४८७८ | ।।ज्ञा.गा.१०३७.०३।। | येणें पाडें न माये कोठें। घोंगडें मोठें सांपडलें |
| ४८७९ | ।।ज्ञा.गा.१०३७.०४।। | मनोरथ पुरले रे आतां। बाप रखुमादेविवरा विठ्ठलाशीं ध्यातां |
| ४८८० | ।।ज्ञा.गा.१०३८.०१।। | माझिया घोंगडियावरी ब्रह्माचा गोंडा। बाहिरी सांडा बैसावया |

| | | |
|---|---|---|
| ४८८१ | ।।ज्ञा.गा.१०३८.०२।। | संतचरणीं रुळें श्रीरंगीं रंगलें। व्योमाकार मिरवले तेंचि देखे |
| ४८८२ | ।।ज्ञा.गा.१०३८.०३।। | रखुमादेविवरें विठ्ठलें दिधलें। अमोलिक जालें मोलेंवीण |
| ४८८३ | ।।ज्ञा.गा.१०३९.०१।। | घोंगडी घेऊनि हाटासि जाये। पंढरिये आहे वस्ती आम्हां |
| ४८८४ | ।।ज्ञा.गा.१०३९.०२।। | घोंगडियाचें मोल पैं जालें। चरणीं राहिलें विठ्ठलाचे |
| ४८८५ | ।।ज्ञा.गा.१०३९.०३।। | घोंगडें येक बैसलें थडी। उभयां गोडी विठ्ठलाची |
| ४८८६ | ।।ज्ञा.गा.१०३९.०४।। | ज्ञानदेव म्हणे अनुभवी तो जाणे। शहाणे ये खुणें संतोषले |
| ४८८७ | ।।ज्ञा.गा.१०४०.०१।। | काळें ना सावळें धवळें ना पिवळें। घोंगडें निराळें लाधलों मी |
| ४८८८ | ।।ज्ञा.गा.१०४०.०२।। | मागील रगटें झाडिलें आतां। पंढरीनाथा चरणाजवळीं |
| ४८८९ | ।।ज्ञा.गा.१०४०.०३।। | नवें नवघड हातां आलें। दृष्टी पाहें तंव मन हारपलें |
| ४८९० | ।।ज्ञा.गा.१०४०.०४।। | सहस्र फुलीवरी गोंडा थोरु। धडुतें दावी रखुमादेविवरु |
| ४८९१ | ।।ज्ञा.गा.१०४१.०१।। | निरालंब घोंगडें अद्वैत पेठे। तेथ एक भेटे रूपेंवीण |
| ४८९२ | ।।ज्ञा.गा.१०४१.०२।। | हिरोनि घेतलें हिरोनि घेतलें। मज पैं दिधलें दोषेंवीण |
| ४८९३ | ।।ज्ञा.गा.१०४१.०३।। | रखुमादेविवरें कामाण केलें। अपकारेंविण उघडें नागविलें |
| ४८९४ | ।।ज्ञा.गा.१०४२.०१।। | अद्वैत पेठेहुनी घोंगडें आणिलें। अमोलिक घेतलें पंढरिये |
| ४८९५ | ।।ज्ञा.गा.१०४२.०२।। | चौ हातांची भरणी आली। तिये चराचरीं ऐसें नाहीं |
| ४८९६ | ।।ज्ञा.गा.१०४२.०३।। | रखुमादेविवरु विठ्ठलीं नीट। पांघुरविलें वैकुंठ मज देखा |
| ४८९७ | ।।ज्ञा.गा.१०४३.०१।। | माझें चवाळें रंगाचें बहुतें। श्रीगुरुनिवृत्तिनाथें दिधलें गे माय |
| ४८९८ | ।।ज्ञा.गा.१०४३.०२।। | चवाळें शुद्ध चहू पालवी। व्योमाकारें वेद प्रसिद्ध पांघुरवी |
| ४८९९ | ।।ज्ञा.गा.१०४३.०३।। | आतां पराहूनि परमेचूचें। बाप रखुमादेविवरा विठ्ठला अंगीचें |
| ४९०० | ।।ज्ञा.गा.१०४४.०१।। | निरंजना गाई चारूं गेलों। तंव चवाळें तेथें एक पावलों |
| ४९०१ | ।।ज्ञा.गा.१०४४.०२।। | मज निर्गुणें आड वारिलें। चवाळें हिरोनि जिणें बुडविलें |
| ४९०२ | ।।ज्ञा.गा.१०४४.०३।। | बाप रखुमादेविवरें इतुकें केलें। माझें चवाळें हिरोनि नेलें गे माय |
| ४९०३ | ।।ज्ञा.गा.१०४५.०१।। | ब्रह्माचा गोंडा चहू पावला। मन पांघुरे उमप भावा |
| ४९०४ | ।।ज्ञा.गा.१०४५.०२।। | चौ हातांहून आगळें। द्विकारांहूनि वेगळें गे माये |
| ४९०५ | ।।ज्ञा.गा.१०४५.०३।। | बाप रखुमादेविवरें सुभटे। मज चवाळें दिधलें गोमटें गे माये |
| ४९०६ | ।।ज्ञा.गा.१०४६.०१।। | चवाळ्याची सांगेन मातु। चवाळें पांघुरे पंढरीनाथु |

| | | |
|---|---|---|
| ४९०७ | ।।ज्ञा.गा.१०४६.०२।। | गोधनें चारितां हरि पांघुरला। मज चवाळ्याचा त्यागु पैं दिधला |
| ४९०८ | ।।ज्ञा.गा.१०४६.०३।। | बाप रखुमादेविवरु श्रीगुरुराणा। चवाळें पांघुरवी निरंजना गे माय |
| ४९०९ | ।।ज्ञा.गा.१०४७.०१।। | निर्गुण चवाळें आणिलें। बापनिवृत्तीनें मज पांघुरविलें |
| ४९१० | ।।ज्ञा.गा.१०४७.०२।। | चौघे चार्‍ही पदर म्हणीतले। पांघरूण झालें सारासार |
| ४९११ | ।।ज्ञा.गा.१०४७.०३।। | बाप रखुमादेविवरें विठ्ठलें। माझें चोरुनी जिणें उघडें केलें गे माय |
| ४९१२ | ।।ज्ञा.गा.१०४८.०१।। | तूं माझा स्वामी मी तुझा रंक। पाहतां न दिसे वेगळिक |
| ४९१३ | ।।ज्ञा.गा.१०४८.०२।। | मीतूंपण जाऊं दे दुरी। एकचि घोंगडें पांघरूं हरि |
| ४९१४ | ।।ज्ञा.गा.१०४८.०३।। | रखुमादेविवरा विठ्ठलुराया। लागेन पायां वेळोवेळां |
| ४९१५ | ।।ज्ञा.गा.१०४९.०१।। | जायाची घोंगडी नव्हती निज। म्हणउनी तुज विनवितसे |
| ४९१६ | ।।ज्ञा.गा.१०४९.०२।। | एक पाहतां दुसरें गेलें। तिसरें झालें नेणों काय |
| ४९१७ | ।।ज्ञा.गा.१०४९.०३।। | चौथें घोंगडें तेंही नाहीं। रखुमादेविवरा विठ्ठला पायीं |
| ४९१८ | ।।ज्ञा.गा.१०५०.०१।। | कान्होबा तुझी घोंगडी चांगली रे। आम्हांशी कां दिली वांगली रे |
| ४९१९ | ।।ज्ञा.गा.१०५०.०२।। | स्वगत सच्चिदानंदें मिळोनी शुद्धसत्त्वगुण विणली रे। षड्गुण गोंडे रत्नजडित तुज श्यामसुंदरा शोभली रे |
| ४९२० | ।।ज्ञा.गा.१०५०.०३।। | काम कर्म अविद्या त्रिगुण पंचभुतांनीं विणली रे। रक्त रेत दुर्गंधी जंतु नरक मुतानें भरली रे |
| ४९२१ | ।।ज्ञा.गा.१०५०.०४।। | षड्विकार षड्वैरी मिळोनी तापत्रयानें विणली रे। नवा ठायीं फाटुनी गेली ती त्वां आम्हांसी दिधली रे |
| ४९२२ | ।।ज्ञा.गा.१०५०.०५।। | ऋषि मुनि ध्यातां मुखीं नाम गातां संदेह वृत्ति विरली रे। बाप रखुमादेविवरु विठ्ठलें त्वत्पदीं वृत्ति मुरली रे |
| ४९२३ | ।।ज्ञा.गा.१०५१.०१।। | सभा समस्त साधुसंतांची। महामुनी विरक्तांची। पंडित पाठक ज्ञानियांची। समस्तांची विनवणी |
| ४९२४ | ।।ज्ञा.गा.१०५१.०२।। | या पहिलिया पाहार्‍यांत डौरकार सांगेल मात। समस्त रिझाल तुम्ही संत। ऐका निवांत तुम्ही सर्व |
| ४९२५ | ।।ज्ञा.गा.१०५१.०३।। | आतां परिसा पांच नाद। पांच नादाचे पांच भेद। पहिला नाद चटपट चटपट। दुसरा खटपट खटपट। तिसरा लटपट लटपट। चौथा फटफट फटफट। पांचवा तळमळ तळमळ |
| ४९२६ | ।।ज्ञा.गा.१०५१.०४।। | पहिला नाद चटपट चटपट। शिखासूत्र त्यजुनी सपाट। विरजा होमिला दृष्ट। परी अपुट तैसाची |
| ४९२७ | ।।ज्ञा.गा.१०५१.०५।। | वायां केली तडातोडी। वृथा त्यजिली सूत्र शेंडी। परी विषयवासना न सोडी। उपाधी गाडी श्रीपादा |
| ४९२८ | ।।ज्ञा.गा.१०५१.०६।। | संन्यास घेउनी कांचा। जिव्हा शिश्न वेधलें लांचा। विटंबु केला बापुडे कायेचा। चटपट चटपट मनींचे मनीं वसे गा दादेनो |
| ४९२९ | ।।ज्ञा.गा.१०५१.०७।। | खटपट खटपट। शास्त्रप्रज्ञा अलोट। बांधोनी विपत्तीची मोट। सैरा सुनाट धांवती |
| ४९३० | ।।ज्ञा.गा.१०५१.०८।। | वादतर्का लागीं धावे। भरला विषयाचे हावें। वरिवरि वृंदावन दिसे बरवें। परी अंतरीं कडुवट गा दादेनो |
| ४९३१ | ।।ज्ञा.गा.१०५१.०९।। | लटपट लटपट। मेळवुनी शिष्यांचा थाट। अद्वैत ज्ञानाचा बोभाट। भरिला हाट जिविकेसी |

| | | |
|---|---|---|
| ४९३२ | ।।ज्ञा.गा.१०५१.१०।। | गुरु लोभी धनमान। शिष्य लोभी अति दीन। दोघांसी लटपट लागली पूर्ण। कोणी कोणासी आवरेना |
| ४९३३ | ।।ज्ञा.गा.१०५१.११।। | ब्रह्मज्ञान जाहलें वोस। पहिले दु:खाचे दिवस। अंतीं जाले कासावीस। कामपाश समंध गा दादेनो |
| ४९३४ | ।।ज्ञा.गा.१०५१.१२।। | आतां फटफट फटफट। या नादाची गोठ नीट। वोळगोनी औटपीठ। उर्ध्व पाठ भेदती |
| ४९३५ | ।।ज्ञा.गा.१०५१.१३।। | मन पवन समरसोनी। ब्रह्मरंध्रीं लीन होउनी। हा अभिमान वाहोनी। जालेपणीं फुंजती |
| ४९३६ | ।।ज्ञा.गा.१०५१.१४।। | तें वोखटें गा डौरकारा। करोनी देहाचा मातेरा। भरूं पाहाती सुषुम्ना द्वारां। परी असाध्य खरा तो मार्गु |
| ४९३७ | ।।ज्ञा.गा.१०५१.१५।। | ऐसी जालिया ब्रह्मप्राप्ती। शिणतांच अहोरात्रीं। अंतीं विरोध भगवद्भक्ती। यालागीं बोलती फटफट गा दादेनो |
| ४९३८ | ।।ज्ञा.गा.१०५१.१६।। | आतां तळमळ। धरणींपारणीं हळाहळ। तीर्थयात्रे लागीं चळपळ। घेतलें बळ तपाचें |
| ४९३९ | ।।ज्ञा.गा.१०५१.१७।। | जपध्यान मंत्रावली। नाना दैवतें आराधिलीं। शेखीं काळें नरडी चेपिली। दु:खें तळमळी या हेतु |
| ४९४० | ।।ज्ञा.गा.१०५१.१८।। | ऐसे भेद नादाचे। मनीं धरा विवेकाचे। ज्ञानदेव बोले निवृत्तीचे। बोला वाचे हरिनाम गा दादेनो |
| ४९४१ | ।।ज्ञा.गा.१०५२.०१।। | जोहार मायबाप जोहार। मी कृष्णाजी घरचा पाडेवार। त्याचे घरांतला सर्व कारभार माझे शिरावर कीं जी मायबाप |
| ४९४२ | ।।ज्ञा.गा.१०५२.०२।। | कामाजी बाजी हुद्देदार। तेणें रयतेचा केला मार। रयत फार नागविली कीं जी मायबाप |
| ४९४३ | ।।ज्ञा.गा.१०५२.०३।। | क्रोधाजी बाबा शेखदार झाले। त्याजकडे हुजूरचें काम आलें। तेणें कामाजीचें छळण केलें कीं जी मायबाप |
| ४९४४ | ।।ज्ञा.गा.१०५२.०४।। | मनाजी बाजी यानें फितुर केला। तेणें करोनी मोठा बखेडा झाला। गांव सगळा नाशिला कीं जी मायबाप |
| ४९४५ | ।।ज्ञा.गा.१०५२.०५।। | बुधाजी पाटील कायापूरचे। ममताईचे हाताखालचे। त्यांत जिवाजी भुलले कीं जी मायबाप |
| ४९४६ | ।।ज्ञा.गा.१०५२.०६।। | या उभयतांचा विचार वागला। त्यामुळें आम्हांस राग आला। बुधाजी आवरीं आपल्या पोराला कीं जी मायबाप |
| ४९४७ | ।।ज्ञा.गा.१०५२.०७।। | सद्गुरुचा मी पाडेवार। निवृत्तीसी असे माझा जोहार। ज्ञानदेवा सफळ संसार झाला कीं जी मायबाप |
| ४९४८ | ।।ज्ञा.गा.१०५३.०१।। | प्रेमडोहीं मन। जालें मनाचें उन्मन। उपरती धरिलें ध्यान। झालें ज्ञान परब्रह्मीं |
| ४९४९ | ।।ज्ञा.गा.१०५३.०२।। | निमिषा निमिष छंद माझा। बाळछंदो हा तुझा। वेगीं येईं गरुडध्वजा। पसरूनियां भूजा देईं क्षेम |
| ४९५० | ।।ज्ञा.गा.१०५३.०३।। | तुटली आशेची सांगडी। ध्यानें नेलें पैल तडी। सुटली संसाराची बेडी। क्षणु घडी रिती नाहीं |
| ४९५१ | ।।ज्ञा.गा.१०५३.०४।। | नाठवे द्वैताची भावना। अद्वैतीं न वसे ध्याना। दिननिशींची रचना। काळगणना छंदें गिळी |
| ४९५२ | ।।ज्ञा.गा.१०५३.०५।। | जप तप वृत्तिसहित। निवृत्ति होईन निश्चित। समाधी बैसेन एकतत्त्व। मुखीं मात नामाची |
| ४९५३ | ।।ज्ञा.गा.१०५३.०६।। | ज्ञानदेवीं छंद ऐसा। बाळछंद झाला पिसा। दान मागतसे महेशा। दशदिशा न घाली मन |
| ४९५४ | ।।ज्ञा.गा.१०५४.०१।। | अलक्षलक्षीं मी लक्षीं। तेथें दिसती दोही पक्षी। वेद शास्त्रां हेचि साक्षी। चंद्रसूर्यासहित |
| ४९५५ | ।।ज्ञा.गा.१०५४.०२।। | मागेन स्वानुभव अंगुलें। पांचां तत्त्वांचें सानुलें। व्यर्थ इंद्रियें भोगिलें। नाहीं रंगलें संतचरणीं |
| ४९५६ | ।।ज्ञा.गा.१०५४.०३।। | बाळछंदो बाबा बाळछंदो। रामकृष्ण नित्य उदो। हृदयकळिके भाव भेदो। वृत्तिसहित शरीर निंदो। नित्य उदो तुझाची |
| ४९५७ | ।।ज्ञा.गा.१०५४.०४।। | क्षीरसिंधुहि दुहिला। चतुर्दशरत्नीं भरला। नेघे तेथील साउला। मज अबोला प्रपंचेसी |

| | | |
|---|---|---|
| ४९५८ | ।।ज्ञा.गा.१०५४.०५।। | दान दे गा उदारश्रेष्ठा। परब्रह्म तूं वैकुंठा। मुक्तिमार्गीचा चोहटा। फुकटा नेघे तया |
| ४९५९ | ।।ज्ञा.गा.१०५४.०६।। | पृथ्वीतळ राज्यमद। मी नेघे नेणें हेंही पद। रामकृष्ण वाचे गोविंद। हाचि छंद तुझ्या पंथें |
| ४९६० | ।।ज्ञा.गा.१०५४.०७।। | मंत्रतीर्थयज्ञयाग। या न करी भागाभाग। तूंचि होऊनि सर्वांग। सर्व संग मज देई |
| ४९६१ | ।।ज्ञा.गा.१०५४.०८।। | वृत्तिसहित मज लपवीं। माझें मन चरणीं ठेवीं। निवृत्ति पदोपदीं गोवीं। तूं गोसावी दीनोद्धरण |
| ४९६२ | ।।ज्ञा.गा.१०५४.०९।। | सात पाच तीन मेळा। नेघे तत्त्वांचा सोहळा। रजतमाचा कंटाळा। हृदयीं जिव्हाळा हरि वसो |
| ४९६३ | ।।ज्ञा.गा.१०५४.१०।। | श्वेत पीत नेघे वस्त्र। ज्ञानविज्ञान नेघे शास्त्र। स्वर्ग मर्त्य पाताळपात्र। नित्य वक्त्र हरि देई |
| ४९६४ | ।।ज्ञा.गा.१०५४.११।। | चंद्रसूर्य महेंद्रपदें ध्रुवादिकांचीं आनंदें। तें मी नेघे गा आल्हादें। तुझ्या ब्रीदें करीन घोष |
| ४९६५ | ।।ज्ञा.गा.१०५४.१२।। | करचरणेंसि इंद्रियवृत्ति। तुझ्या ठायीं तूंचि होती। मी माझी उरों नेदी कीर्ति। हें दान श्रीपती मज द्यावें |
| ४९६६ | ।।ज्ञा.गा.१०५४.१३।। | शांती दया क्षमा ऋद्धी। हेहि पाहातां मज उपाधी। तुझीया नामाची समाधी। कृपानिधी मज द्यावी |
| ४९६७ | ।।ज्ञा.गा.१०५४.१४।। | बाप रखुमादेविवरु तुष्टला। दान घे घे म्हणोनि वोळला। अजानवृक्ष पाल्हाईला। मग बोलिला विठ्ठल हरि |
| ४९६८ | ।।ज्ञा.गा.१०५४.१५।। | पुंडलिकें केलें रे कोडें। तें तुवां मागीतलें रे निवाडे। मी तुज हृदयीं सांपडे। हें त्वां केले ज्ञानदेवा |
| ४९६९ | ।।ज्ञा.गा.१०५४.१६।। | ज्ञानदेवें घेतलें दान। हृदयीं धरूनीयां ध्यान। समाधी बैसला निर्वाण। कथा कीर्तन करितु |
| ४९७० | ।।ज्ञा.गा.१०५४.१७।। | बाळछंदो बावीस जन्में। तोडिली भवाब्धीची कर्मे। चंद्रार्क तारांगणें । रश्मी दान घेतला हरि |
| ४९७१ | ।।ज्ञा.गा.१०५५.०१।। | विदेह आत्मलिंगा गुरुकृपेचा तुषारु। पूर्णे भरिला घटु हळु हळु बिंदु उदारु। वरुषला लिंगावरी तेथें तुष्टला श्रीगुरु। प्रसन्न निवृत्तिराजा ज्ञान देउनी उदारु |
| ४९७२ | ।।ज्ञा.गा.१०५५.०२।। | यालागीं ज्ञानदेवो नाम गुरुकृपेनें पावलों। असतां इये देहीं संसारा हारपलों। ज्ञानविज्ञान कळो आलें अद्वैतरूप बुझालों। विठ्ठल नाम माझे वाचे तेणें वाग्पुष्पें पावलों |
| ४९७३ | ।।ज्ञा.गा.१०५५.०३।। | नित्य गळती नामें जाली गेला प्रपंच अनिवारु। उपरती देहीं जाली निमाली वासना संसारू। तपन जालें ब्रह्ममूर्ति दिननिशीं साचारु। आठवितां मागील भावो अवघा पारुषला उदारु |
| ४९७४ | ।।ज्ञा.गा.१०५५.०४।। | विज्ञानेंसि ज्ञान गेलें एकरूप परिचार। ज्योतिमाजी कळिका गेली एकदीप जाला आकार। वृत्ति ते निवृत्ति जाली माया मारुनी केलें घर। निवृत्ति गुरु माझा घट स्थापिला त्या समोर |
| ४९७५ | ।।ज्ञा.गा.१०५५.०५।। | ज्ञानदेवें घटमठ निरोपिली हरिभक्ति । उडाली पक्षपाती इंद्रिया तेथें नाहीं गती। विरालें अभिमान ममता जाली समाप्ती। खुंटलिया उर्मी दाही स्नपन जालें लिंगाप्रती |
| ४९७६ | ।।ज्ञा.गा.१०५६.०१।। | स्वर्ग जयाची साळोंखा। समुद्र पाळी पिंड रेखा। शेषासारिखी बैसका। जो आधार तिहीं लोकां |
| ४९७७ | ।।ज्ञा.गा.१०५६.०२।। | लिंग देखिलें देखिलें। तिहीं त्रिभुवनीं विस्तारिलें |
| ४९७८ | ।।ज्ञा.गा.१०५६.०३।। | मेघधारी तपनपन केलें। तारापुष्पीं वरी पूजिलें। चंद्रफळ ज्या वाहिलें। ओवाळिलें रविदीपें |

| | | |
|---|---|---|
| ४९७९ | ।।ज्ञा.गा.१०५६.०४।। | आत्मनैवेद्य समर्पिले। ब्रह्मानंदीं मग वंदिलें। ज्योतिर्लिंग मग ध्याईलें। ज्ञानदेवा ह्रदयीं |
| ४९८० | ।।ज्ञा.गा.१०५७.०१।। | आदि आत्मज्योतीलिंगा प्रती लावियेला घटु। स्थावरिलें मायावस्त्र लिंगावरी प्रविष्टु। तपन नाम ध्वनी इंद्रिया केलें सपाटु |
| ४९८१ | ।।ज्ञा.गा.१०५७.०२।। | हळुहळु गळती गळे गळों लागली सकाळें। उच्चारितां कृष्णनाम। भेणें पळिजे कळिकाळें |
| ४९८२ | ।।ज्ञा.गा.१०५७.०३।। | त्रिगुण सुटल्या गांठी घटु विराला सघना। पंचतत्त्वें एके ठायीं आत्मा नांदे परिपूर्ण। जिव शिव हारपलें एक दिसे चैतन्य। आत्माराम विदेहिया श्रीगुरुने सांगितली खूण |
| ४९८३ | ।।ज्ञा.गा.१०५७.०४।। | गळतीलागीं अपाय मोठें विरुळा जाणें हेंचि खूण। नरदेह अवचितें जो साधकु होय नारायण। परमानंदे गळती गळे पांचहि तत्त्वें हरपोन |
| ४९८४ | ।।ज्ञा.गा.१०५७.०५।। | निवृत्ति सखा माझा दीनदयाळु श्रीगुरु। अलंकापुरीं स्थापियेलें। दिधला विठ्ठल उच्चारू। समाधीजीवन माझेंवरी अजान वृक्षतरु। जंववरी चंद्रसूर्य तंववरी कीर्तिघट स्थिरू |
| ४९८५ | ।।ज्ञा.गा.१०५७.०६।। | गाती वाती साधु मुनी छंदु घट मठी चित्त। विरेल देहबुद्धि ज्ञानदाता देईल उचित। विज्ञानेंसी गोष्टी सांगे ऐसें पद पावत। बाप रखुमादेविवरु लांबविला घटु ज्ञानदेव सांगत |
| ४९८६ | ।।ज्ञा.गा.१०५८.०१।। | आम्हीं कापडी रे आम्हीं कापडी रे। पापें बारा वाटा पळती बापडी रे |
| ४९८७ | ।।ज्ञा.गा.१०५८.०२।। | पंढरपुरीचे आम्हीं कापडी रे। उत्तरपंथीचे आम्ही कापडी रे |
| ४९८८ | ।।ज्ञा.गा.१०५८.०३।। | आजी पाहालें रे आजी पाहालें रे। संतसंगति सुख जालें रे |
| ४९८९ | ।।ज्ञा.गा.१०५८.०४।। | समता कावडी रे समता कावडी रे। माजी नामामृत भरिलें आवडी रे |
| ४९९० | ।।ज्ञा.गा.१०५८.०५।। | येणें न घडे रे जाणें न घडे रे। निजसुख कोंदलें पाहतां चहूंकडे रे |
| ४९९१ | ।।ज्ञा.गा.१०५८.०६।। | नलगे दंडणें रे नलगे मुंडणें रे। नाम म्हणोनी कर्माकर्म खंडणें रे |
| ४९९२ | ।।ज्ञा.गा.१०५८.०७।। | दु:ख फिटलें रे दु:ख फिटलें रे। बाप रखुमादेविवर विठ्ठलें रे |
| ४९९३ | ।।ज्ञा.गा.१०५९.०१।। | ॐनमो शिवा आदि। कावडी घेतली खांदीं। मिळाली संतमांदी। त्यांचे चरण रज रेणु वंदी रे कापडिया रे |
| ४९९४ | ।।ज्ञा.गा.१०५९.०२।। | शिवनाम शीतळ मुखीं सेवीं। तूं कापडिया रे। दडदडदडदड दुडुदुडुदुडुदुडु। पळ सुटला कळिकाळा बापुडीया रे |
| ४९९५ | ।।ज्ञा.गा.१०५९.०३।। | गुरुलिंग जंगम। त्यानें दाविला आगम। आधिव्याधि झाली सम। तेणें पावलों विश्राम रे |
| ४९९६ | ।।ज्ञा.गा.१०५९.०४।। | जवळी असतां जगजीवन। कां धांडोळिसी वन। एकाग्र करीं मन। तेणें होईल समाधान रे |
| ४९९७ | ।।ज्ञा.गा.१०५९.०५।। | क्षुधा तृषा हरे। देहभाव जेथें विरे। तें जीवन दिधलें। बाप रखुमादेविवरें विठ्ठलु रे कापडिया रे |
| ४९९८ | ।।ज्ञा.गा.१०६०.०१।। | रंगा येई वो ये रंगा येई वो ये। विठाई किठाई माझे कृष्णाई कान्हाई |
| ४९९९ | ।।ज्ञा.गा.१०६०.०२।। | वैकुंठवासिनी विठाई जगत्रजननी। तुझा वेधु माझे मनीं रंगा येई वो ये |
| ५००० | ।।ज्ञा.गा.१०६०.०३।। | कटीं कर विराजित। मुकुटरत्नजडित। पीतांबरु कासिला। तैसा येईं कां धांवत |

| | | |
|---|---|---|
| ५००१ | ।।ज्ञा.गा.१०६०.०४।। | विश्वरूप विश्वंभरे कमळनयने कमळाकरे वो। तुझें ध्यान लागो बाप रखुमादेविवरे वो |
| ५००२ | ।।ज्ञा.गा.१०६१.०१।। | तूं विटेवरी सखये बाई हो करीं कृपा। माझें मन लागो तुझ्या पायीं हो करीं कृपा। तूं सांवळें सुंदरी हो करीं कृपा। लावण्य मनोहरी हो करीं कृपा। निजभक्तां करुणा करीं हो करीं कृपा |
| ५००३ | ।।ज्ञा.गा.१०६१.०२।। | पंढरपुरीं राहिली। डोळां पाहिली। संतें देखिली। वरुनी विठाई वरुनी विठाई। सच्चिदानंद अंबाबाई हो करीं कृपा। उजळ कुळ दीपा। बोध करी सोपा। येऊनी लवलाहीं येऊनी लवलाहीं |
| ५००४ | ।।ज्ञा.गा.१०६१.०३।। | तुझा देव्हारा मांडिला हो करीं कृपा। चौक आसनीं कळस ठेविला हो करीं कृपा। प्रेम चांदवा वर दिधला हो करीं कृपा। ज्ञान गादी दिली बैसावया हो करीं कृपा। वरी बैसविली आदी माया हो करीं कृपा। काम क्रोध मद मत्सर। दंभ अहंकार। त्याचें बळ फार। सर्व सुख देई सर्व सुख देई |
| ५००५ | ।।ज्ञा.गा.१०६१.०४।। | शुक सनकादिक गोंधळी हो करीं कृपा। नाचताती प्रेमकल्लोळीं हो करीं कृपा। उदो उदो शब्द आरोळी हो करीं कृपा। पुढें पुंडलीक दिवटा हो करीं कृपा। त्यानें मार्ग दाविला निटा हो करीं कृपा। आई दाविली मूळपीठा हो करीं कृपा। बाप रखुमादेविवरु। सुख सागरु। त्याला नमस्कारु। सर्व सुख देई सर्व सुख देई |
| ५००६ | ।।ज्ञा.गा.१०६२.०१।। | पौर्णिमेच्या दिनीं चंद्र अकळी । जाहला अमावस्ये ठेला पूर्ण कळी |
| ५००७ | ।।ज्ञा.गा.१०६२.०२।। | देखिलें गे माय विचित्र विलक्षण। जाहलें स्वप्नभान जागृतीशी |
| ५००८ | ।।ज्ञा.गा.१०६२.०३।। | मातेचिये पोटीं पिता जो जन्मला। नवलाव जाहला काय सांगो |
| ५००९ | ।।ज्ञा.गा.१०६२.०४।। | मश्यकें ओलांडीला स्वयें मेरुगिरी। दहनाच्या पाठारीं पीक जाहलें |
| ५०१० | ।।ज्ञा.गा.१०६२.०५।। | चंचूच्या सांडशें पक्षीं घेते पाणी। सिंधुशी गिळुनी बैसिन्नला। बाप रखुमादेविवर विठ्ठलची जाणे। परब्रह्म अनुभवणें परब्रह्म |
| ५०११ | ।।ज्ञा.गा.१०६३.०१।। | वांझेचिये पोरा तिघे झाले लेक। पारधीशी देख निघाले ते |
| ५०१२ | ।।ज्ञा.गा.१०६३.०२।। | उर्ण तंतु दोरा जाळें केलें त्याचें। डोहीं मृगजळाचे धरिलें मच्छ |
| ५०१३ | ।।ज्ञा.गा.१०६३.०३।। | नेलें अंधापाशीं मुके बोले त्याशी। दिलें थोट्यापाशीं ठेवणें तें |
| ५०१४ | ।।ज्ञा.गा.१०६३.०४।। | ज्ञानदेव म्हणे केलें अविद्येचे। संतासी तयाचें भय नाहीं |
| ५०१५ | ।।ज्ञा.गा.१०६४.०१।। | एक माझी माता दोघेजण पिता। मज तीन कांता दोघे सुत |
| ५०१६ | ।।ज्ञा.गा.१०६४.०२।। | चौघे बंधु आणि दशक बहिणी। कन्या झाल्या तिन्ही माझ्या पोटीं |
| ५०१७ | ।।ज्ञा.गा.१०६४.०३।। | बहिणी भावासंगें खेळूं पैं लागले। विपरीत झालें सांगूं कोणा |
| ५०१८ | ।।ज्ञा.गा.१०६४.०४।। | ज्ञानदेव म्हणे अघटित घडे। गुरुकृपें जोडे परब्रह्म |
| ५०१९ | ।।ज्ञा.गा.१०६५.०१।। | येऊनी वऱ्हाडिणी बैसल्या टेकी। कोण तो नोवरा नाहीं वोळखी |
| ५०२० | ।।ज्ञा.गा.१०६५.०२।। | मी कवणाची मज सांगा कोणी। वऱ्हाड आलिया वऱ्हाडिणी |

| | | |
|---|---|---|
| ५०२१ | ।।ज्ञा.गा.१०६५.०३।। | कवण ते वरमाय कवण तो वरबाप। कवण तो नोवरा कवण तो मंडप |
| ५०२२ | ।।ज्ञा.गा.१०६५.०४।। | वऱ्हाड नव्हे स्वप्न गे माये। बाप रखुमादेविवराचे वेगीं धरावे पाये |
| ५०२३ | ।।ज्ञा.गा.१०६६.०१।। | वडाच्या पानीं एक उभविलें देउळ आधीं कळसु मग पायाहो। देव पुजों गेलों तंव देउळ उडालें पान नाहीं तेथें वडु रे |
| ५०२४ | ।।ज्ञा.गा.१०६६.०२।। | चेत जाणा तुम्हीं चेत जाणा। टिपरी वडाच्या साईं हो |
| ५०२५ | ।।ज्ञा.गा.१०६६.०३।। | पाषाणाचा देवो पाषाणाचा भक्तु पोहती मृगजळ डोहीं हो। वांझेचा पुत्र एकु पोहों लागला तो तारी देव भक्तां हो |
| ५०२६ | ।।ज्ञा.गा.१०६६.०४।। | भवाब्धिसागर नुतरवे ते पडिलें रोहिणी डोहीं हो। न संपडे आत्मा बुडाले संदेहीं ते गुंतले मायाजळीं हो |
| ५०२७ | ।।ज्ञा.गा.१०६६.०५।। | विरुळा जाणें पोहते खुणें केला मायेसी उपावो हो। बाप रखुमादेविवरु विठ्ठलु विसावा तेणें नेलें पैलथडी वो |
| ५०२८ | ।।ज्ञा.गा.१०६७.०१।। | चिंचेच्या पानीं एक शिवालय उभविलें आधीं कळसु मग पाया रे। देव पुजों गेलों तंव देऊळ उडालें प्रसिद्ध सद्गुरुराया रे |
| ५०२९ | ।।ज्ञा.गा.१०६७.०२।। | संतजनां महंतजनां ते तेथील तें गुज गोड रे। अनुभव अनुभवितां कदाचित सरे पुरेल मनींचें कोड रे |
| ५०३० | ।।ज्ञा.गा.१०६७.०३।। | उपजत नोवरी केळवली केळवला नोवरा नोवरी। पितया कंकण करी माता सुंदरी विपरीत गे माय कोडियाची परी |
| ५०३१ | ।।ज्ञा.गा.१०६७.०४।। | विपरीत कोडें गुरुगम्य कहाणी ऐकें सगुण विरुळा। बाप रखुमादेविवरु विठ्ठलु पाहतां पाविजे तो सुखसोहळा |
| ५०३२ | ।।ज्ञा.गा.१०६८.०१।। | देहा लाजिलिये शब्दा रुसलिये। कांसवींचें दूध देऊनियां बुझाविलें गे माय |
| ५०३३ | ।।ज्ञा.गा.१०६८.०२।। | काय सांगों तिचा नवलाहो। महालोभेंवीण कैसा येतो पान्हावो |
| ५०३४ | ।।ज्ञा.गा.१०६८.०३।। | आवसेचें चांदिणें सांगों गेलिये। रखुमादेविवरा विठ्ठलीं वरपडी जालिये |
| ५०३५ | ।।ज्ञा.गा.१०६९.०१।। | निशियेचे भरीं भानु प्रतिबिंबीं बिंबला। बिंबचि गिळुनी ठेला बिंबामाजीं |
| ५०३६ | ।।ज्ञा.गा.१०६९.०२।। | रात्रि सूर्य वाहे दिनु चंद्र जाये। विपरीत गे माय देखियेलें |
| ५०३७ | ।।ज्ञा.गा.१०६९.०३।। | उदय ना अस्तु तेथें कैचेनि त्रिगुण। आपणचि दर्पण होऊनि ठेला |
| ५०३८ | ।।ज्ञा.गा.१०६९.०४।। | ज्ञानदेव म्हणे अनुभवीं तोचि जाणें। संत ये खुणें संतोषलें |
| ५०३९ | ।।ज्ञा.गा.१०७०.०१।। | पुरुषेंवीण नारी संचरली शरीरीं। आपण्यावरी आळु आला |
| ५०४० | ।।ज्ञा.गा.१०७०.०२।। | काय कोण्या सांगें सिणलीये अनुरागें। पाडिलिये पतिसंगें अवस्थाभूत |
| ५०४१ | ।।ज्ञा.गा.१०७०.०३।। | बाप रखुमादेविवरु विठ्ठलु जैसा तैसा। व्यापूनि आकाशा उरला असे |
| ५०४२ | ।।ज्ञा.गा.१०७१.०१।। | अचिंत बाळक सावध जालें। निशब्दीं बोभाईलें मीचि मीचि |
| ५०४३ | ।।ज्ञा.गा.१०७१.०२।। | गरोदरेंविण बाळक जालें। माया मारून गेलें निरंजना |
| ५०४४ | ।।ज्ञा.गा.१०७१.०३।। | तेथें मज एक नवल पैं जालें। पेहें सूदलें निरालंब |
| ५०४५ | ।।ज्ञा.गा.१०७१.०४।। | छत्तीस अकरा घोंटु पैं घेतला। उदरेंवीण भरले पोट देखा |
| ५०४६ | ।।ज्ञा.गा.१०७१.०५।। | सहज गुण होतें निर्गुण जालें। भलत्या झोंबलें निराकारें |

| | | |
|---|---|---|
| ८५९ | ।।ज्ञा.गा.नि.२०५.३।। | ज्ञानेसी विज्ञान गेलें अनाठाया। हरीरूप छाया आम्हांवरी |
| ८६० | ।।ज्ञा.गा.नि.२०५.४।। | निवृत्ति दिधला नामेंरूपें दिसे। सर्व हरी असे तेजोमय |
| ८६१ | ।।ज्ञा.गा.नि.२०६.१।। | विवेक वैराग्य उन्मनी विनट। हरिनामें वाट सांपडली |
| ८६२ | ।।ज्ञा.गा.नि.२०६.२।। | हरिनाम भला हरिकृष्ण भला। दीन उगवला ब्रह्मरूपें |
| ८६३ | ।।ज्ञा.गा.नि.२०६.३।। | हरी हरी सार वाचेसि उच्चार। सर्व हा श्रीधर पुरे आम्हां |
| ८६४ | ।।ज्ञा.गा.नि.२०६.४।। | निवृत्ति निर्माण एकनाम हरी। प्रपंच बोहरी कोटी राशी |
| ८६५ | ।।ज्ञा.गा.नि.२०७.१।। | शिव शांति तेजें रवितेज बिंबे। जीवशिवा बिजे समतेज |
| ८६६ | ।।ज्ञा.गा.नि.२०७.२।। | तैसें तुझें ज्ञान जालें रे हें काज। केशवीराज चित्त जालें |
| ८६७ | ।।ज्ञा.गा.नि.२०७.३।। | समाधीचें रूप रुपासि आलें काह्या। पसरोनी बाह्या देत क्षेम |
| ८६८ | ।।ज्ञा.गा.नि.२०७.४।। | प्रवृत्ति निवृत्ति दोहींचे तटाक। उतरलासि एक शुद्धोदकें |
| ८६९ | ।।ज्ञा.गा.नि.२०७.५।। | क्षिरनिरहंसी जाला तुझा स्वादु। अवघाचि गोविंदु नांदे देहीं |
| ८७० | ।।ज्ञा.गा.नि.२०७.६।। | निवृत्ति संपत्ति आलिया पैं हातां। तत्त्वीं तत्त्व नित्यता उलधा तुझा |
| ८७१ | ।।ज्ञा.गा.नि.२०८.१।। | विवरण सार हरिहर आप। सर्व हरिरूप आपणपणें |
| ८७२ | ।।ज्ञा.गा.नि.२०८.२।। | आपरूपें गोविंद गोंविला सगळा। चरण कमळा विनटलों |
| ८७३ | ।।ज्ञा.गा.नि.२०८.३।। | भिन्न दुजें लाटे मन उफराटें। उन्मनिये वाटे भेदियेलें |
| ८७४ | ।।ज्ञा.गा.नि.२०८.४।। | निवृत्ति गोल्हाट मार्ग तो सपाट। भेदुनी त्रिकुट साधियेलें |
| ८७५ | ।।ज्ञा.गा.नि.२०९.१।। | निगम नियम सर्व सर्वोत्तम। दिननिशीं राम सेवितुसे |
| ८७६ | ।।ज्ञा.गा.नि.२०९.२।। | आम्हां गोड हरी आम्हां चाड धरी। हरी तो संहारी आम्हांमाजी |
| ८७७ | ।।ज्ञा.गा.नि.२०९.३।। | नेघों हरिवीण दुजें तें पैं भिन्न। सांगितली खूण गुरुराजें |
| ८७८ | ।।ज्ञा.गा.नि.२०९.४।। | निवृत्ती गयनी प्रसाद उन्मनी। निरंतर ध्यानीं रामनाम |
| ८७९ | ।।ज्ञा.गा.नि.२१०.१।। | मोडिला तो खेळ तोडियेलें सूत्र। टाकिलें परत्र पैल रूप |
| ८८० | ।।ज्ञा.गा.नि.२१०.२।। | रूपें केला गोड वासना मवाळ। जिव्हेसी वाचाळ हरी आला |
| ८८१ | ।।ज्ञा.गा.नि.२१०.३।। | शोधिलें जीवन निक्षेपिलें धन। मनोमय जाण हरी जाला |
| ८८२ | ।।ज्ञा.गा.नि.२१०.४।। | निवृत्ति गयनी ध्येय ध्याता ज्ञानी। अखंड निशाणी रामनामीं |
| ८८३ | ।।ज्ञा.गा.नि.२११.१।। | छेदिला समूळ प्रपंच विव्हळ। तारक गोपाळ भवनिधी |
| ८८४ | ।।ज्ञा.गा.नि.२११.२।। | नावाडा नाटकु उतरील तीरा। जन्म येरझारा एके खेपे |

| | | |
|---|---|---|
| ८८५ | ।।ज्ञा.गा.नि.२११.३।। | नाहीं तेथें मोल नाहीं तो विकरा। आपणचि सौरा हिंडतुसे |
| ८८६ | ।।ज्ञा.गा.नि.२११.४।। | निवृत्तीनें तीर टाकिलें पैं सार। जन्म येरझार तोडियेली |
| ८८७ | ।।ज्ञा.गा.नि.२१२.१।। | अवीट अमोला घेतां पैं निमोला। प्रत्यक्ष देखिला भीमातटीं |
| ८८८ | ।।ज्ञा.गा.नि.२१२.२।। | अव्यक्त साकार आकारिलें अंकूर। क्षरला चराचर भक्तिकाजें |
| ८८९ | ।।ज्ञा.गा.नि.२१२.३।। | अनुमान विटे सर्वघटीं माजिठे। तें परब्रह्म विटे भक्ति साह्य |
| ८९० | ।।ज्ञा.गा.नि.२१२.४।। | निवृत्ति घनवट पिकलिसे पेठ। पुंडलिकें प्रगट केलें कैसें |
| ८९१ | ।।ज्ञा.गा.नि.२१३.१।। | पंढरीये चोख रूपडें अशेख। भीमातीरीं देख पुण्यभूमी |
| ८९२ | ।।ज्ञा.गा.नि.२१३.२।। | आदिपीठ देव ब्रह्म हें स्वयमेव। पुंडलिक भाव प्रगटला |
| ८९३ | ।।ज्ञा.गा.नि.२१३.३।। | जन हें विव्हळ तारक गोपाळ। कीर्तनीं कळिकाळ दुरी ठाहे |
| ८९४ | ।।ज्ञा.गा.नि.२१३.४।। | नाम हें विठ्ठल नलगे पैं मोल। नित्यता सफळ पांडुरंग |
| ८९५ | ।।ज्ञा.गा.नि.२१३.५।। | त्रिविधताप पाप त्यजतील अमूप। पुरतील संकल्प एकानामें |
| ८९६ | ।।ज्ञा.गा.नि.२१३.६।। | निवृत्ति म्हणे धन्य जो कीर्तन करी। सर्वत्र चराचरीं बोलियेलें |
| ८९७ | ।।ज्ञा.गा.नि.२१४.१।। | पुंडलिकाचें भाग्य वर्णावया अमरीं। नाहीं चराचरीं ऐसा कोणी |
| ८९८ | ।।ज्ञा.गा.नि.२१४.२।। | विष्णुसहित शिव आणिला पंढरीं। केलें भीमातीरीं पेखणें जेणें |
| ८९९ | ।।ज्ञा.गा.नि.२१४.३।। | ब्रह्मादिकां अंत न कळे ज्या रूपाचा। एवढी कीर्ति वाचा बोलों काय |
| ९०० | ।।ज्ञा.गा.नि.२१४.४।। | निवृत्ति सांगे मातु विठ्ठल उच्चार। वैकुंठ उतरे एक्यानामें |
| ९०१ | ।।ज्ञा.गा.नि.२१५.१।। | रूपाचें रूपस विठ्ठलनामवेष। पंढरीनिवास आत्माराम |
| ९०२ | ।।ज्ञा.गा.नि.२१५.२।। | पुंडलिकभाग्य फळलें संपूर्ण। दिननिशीं कीर्तन विठ्ठल हरी |
| ९०३ | ।।ज्ञा.गा.नि.२१५.३।। | त्रैलोक्य उद्धरे ऐसी पव्हे त्वरें। कीर्तन निर्धारें तरणोपाय |
| ९०४ | ।।ज्ञा.गा.नि.२१५.४।। | पुण्य केलें चोख तारिले अशेख। जनीं वनीं एक रूप वसे |
| ९०५ | ।।ज्ञा.गा.नि.२१५.५।। | वेदादिकमति ज्या रूपा गुंतती। तो आणूनि श्रीपति उभा केला |
| ९०६ | ।।ज्ञा.गा.नि.२१५.६।। | निवृत्तीचा सखा विठ्ठलरूप देखा। निरालंब शिखा गगनोदरीं |
| ९०७ | ।।ज्ञा.गा.नि.२१६.१।। | भाग्याचेनि भाग्य उदो पैं दैवयोगें। पुंडलिका संगें भीमातटीं |
| ९०८ | ।।ज्ञा.गा.नि.२१६.२।। | ध्यान मनन एक करितां सम्यक्। होय एकाएक एकतत्त्व |
| ९०९ | ।।ज्ञा.गा.नि.२१६.३।। | उदो अस्तु मैळें ब्रह्म न मैळें। भोगिती सोहळे प्रेम भक्त |
| ९१० | ।।ज्ञा.गा.नि.२१६.४।। | निवृत्ति निवांत विठ्ठल सतत। नघे दुजी मात हरिवीण |

| | | |
|---|---|---|
| ९११ | ।।ज्ञा.गा.नि.२१७.१।। | निराकार वस्तु आकारासि आली। विश्रांति पैं जाली भक्तजनां |
| ९१२ | ।।ज्ञा.गा.नि.२१७.२।। | भिवरासंगमीं निरंतर समी। तल्लीनता ब्रह्मीं उभी असे |
| ९१३ | ।।ज्ञा.गा.नि.२१७.३।। | पुंडलिक ध्याये पुढत पुढती सोये। विठ्ठल हेंचि गाये संकीर्तनीं |
| ९१४ | ।।ज्ञा.गा.नि.२१७.४।। | निवृत्तिसंकीर्तन ब्रह्म हें सोज्वळ। नाम हें रसाळ अनिर्वाच्य |
| ९१५ | ।।ज्ञा.गा.नि.२१८.१।। | पहातां साधन विठ्ठलकीर्तन। भक्तसंजीवन आत्माराम |
| ९१६ | ।।ज्ञा.गा.नि.२१८.२।। | विठ्ठल सधर भिवरा तें नीर। नाम निरंतर केशवाचें |
| ९१७ | ।।ज्ञा.गा.नि.२१८.३।। | शिवसुरवर चिंतिती सुखार। कीर्तनविचार पंढरीसी |
| ९१८ | ।।ज्ञा.गा.नि.२१८.४।। | निवृत्ति कीर्तन दिननिशीं ध्यान। मनाचें उन्मन इये रूपीं |
| ९१९ | ।।ज्ञा.गा.नि.२१९.१।। | पुंडलिकपेठ वैष्णवाचा हाट। करिती बोभाट हरिनामाचा |
| ९२० | ।।ज्ञा.गा.नि.२१९.२।। | वोळलें अंबर अमृत तुषार। झेलीत अमर चकोर झाले |
| ९२१ | ।।ज्ञा.गा.नि.२१९.३।। | देव मुनी सर्व ब्रह्मादिक लोठे। पंढरीये पेठे प्रेमपिसे |
| ९२२ | ।।ज्ञा.गा.नि.२१९.४।। | निवृत्ति निर्वाळला ज्ञानदेव सोपान। खेंचर तल्लीन विठ्ठलनामें |
| ९२३ | ।।ज्ञा.गा.नि.२२०.१।। | मन कामना हरि मनाची बोहरी। चिंतितां श्रीहरी सुखानंद |
| ९२४ | ।।ज्ञा.गा.नि.२२०.२।। | तें पुंडलिक तपें वोळलें स्वरूपें। जनाचीं पैं पापें निर्दाळिलीं |
| ९२५ | ।।ज्ञा.गा.नि.२२०.३।। | वेणुनाद तीर्थ चंद्रभागा समर्थ। विठ्ठलदैवत रहिवासें |
| ९२६ | ।।ज्ञा.गा.नि.२२०.४।। | निवृत्ति साकार विठ्ठल आचार। भिवरा तें नीर अमृतमय |
| ९२७ | ।।ज्ञा.गा.नि.२२१.१।। | विठ्ठल श्रीहरी उभा भीमातीरीं। तिष्ठती कामारी मुक्तिचारी |
| ९२८ | ।।ज्ञा.गा.नि.२२१.२।। | मुनिजनां सुख निरंतर लक्ष। भक्तां निजसुख देत असे |
| ९२९ | ।।ज्ञा.गा.नि.२२१.३।। | पुंडरिकपुण्य मी दीन कारुण्य। उद्धरिले जन अनंत कोटी |
| ९३० | ।।ज्ञा.गा.नि.२२१.४।। | निरानिरंतर भीमरथी तीर। ब्रह्म हें साकार विटे नीट |
| ९३१ | ।।ज्ञा.गा.नि.२२१.५।। | नित्यता भजन जनींजनार्दन। ब्रह्मादिक खूण पावताती |
| ९३२ | ।।ज्ञा.गा.नि.२२१.६।। | निवृत्ति तत्पर हरीरूप सर्वत्र। नाम घेतां तृप्त आत्माराम |
| ९३३ | ।।ज्ञा.गा.नि.२२२.१।। | भवजळ काया पंचतत्वमाया। भजन उपाया पंढरीरावो |
| ९३४ | ।।ज्ञा.गा.नि.२२२.२।। | तारक पंढरी प्रसिद्ध भीमातीरीं। ब्रीदें चराचरीं बोले वेदु |
| ९३५ | ।।ज्ञा.गा.नि.२२२.३।। | माया मोहजाळ ममता निखळ। सेवितां सकळ होय हरी |
| ९३६ | ।।ज्ञा.गा.नि.२२२.४।। | निवृत्तीचें फळ सकळ गोपाळ। तोडी माया जाळ संकीर्तनें |

| | | |
|---|---|---|
| ९३७ | ।।ज्ञा.गा.नि.२२३.१।। | नित्य हरिकथा नित्य नामावळी। वैष्णवाचे कुळीं धन्य जन्म |
| ९३८ | ।।ज्ञा.गा.नि.२२३.२।। | म्हणोनि पंढरीं उपजावें संसारीं। प्रत्यक्ष श्रीहरी तीरीं उभा |
| ९३९ | ।।ज्ञा.गा.नि.२२३.३।। | नित्यता दिवाळी नाहीं तेथें द्वैत। नित्यता अच्युत तिष्ठतसे |
| ९४० | ।।ज्ञा.गा.नि.२२३.४।। | निवृत्ति सधर विष्णुमय सार। विठ्ठल आचार पंढरीये |
| ९४१ | ।।ज्ञा.गा.नि.२२४.१।। | प्रारब्ध संचित विठ्ठलदैवत। कुळीं उगवत भाग्ययोगें |
| ९४२ | ।।ज्ञा.गा.नि.२२४.२।। | तें रूप पंढरीं उभे असे सानें। त्रिभुवन ध्यानें वेधियेलें |
| ९४३ | ।।ज्ञा.गा.नि.२२४.३।। | उगवली ज्योति प्रभा पैं फाकती। नाहीं दिनराती पंढरीये |
| ९४४ | ।।ज्ञा.गा.नि.२२४.४।। | प्रभात हरपे सायंकाळ लोपे। दिनमणी दीपे विठ्ठलप्रभा |
| ९४५ | ।।ज्ञा.गा.नि.२२४.५।। | पृथ्वी हे ढिसाळ वायु व्योमफळ। सेवितां अढळ जोडती रया |
| ९४६ | ।।ज्ञा.गा.नि.२२४.६।। | निवृत्ति सप्रेम जोडती सर्व काम। पंढरीये राम विश्रामले |
| ९४७ | ।।ज्ञा.गा.नि.२२५.१।। | सर्व काम धन सर्व सिद्ध पूर्ण। पतीतपावन हरि एकु |
| ९४८ | ।।ज्ञा.गा.नि.२२५.२।। | तें रूप पंढरीं पुंडलिका वोळलें। आणूनि ठेविलें भीमातीरीं |
| ९४९ | ।।ज्ञा.गा.नि.२२५.३।। | नलगती त्या सिद्धी करणें उपाधी। नित्य चित्तशुद्धी विठ्ठलनामें |
| ९५० | ।।ज्ञा.गा.नि.२२५.४।। | कळिकाळासि त्रासु चित्तीं हृषीकेशु । उगवला दिवसु सोनियाचा |
| ९५१ | ।।ज्ञा.गा.नि.२२५.५।। | त्रिभुवनीं थोर क्षेत्र पैं सार। विठ्ठल उच्चार भीमातीरीं |
| ९५२ | ।।ज्ञा.गा.नि.२२५.६।। | निवृत्ति तत्पर निवाला सत्वर। नित्यता आचार विष्णुमय |
| ९५३ | ।।ज्ञा.गा.नि.२२६.१।। | उघडें स्वरूप प्रत्यक्षाचे दीप। नाम घेतां पाप हरे जनां |
| ९५४ | ।।ज्ञा.गा.नि.२२६.२।। | तें रूप विठ्ठल विनट सकळ। सेवा दिनकाळ पंढरीयेसी |
| ९५५ | ।।ज्ञा.गा.नि.२२६.३।। | रजतमें दुरी नामाची माधुरी। निशाणी एकसरी रामकृष्ण |
| ९५६ | ।।ज्ञा.गा.नि.२२६.४।। | भवाब्धितारक नावाडा विवेक। पुंडलिक देख सेवितुसे |
| ९५७ | ।।ज्ञा.गा.नि.२२६.५।। | विश्व हें तारिलें नामाचि पिकलें। केशवीं रंगलें मन हेतु |
| ९५८ | ।।ज्ञा.गा.नि.२२६.६।। | निवृत्ति विठ्ठल सेवितु सकळ। दिकाळफळ आत्माराम |
| ९५९ | ।।ज्ञा.गा.नि.२२७.१।। | जनांसी तारक विठ्ठल हेंचि एक। केलासे विवेक सनकादिकीं |
| ९६० | ।।ज्ञा.गा.नि.२२७.२।। | तें रूप पंढरीं ओळलेंसें देखा। द्वैताची पैं शाखा तोडीयेली |
| ९६१ | ।।ज्ञा.गा.नि.२२७.३।। | उगवलें बिंब अद्वैत स्वयंभ। नाम हें सुलभ विठ्ठलराज |
| ९६२ | ।।ज्ञा.गा.नि.२२७.४।। | निवृत्तीचें गूज विठ्ठल सहज। गयनीराजें मज सांगितलें |

| | | |
|---|---|---|
| ९६३ | ।।ज्ञा.गा.नि.२२८.१।। | पिंड हा न धरी ब्रह्मार्पण करी। विष्णु चराचरीं ग्रंथीं पाहे |
| ९६४ | ।।ज्ञा.गा.नि.२२८.२।। | तें रूप विठ्ठल ब्रह्माकार दिसे। पंढरीं सौरसें भीमातीरीं |
| ९६५ | ।।ज्ञा.गा.नि.२२८.३।। | जनाचे तारक पूज्य पुण्य श्लोक। तृप्त सनकादिक नामें होती |
| ९६६ | ।।ज्ञा.गा.नि.२२८.४।। | पतीतपावन नाम हें जीवन। योगियाचें ध्यान हरि आत्मा |
| ९६७ | ।।ज्ञा.गा.नि.२२८.५।। | वेणुनादीं काला पिंडाकृती जाला। भाग्यें भोगी केला दृष्टी पडे |
| ९६८ | ।।ज्ञा.गा.नि.२२८.६।। | निवृत्ति म्हणे तें रूपडें अनंत। विठ्ठल संकेत तरुणोपाय |
| ९६९ | ।।ज्ञा.गा.नि.२२९.१।। | हरिविण व्यर्थ आचार समर्थ। हरि हेंचि हीत अरे जनां |
| ९७० | ।।ज्ञा.गा.नि.२२९.२।। | तें रूप पंढरीं पुंडरिकसंगें। एका नामें पांग पाश तोडी |
| ९७१ | ।।ज्ञा.गा.नि.२२९.३।। | सर्व ब्रह्मार्पण कर्म करी जाण। वेदमतें खुण ऐसी असे |
| ९७२ | ।।ज्ञा.गा.नि.२२९.४।। | निवृत्तीचा देव सर्व हा गोविंद। नाहीं भिन्न भेद विश्वीं इये |
| ९७३ | ।।ज्ञा.गा.नि.२३०.१।। | प्राणिया उद्धार सर्व हा श्रीधर। ब्रह्म हें साचार कृष्णमूर्ती |
| ९७४ | ।।ज्ञा.गा.नि.२३०.२।। | तें रूप भीवरें पांडुरंग खरें । पुंडलिक निर्धारें उभें असे |
| ९७५ | ।।ज्ञा.गा.नि.२३०.३।। | युगें अठ्ठावीस उभा हृषीकेशु। पुंडलिका सौरसु पुरवितु |
| ९७६ | ।।ज्ञा.गा.नि.२३०.४।। | निवृत्तीचें गुज पुंडरीक बीज। विश्वजनकाज पुरे कोडें |
| ९७७ | ।।ज्ञा.गा.नि.२३१.१।। | ध्येय ध्याय मनीं उन्मनीं साधनीं । लाविता निशाणी ध्यानमार्गे |
| ९७८ | ।।ज्ञा.गा.नि.२३१.२।। | तें रूप सधन गुणागुणसंपन्न। ब्रह्म सनातन नांदे वीटे |
| ९७९ | ।।ज्ञा.गा.नि.२३१.३।। | विठ्ठलनाम सार ऐसाचि निर्धार। मुक्ति पारावार ती अक्षरीं |
| ९८० | ।।ज्ञा.गा.नि.२३१.४।। | निवृत्ति निवांत केलेंसे मथीत। चित्त समर्पिलें पुंडलिकें |
| ९८१ | ।।ज्ञा.गा.नि.२३२.१।। | काळवेषें दुरी काळचक्र करीं। बाह्य अभ्यंतरीं हरी नांदे |
| ९८२ | ।।ज्ञा.गा.नि.२३२.२।। | सर्वत्र श्रीकृष्ण नंदाघरीं जाला। कृष्णें काला केला गोपवेषें |
| ९८३ | ।।ज्ञा.गा.नि.२३२.३।। | गोपाळ संवगडे खेळवी लाडेकोडें। यशोदेमायेपुढें छंदलग |
| ९८४ | ।।ज्ञा.गा.नि.२३२.४।। | निवृत्ति म्हणे तो स्वामी सकळांचा। दिनकाळ वाचा कृष्ण जपों |
| ९८५ | ।।ज्ञा.गा.नि.२३३.१।। | नाहीं यासि गोत नाहीं यासि कूळ। शेखीं आचारशीळ कोण म्हणे |
| ९८६ | ।।ज्ञा.गा.नि.२३३.२।। | सोंवळा हा हरी गोकुळीं लोणी चोरी। तो यशोदा पाचारी थान घ्याया |
| ९८७ | ।।ज्ञा.गा.नि.२३३.३।। | बाळरूपें हरी वागवी शिदोरी। तो गोपाळांच्या करीं काला देतु |
| ९८८ | ।।ज्ञा.गा.नि.२३३.४।। | निवृत्ति संपूर्ण कवळु देतु पूर्ण । ब्रह्मसनातन गोकुळीं माये |

| | | |
|---|---|---|
| ९८९ | ।।ज्ञा.गा.नि.२३४.१।। | नुघडि तो दृष्टि न बोले तो वाचा। हरिरूपीं साचा तल्लिनता |
| ९९० | ।।ज्ञा.गा.नि.२३४.२।। | उठिं उठिं नाम्या चाल रे सांगातें। माझें आवडते जीवलग |
| ९९१ | ।।ज्ञा.गा.नि.२३४.३।। | कुरवाळिला करें पुसतसे गूज। घेईं ब्रह्मबीज सदोदित |
| ९९२ | ।।ज्ञा.गा.नि.२३४.४।। | ज्ञानासि लाधलें निवृत्ति फावलें। सोपान घडलें दिनकाळ |
| ९९३ | ।।ज्ञा.गा.नि.२३४.५।। | तें हें रे सखया खेंचरासि पुसे। गुरुनामीं विश्वासे ब्रह्मरूपें |
| ९९४ | ।।ज्ञा.गा.नि.२३४.६।। | निवृत्ति म्हणे आतां अनाथ श्रीहरी। तूंचि चराचरीं हेंचि खुण |
| ९९५ | ।।ज्ञा.गा.नि.२३५.१।। | आनंद सर्वांचा काला अरुवार । नामया साचार फुंदतुसे |
| ९९६ | ।।ज्ञा.गा.नि.२३५.२।। | राहीरखुमामाई सत्यभामा माता। आलिया त्वरिता काल्यामाजी |
| ९९७ | ।।ज्ञा.गा.नि.२३५.३।। | उचलिला नामा प्रेमाचें फुंदन। नुघडी तो नयन कांहीं केल्या |
| ९९८ | ।।ज्ञा.गा.नि.२३५.४।। | बुझावित राही रखुमादेवी बाही। पीतांबर साई करिती हरी |
| ९९९ | ।।ज्ञा.गा.नि.२३५.५।। | ज्ञानासी कवळु सोपानासी वरु। खेचरा अरुमारु कवळु देतु |
| १००० | ।।ज्ञा.गा.नि.२३५.६।। | निवृत्ति पूर्णिमा भक्तीचा महिमा। नामयासि सीमा भीमातीरीं |
| १००१ | ।।ज्ञा.गा.नि.२३६.१।। | सत्यभामा माये अन्नपूर्णा होये। वेळोवेळां सोय कवळ मुखीं |
| १००२ | ।।ज्ञा.गा.नि.२३६.२।। | राही रखुमाई आदिमाता मोहे। नामा तो उपायें बुझाविती |
| १००३ | ।।ज्ञा.गा.नि.२३६.३।। | घेरे नाम्या ग्रास ब्रह्मीचा गळाला। आवडसि गोपाळा प्रीतीहूनी |
| १००४ | ।।ज्ञा.गा.नि.२३६.४।। | कुर्वाळितो हरि नुघडि तो दृष्टी। सप्रेमाच्या पोटीं अधिक होसी |
| १००५ | ।।ज्ञा.गा.नि.२३६.५।। | धरुनि हनुवटी पाहे कृपादृष्टी। आनंदाचे सृष्टि माजिनामा |
| १००६ | ।।ज्ञा.गा.नि.२३६.६।। | निवृत्ति ज्ञानदेव सोपान चांगा हरी। यांसी परोपरी कवळु देतु |
| १००७ | ।।ज्ञा.गा.नि.२३७.१।। | उघडुनियां दृष्टि नामा पाहे पोटीं। आनंदाचा सृष्टि तया झाली |
| १००८ | ।।ज्ञा.गा.नि.२३७.२।। | घेरे नाम्या कवळु आनंदाचा होसी। तुजमाजि निवासि हरी आहे |
| १००९ | ।।ज्ञा.गा.नि.२३७.३।। | नामा  पसरीं मुख आनंदला तृप्त। कवळु पूर्णभरित हरिराजा |
| १०१० | ।।ज्ञा.गा.नि.२३७.४।। | निवृत्तीनें सेविला कवळु हा हरि। तूंचि चराचरीं दिससी आम्हां |
| १०११ | ।।ज्ञा.गा.नि.२३८.१।। | गोपाळ संवगडे आले वाडेंकोडें। असंख्य बागडे हरिरूपीं |
| १०१२ | ।।ज्ञा.गा.नि.२३८.२।। | बिंबली पंढरी हरीरूपीं सार। अवघाचि शृंगार विठ्ठलराजु |
| १०१३ | ।।ज्ञा.गा.नि.२३८.३।। | कालिया कौशल्य नामदेव जाणे। तेथिलीये खुणे निवृत्तिराजु |
| १०१४ | ।।ज्ञा.गा.नि.२३८.४।। | ज्ञानदेव सोपान जगमित्र नागा। नरहरि वेगा झेलितातो |

| | | |
|---|---|---|
| १०१५ | ।।ज्ञा.गा.नि.२३८.५।। | वैकुंठ सांवळें माजी भक्त मेळे। काला ऐक्य काळें करिताती |
| १०१६ | ।।ज्ञा.गा.नि.२३८.६।। | निवृत्ति पूर्णता घेऊनि उद्धारू। सेविला उदारु हरिराणा |
| १०१७ | ।।ज्ञा.गा.नि.२३९.१।। | तंव आनंदला हरि परिपूर्ण लोटला। मुक्ताई लाधला प्रेमकवळु |
| १०१८ | ।।ज्ञा.गा.नि.२३९.२।। | चांगयाचे मुखीं घालीत कवळु। आपण गोपाळु दयासिंधु |
| १०१९ | ।।ज्ञा.गा.नि.२३९.३।। | दिधलें तें घेईं पूर्णतें तूं होईं। सप्रेमाचे डोहीं संतजन |
| १०२० | ।।ज्ञा.गा.नि.२३९.४।। | नामया विठया नारया लाधलें। गोणाई फावलें अखंडित |
| १०२१ | ।।ज्ञा.गा.नि.२३९.५।। | राहीरखुमाई कुरवंडी करिती। जिवें वोंवाळिती नामयासी |
| १०२२ | ।।ज्ञा.गा.नि.२३९.६।। | निवृत्ति खेंचर ज्ञानदेव हरि। सोपान झडकरी बोलाविला |
| १०२३ | ।।ज्ञा.गा.नि.२४०.१।। | काला तंव निकट श्रीरंग समीप आले। भक्तांचे सोहळे पुरवितु |
| १०२४ | ।।ज्ञा.गा.नि.२४०.२।। | वेणुनादीं आला एकत्र पैं जाला। दहींभातु झेला झेलीतुसे |
| १०२५ | ।।ज्ञा.गा.नि.२४०.३।। | तोचि कवळु घेतु नामयासी देतु। ज्ञानासि भरीतु पूर्णतोषु |
| १०२६ | ।।ज्ञा.गा.नि.२४०.४।। | निवृत्ति सोपान कालवले कालीं। खेंचराची धाली तहानभूक |
| १०२७ | ।।ज्ञा.गा.नि.२४१.१।। | वैष्णवांचा मेळ सकळ मिळाला। विठ्ठलनामें काला पंढरीसीं |
| १०२८ | ।।ज्ञा.गा.नि.२४१.२।। | हरिनाम विनट हरि उच्चारीत। सप्रेमें डुल्लत भक्तजन |
| १०२९ | ।।ज्ञा.गा.नि.२४१.३।। | चालिला सोपान ज्ञानदेव निधी। मुक्ताई गोविंदीं तल्लीनता |
| १०३० | ।।ज्ञा.गा.नि.२४१.४।। | निवृत्ति खेचर परिसा भागवत। आनंदे डुल्लत सनकादिक |
| १०३१ | ।।ज्ञा.गा.नि.२४२.१।। | पांडुरंग हरि माजी भक्तजन। कैसें वृंदावन शोभतुसे |
| १०३२ | ।।ज्ञा.गा.नि.२४२.२।। | ब्रह्मादिक लाठे विमानें अंबरीं। काला तो गजरीं पंढरीये |
| १०३३ | ।।ज्ञा.गा.नि.२४२.३।। | सनकादिक देव देहुढापाउलीं। गोपाळ वाकुली दाविताती |
| १०३४ | ।।ज्ञा.गा.नि.२४२.४।। | पुंडलिक नाचे देवमुनि सर्व। भीमातीरीं देव प्रगटले |
| १०३५ | ।।ज्ञा.गा.नि.२४२.५।। | ज्ञानदेव सोपान विसोबा खेंचर। नरहरी सोनार नाचताती |
| १०३६ | ।।ज्ञा.गा.नि.२४२.६।। | निवृत्ति मुक्ताई चांगदेव गाढा। हरीचा पवाडा झेलिताती |
| १०३७ | ।।ज्ञा.गा.नि.२४३.१।। | आपुलेनि हातें कवळु समर्पी। ब्रह्मार्पण मुखीं ब्रह्मरूपें |
| १०३८ | ।।ज्ञा.गा.नि.२४३.२।। | सोपान सांवता निवृत्ति निधान। यासि जनार्दन कवळु देतु |
| १०३९ | ।।ज्ञा.गा.नि.२४३.३।। | ब्रह्मपद हरि बाह्य अभ्यंतरीं। सर्वत्र श्रीहरि दिसे तया |
| १०४० | ।।ज्ञा.गा.नि.२४३.४।। | देऊनि हस्तक पुशी पीतांबरे। पुसतसे आदरें यथाविधि |

| | | |
|---|---|---|
| १०४१ | ।।ज्ञा.गा.नि.२४३.५।। | राहिरखुमाई कासवी तुसार। अमृत पाझर सर्वांघटीं |
| १०४२ | ।।ज्ञा.गा.नि.२४३.६।। | निवृत्ति खेंचर सोपान सांवता। हरि कवळु देतां तृप्त जाले |
| १०४३ | ।।ज्ञा.गा.नि.२४४.१।। | चांगया लाधलें नामया दिधलें। विठ्या फावलें हरिकृपा |
| १०४४ | ।।ज्ञा.गा.नि.२४४.२।। | प्रेमाचें पुतळे भीमातीरा आले। जयजयकार केलें हरिभक्तीं |
| १०४५ | ।।ज्ञा.गा.नि.२४४.३।। | वैकुंठ आपण भक्तामांजि खेळे। पुंडलिक लीळे खेळतुसे |
| १०४६ | ।।ज्ञा.गा.नि.२४४.४।। | निवृत्ति निवाला आनंदें नाचतु। उन्मनीं भरितु ज्ञानदेव |
| १०४७ | ।।ज्ञा.गा.नि.२४५.१।। | न जाणती कळा कुसरी गोपाळा। नाम हें मंगळा अच्युताचें |
| १०४८ | ।।ज्ञा.गा.नि.२४५.२।। | हेंचि मज द्यावें सप्रेम आपुलें। ध्यातुसें पाउलें एवढ्यासाठीं |
| १०४९ | ।।ज्ञा.गा.नि.२४५.३।। | न मगे नेणे कांहीं याविण आणिक। सप्रेमाची भूक तृष्णा करी |
| १०५० | ।।ज्ञा.गा.नि.२४५.४।। | समर्थाचे घरीं कांहीं नाहीं उणें । अखंड प्रेम देणें कृष्णनामीं |
| १०५१ | ।।ज्ञा.गा.नि.२४५.५।। | इतुकेंचि दातारा पुरवीं माझें कोड। यावीण काबाड भार नेघें |
| १०५२ | ।।ज्ञा.गा.नि.२४५.६।। | निवृत्ति सप्रेम संजीवनी मूळ। स्मरतां काळवेळ नाहीं नामीं |
| १०५३ | ।।ज्ञा.गा.नि.२४६.१।। | भावभक्ति प्रेम दया शांति क्षमा। अखंडित प्रेमा असों द्यावा |
| १०५४ | ।।ज्ञा.गा.नि.२४६.२।। | सर्वभूतीं भजन करावें सर्वथा। रामनाम कथा आरंभाव्या |
| १०५५ | ।।ज्ञा.गा.नि.२४६.३।। | आपपर देहीं विचार करावा। हरिनामें दोहावा सर्वांरूपीं |
| १०५६ | ।।ज्ञा.गा.नि.२४६.४।। | निवृत्तीचें जाप्य आनु नाहीं चित्तीं। रामनामें तृप्ती सदा असे |
| १०५७ | ।।ज्ञा.गा.नि.२४७.१।। | जनीं जनार्दन हाचि भावो दृढ। अवघेंचि गूढ नारीजना |
| १०५८ | ।।ज्ञा.गा.नि.२४७.२।। | जडमूढ तरती हरिनाम छंदें । एकानाम पदें वैकुंठ रया |
| १०५९ | ।।ज्ञा.गा.नि.२४७.३।। | सत्वर उच्चार रामनाम चित्तीं। संसारखंती नाहीं तया |
| १०६० | ।।ज्ञा.गा.नि.२४७.४।। | निवृत्ति सत्पद् इच्छित सर्वदा। भिन्न भेद कदा नाहीं चित्तीं |
| १०६१ | ।।ज्ञा.गा.नि.२४८.१।। | हरि प्रेम नित्या ज्यासी पैं वसे। सर्वघटीं दिसे हरि आम्हां |
| १०६२ | ।।ज्ञा.गा.नि.२४८.२।। | रामकृष्णमाळा नित्य जप करी। तयासी संसारीं सुख आहे |
| १०६३ | ।।ज्ञा.गा.नि.२४८.३।। | अंतींचिये वेळे रामनाम जोडी। वैकुंठ परवडी तया नरा |
| १०६४ | ।।ज्ञा.गा.नि.२४८.४।। | निवृत्ति अखंड हरिध्यान चित्तीं। संसार समाप्ति जाली तया |
| १०६५ | ।।ज्ञा.गा.नि.२४९.१।। | नाम मुखीं सदा तोचि पैं भाग्याचा। तयासी यमाचा धाक नाहीं |
| १०६६ | ।।ज्ञा.गा.नि.२४९.२।। | रामराम हरि सर्वकाळ वसे । तेथेंचि वसे बसे हरी |

| | | |
|---|---|---|
| १०६७ | ।।ज्ञा.गा.नि.२४९.३।। | हरिध्यान वसे अखंड पैं सर्वदा। न पवे तो आपदा इये जनीं |
| १०६८ | ।।ज्ञा.गा.नि.२४९.४।। | निवृत्ति समता हरिभजन करी। सर्वत्र कामारी ऋद्धिसिद्धी |
| १०६९ | ।।ज्ञा.गा.नि.२५०.१।। | आशा पिपाशा नेघों पैं चित्तीं। एका नामें तृप्ति सर्वकाळ |
| १०७० | ।।ज्ञा.गा.नि.२५०.२।। | रामराम नाम आम्हांसी अखंड। नेणों पैं पाषांड नानामतें |
| १०७१ | ।।ज्ञा.गा.नि.२५०.३।। | हरिनाम वाचे सार मंत्र आम्हां। अखंडित प्रेमा वसे चित्तीं |
| १०७२ | ।।ज्ञा.गा.नि.२५०.४।। | निवृत्ति संचित गयनी पैं सांगे। एका श्रीरंगें जोडी करा |
| १०७३ | ।।ज्ञा.गा.नि.२५१.१।। | ज्याचे मुखीं नाम अमृतसरिता। तोचि येकु पुरता घटु जाणा |
| १०७४ | ।।ज्ञा.गा.नि.२५१.२।। | नामाचेनि बळें कळिकाळ आपणां। ब्रह्मांडा येसणा तोचि होय |
| १०७५ | ।।ज्ञा.गा.नि.२५१.३।। | न पाहे यम काळ तयाकडे अवचिता। नामाची सरिता ज्याचे मुखीं |
| १०७६ | ।।ज्ञा.गा.नि.२५१.४।। | निवृत्ति नामामृत उच्चारी रामनाम। नित्यता परब्रह्म याचे घरीं |
| १०७७ | ।।ज्ञा.गा.नि.२५२.१।। | नित्य नाम वाचे तोचि एक धन्य। त्याचेचि शुद्ध पुण्य इये जनीं |
| १०७८ | ।।ज्ञा.गा.नि.२५२.२।। | रामनामांकित नित्य नाम वाचे। दहन पापाचें एका नामें |
| १०७९ | ।।ज्ञा.गा.नि.२५२.३।। | ऐसा जो नित्यता पढतसे नाम। नाहीं तया सम दुजें कांहीं |
| १०८० | ।।ज्ञा.गा.नि.२५२.४।। | निवृत्ति अव्यक्त रामनाम जपे। नित्यता सोहपें रामनाम |
| १०८१ | ।।ज्ञा.गा.नि.२५३.१।। | अखंड जपतु नाममंत्र वाचे। त्याहूनि दैवाचे कोण भूमीं |
| १०८२ | ।।ज्ञा.गा.नि.२५३.२।। | अमृतीं राहिला त्यासि कायसें मरण। नित्यता शरण हरिचरणा |
| १०८३ | ।।ज्ञा.गा.नि.२५३.३।। | नाममंत्रराशि अनंत पुण्य त्यासी। नाहीं पैं भाग्यासी तयाहूनी |
| १०८४ | ।।ज्ञा.गा.नि.२५३.४।। | निवृत्ति म्हणे सार रामनाम मंत्रु। कैचा त्यासि शत्रु जितीं जनीं |
| १०८५ | ।।ज्ञा.गा.नि.२५४.१।। | नाम नाहीं वाचे तो नर निदैव। कैसेनी दैव फावेल तया |
| १०८६ | ।।ज्ञा.गा.नि.२५४.२।। | जपे नाम वाचे 'रामनाम पाठें। जाशील वैकुंठे हरि म्हणतां |
| १०८७ | ।।ज्ञा.गा.नि.२५४.३।। | न पाहे पैं दृष्टी कळिकाळ तुज। रामनाम बीज मंत्रसार |
| १०८८ | ।।ज्ञा.गा.नि.२५४.४।। | निवृत्ति म्हणे नाम जपावें नित्यता। आपणची तत्त्वता होईल हरी |
| १०८९ | ।।ज्ञा.गा.नि.२५५.१।। | नामाचेनि बळें तारिजे संसार। आणिक विचार करूं नको |
| १०९० | ।।ज्ञा.गा.नि.२५५.२।। | नाम जपे वेगीं म्हणे हरी हरी। प्रपंच बोहरी आपेआप |
| १०९१ | ।।ज्ञा.गा.नि.२५५.३।। | नित्यता भजन देवद्विज करी। नाम हें उच्चारी रामनाम |
| १०९२ | ।।ज्ञा.गा.नि.२५५.४।। | निवृत्ति जपतु रामनाम वाचे। दहन पापाचें आपेआप |

| | | |
|---|---|---|
| १०९३ | ।।ज्ञा.गा.नि.२५६.१।। | नलगे मंत्रसार न लगति तपें। रामनाम सोहपें मूळ मंत्र |
| १०९४ | ।।ज्ञा.गा.नि.२५६.२।। | रामनाम मंत्र जप तूं रे जना। तुटेल यांतना भवमूळ |
| १०९५ | ।।ज्ञा.गा.नि.२५६.३।। | ज्याचेनि स्मरणें तरली पैं गणिका। वैकुंठ लोका प्राप्त जाली |
| १०९६ | ।।ज्ञा.गा.नि.२५६.४।। | निवृत्ति म्हणे नाम हेंचि सार तप। जपकारे अमूप निरंतर |
| १०९७ | ।।ज्ञा.गा.नि.२५७.१।। | वेगु करी मना धरावें पैं सार। नामाचि आचार रामनामें |
| १०९८ | ।।ज्ञा.गा.नि.२५७.२।। | तरसी रे जना स्मरतां नामावळी। राहसि आढळीं वैकुंठीं रया |
| १०९९ | ।।ज्ञा.गा.नि.२५७.३।। | सार तेंचि धरी असार तें निवडी। वैकुंठ चढोवढी रामनामें |
| ११०० | ।।ज्ञा.गा.नि.२५७.४।। | निवृत्ति म्हणे सिद्ध असतां पैं मंत्रु। रामनामें शत्रु नाशतील |
| ११०१ | ।।ज्ञा.गा.नि.२५८.१।। | नामाचेनि स्मरणें नित्यता पारणें। तेंवि विठ्ठल नामनाणें पंढरीये |
| ११०२ | ।।ज्ञा.गा.नि.२५८.२।। | विठ्ठल विठ्ठल मंत्र हेंचि निजशास्त्र। विचारितां सर्वत्र दुजें नाहीं |
| ११०३ | ।।ज्ञा.गा.नि.२५८.३।। | नामेंविण मूर्ख नित्य पैं तया दुःख। नामें शुकमुख नित्य सदा |
| ११०४ | ।।ज्ञा.गा.नि.२५८.४।। | निवृत्तीचें जाप्य विठ्ठल नामपाठ। एका नामें पाप कोटि जाय |
| ११०५ | ।।ज्ञा.गा.नि.२५९.१।। | रामनाम नित्य अखंड पैं चित्तीं। तयाचे पुरती सर्व काम |
| ११०६ | ।।ज्ञा.गा.नि.२५९.२।। | रामराम नामें तुटती संसार। नाहीं त्या येरझार योनिमाळे |
| ११०७ | ।।ज्ञा.गा.नि.२५९.३।। | हरिध्यान आम्हां हाचि मंत्र थोर। न करी विचार अन्यशास्त्रीं |
| ११०८ | ।।ज्ञा.गा.नि.२५९.४।। | निवृत्ति अखंड जपतुसे नाम। हृदयीं सप्रेम मूर्ति त्याची |
| ११०९ | ।।ज्ञा.गा.नि.२६०.१।। | हरिवीण दैवत नाहीं पैं अनुचित्तीं। अखंड श्रीपति नाम वाचे |
| १११० | ।।ज्ञा.गा.नि.२६०.२।। | रामकृष्ण मूर्ती या जपा आवृत्ति। नित्य नामें तृप्ती जाली आम्हां |
| ११११ | ।।ज्ञा.गा.नि.२६०.३।। | नामाचेनि स्मरणें नित्य पैं सुस्नात। दुजियाची मात नेणो आम्हीं |
| १११२ | ।।ज्ञा.गा.नि.२६०.४।। | निवृत्ति जपतु अखंड नामावळी। हृदयकमळीं केशीराज |
| १११३ | ।।ज्ञा.गा.नि.२६१.१।। | परापवाद कानीं परनिंदा झणीं। ऐकतां निजमौनी कृष्ण जप |
| १११४ | ।।ज्ञा.गा.नि.२६१.२।। | हरी हरी म्हणे नायके ते मातु। द्वैत तया आंतु नेघे बापा |
| १११५ | ।।ज्ञा.गा.नि.२६१.३।। | दुजियाची निंदा अपवाद सदा। वाचेसि गोविंदा जप करी |
| १११६ | ।।ज्ञा.गा.नि.२६१.४।। | निवृत्ति तत्पर नाइके ते शब्द। नित्यता गोविंद जपतसे |
| १११७ | ।।ज्ञा.गा.नि.२६२.१।। | परनिंदा झणीं परपीडा जनीं। नित्यता कीर्तनीं हरि जपे |
| १११८ | ।।ज्ञा.गा.नि.२६२.२।। | उच्चार पापाचा विभाग ये त्याचा । वेगें हरि वाचा जपे रया |

| | | |
|---|---|---|
| ११११९ | ।।ज्ञा.गा.नि.२६२.३।। | दुजिया पिडणें द्वैत तेंचि जाण। अद्वैत ते खूण हरी एकु |
| ११२० | ।।ज्ञा.गा.नि.२६२.४।। | निवृत्ति तटाक सर्व कृष्ण एक। अद्वैत हे लेख ब्रह्म सत्य |
| ११२१ | ।।ज्ञा.गा.नि.२६३.१।। | मीपण कळलें तूंपण सांडिलें । कल्पने तोडिलें मुळींहुनी |
| ११२२ | ।।ज्ञा.गा.नि.२६३.२।। | मुळ तें नुगवे फळ तें निमालें। हरि हें घेतलें जीवन हेतु |
| ११२३ | ।।ज्ञा.गा.नि.२६३.३।। | जालों पैं सरता हरिनाम पाठें। नेतसे वैकुंठे गुरुकृपा |
| ११२४ | ।।ज्ञा.गा.नि.२६३.४।। | निवृत्ति गयनी नाम नारायणीं। अखंडता ध्वनी रामनाम |
| ११२५ | ।।ज्ञा.गा.नि.२६४.१।। | कामना कामीकु वासना तार्किकु। रजतम सात्विकु एकरूपें |
| ११२६ | ।।ज्ञा.गा.नि.२६४.२।। | तें हें कृष्णमय कृष्णनामें बळें । भक्तीभाव निखळे पोखितसे |
| ११२७ | ।।ज्ञा.गा.नि.२६४.३।। | नित्य ते अनित्य आपणचि सत्य। कार्याकारण कृत्य हरपे जेथें |
| ११२८ | ।।ज्ञा.गा.नि.२६४.४।। | निवृत्तीचें ध्यान धारणा विसर। सर्व रूपें घर वैकुंठ माझें |
| ११२९ | ।।ज्ञा.गा.नि.२६५.१।। | भवसागर सार तरणोपाव सोपा। कृष्णनामें खेपा हरती जनां |
| ११३० | ।।ज्ञा.गा.नि.२६५.२।। | रामकृष्ण मंत्र जनांसि उद्धार। आणिक हे साचार मार्ग नाहीं |
| ११३१ | ।।ज्ञा.गा.नि.२६५.३।। | निष्काम कल्पना आधीं साधीं मना। ऐक्य समीरणा हेंचि करीं |
| ११३२ | ।।ज्ञा.गा.नि.२६५.४।। | निवृत्ति धारणा गुरुचरण खुणा। ब्रह्मांड त्या खुणा गुरुकृपा |
| ११३३ | ।।ज्ञा.गा.नि.२६६.१।। | न लगती धनें असार संपत्ती। वायांचि गुंफती वासना रया |
| ११३४ | ।।ज्ञा.गा.नि.२६६.३।। | सार हरिनाम सार हरिनाम। नित्यता सप्रेम जपों गेलें |
| ११३५ | ।।ज्ञा.गा.नि.२६६.४।। | निवृत्ति तत्पर रामनाम चित्तीं। एकानामें तृप्ति सर्वकाळ |
| ११३६ | ।।ज्ञा.गा.नि.२६७.१।। | शांतीचें भजन क्षमेचा कळवळा। गोपाळ सकळां देहीं नांदे |
| ११३७ | ।।ज्ञा.गा.नि.२६७.२।। | आचार पवित्र नामाचि पैं पात्र। सांठविलें अक्षर दों अक्षरीं |
| ११३८ | ।।ज्ञा.गा.नि.२६७.३।। | रूपाचें सगुण निर्गुण दाटलें। नामेंचि आटलें मोहजाळ |
| ११३९ | ।।ज्ञा.गा.नि.२६७.४।। | निवृत्ति पडळ उडालें तें भान। गयनीनें ज्ञान उपदेशिलें |
| ११४० | ।।ज्ञा.गा.नि.२६८.१।। | रामनाम मुखीं तो एक संसार। येऱ्हवीं अघोर नरक रया |
| ११४१ | ।।ज्ञा.गा.नि.२६८.२।। | संसार नरक रामनाम सार। तरले पामर पतित देखा |
| ११४२ | ।।ज्ञा.गा.नि.२६८.३।। | अजामेळा ऐसा तरला पतित। नारायण त्वरित आले तेथें |
| ११४३ | ।।ज्ञा.गा.नि.२६८.४।। | उघडा मंत्र मार्ग गोविंद स्मरणें। रामनामकीर्तन मोक्षपद |
| ११४४ | ।।ज्ञा.गा.नि.२६८.५।। | निवृत्ति संचीत रामनाम महिमा। अवधीच पौर्णिमा सोळा कळीं |

| | | |
|---|---|---|
| ११४५ | ।।ज्ञा.गा.नि.२६९.१।। | शून्य साकार घटीं जीव शील काष्टीं। मीपणासि तुटी एक्यानामें |
| ११४६ | ।।ज्ञा.गा.नि.२६९.२।। | तें हें नाम सोपें रामकृष्णमाळ। यासि काळवेळ नाहीं नाहीं |
| ११४७ | ।।ज्ञा.गा.नि.२६९.३।। | शून्य हेंही ठाये जीव जाये शिवीं। मन हें माधवीं हारपत |
| ११४८ | ।।ज्ञा.गा.नि.२६९.४।। | निवृत्ति निमग्न शून्याकार घट। गुरुनामें मठ तेथें केला |
| ११४९ | ।।ज्ञा.गा.नि.२७०.१।। | रामराम जप समत्वें साधावा। अहंकार टाकावा अहंबुद्धी |
| ११५० | ।।ज्ञा.गा.नि.२७०.२।। | सुटसी रे नामें आपेंआप संभ्रमें। नित्य नाम नेमें जप तूं जाये |
| ११५१ | ।।ज्ञा.गा.नि.२७०.३।। | देवेंविण नाहीं सर्व शास्त्र बोले। हरिरूपीं बोधले तेचि धन्य |
| ११५२ | ।।ज्ञा.गा.नि.२७०.४।। | सुखावरी सुख निसंग रे आचरे। केशव निर्धारें तुष्टे सदा |
| ११५३ | ।।ज्ञा.गा.नि.२७०.५।। | निवृत्ति म्हणे होईल अगाध। एकनामें गोविंद तुष्टे सदा |
| ११५४ | ।।ज्ञा.गा.नि.२७१.१।। | प्रल्हाद परीक्षिती ध्रुव बाळ म्हणती। उपमन्यूची गती क्षीरसागरीं |
| ११५५ | ।।ज्ञा.गा.नि.२७१.२।। | भक्त हे तरले नामाचेनि बळें। कळिकाळासि खेळे दों अक्षरीं |
| ११५६ | ।।ज्ञा.गा.नि.२७१.३।। | आदि अंबऋषी भक्त निजसखा। दों अक्षरीं लेखा केला तेणें |
| ११५७ | ।।ज्ञा.गा.नि.२७१.४।। | उद्धव अक्रूर आणि तो  विदूर। दों अक्षरीं पार उतरलें |
| ११५८ | ।।ज्ञा.गा.नि.२७१.५।। | हनुमंत दास रामनामें उदास। कळिकाळासी भाष सांगतसे |
| ११५९ | ।।ज्ञा.गा.नि.२७१.६।। | द्रौपदी सुभद्रा गोपाळ गोपिका। बळीभद्र सखा दों अक्षरीं |
| ११६० | ।।ज्ञा.गा.नि.२७१.७।। | नंद तो वसुदेव उग्रसेन राजा। यादव पैं पैजा दों अक्षरीं |
| ११६१ | ।।ज्ञा.गा.नि.२७१.८।। | निवृत्ति म्हणे ते अक्षर दोनी राम। जपतां पावे धाम वैकुंठीचें |
| ११६२ | ।।ज्ञा.गा.नि.२७२.१।। | पुंडलिक सुख सांगतां अशेख। दिनकाळ हरिख कोंदाटला |
| ११६३ | ।।ज्ञा.गा.नि.२७२.२।। | तें रूप सेविती मुनिजन साधु। विठ्ठलनामें कंदु तुटे जनां |
| ११६४ | ।।ज्ञा.गा.नि.२७२.३।। | नित्यता कीर्तन तुटेल बंधन। आत्माराम घन तुष्टेल जना |
| ११६५ | ।।ज्ञा.गा.नि.२७२.४।। | विवेक वैराग्य ज्ञानाचें सौभाग्य। नित्यता आरोग्य हरिनामें |
| ११६६ | ।।ज्ञा.गा.नि.२७२.५।। | पर्वणीचें सार विठ्ठल उच्चार। नित्यता आचार विठ्ठलनामें |
| ११६७ | ।।ज्ञा.गा.नि.२७२.६।। | निवृत्ति घनवट विठ्ठलनाम पेठ। नित्यता वैकुंठ पंढरीये |
| ११६८ | ।।ज्ञा.गा.नि.२७३.१।। | हरिवीण चित्तीं न धरी विपरीत। तरताती पतीत रामनामें |
| ११६९ | ।।ज्ञा.गा.नि.२७३.२।। | विचारूनी पाहा ग्रंथ हे अवघे। जेथें तेथें सांगे रामनाम |
| ११७० | ।।ज्ञा.गा.नि.२७३.३।। | व्यासादिक भले रामनाम पाठी। नित्यता वैकुंठीं तया घर |

| | | |
|---|---|---|
| ११७१ | ।।ज्ञा.गा.नि.२७३.४।। | शुकादिक मुनि विरक्त संसारीं। रामनाम निर्धारी उच्चारिलें |
| ११७२ | ।।ज्ञा.गा.नि.२७३.५।। | चोरटा वाल्मिक रामनामीं रत। तोही एक सरत रामनामीं |
| ११७३ | ।।ज्ञा.गा.नि.२७३.६।। | निवृत्ति साचार रामनामीं दृढ। अवघेंचि गूढ उगविलें |
| ११७४ | ।।ज्ञा.गा.नि.२७४.१।। | सर्वभूतीं दया शांति पैं निर्धारी। तो योगी साचार जनीं इये |
| ११७५ | ।।ज्ञा.गा.नि.२७४.२।। | नलगे मुंडणें काया हें दंडणें। अखंड कीर्तनें स्मरे हरी |
| ११७६ | ।।ज्ञा.गा.नि.२७४.३।। | शिव जाणे जीवीं क्षरला चैतन्य। हें जीवीं कारुण्य सदाभावी |
| ११७७ | ।।ज्ञा.गा.नि.२७४.४।। | गगनीं सूर्य तपे अनंत तारा लोपे। एकुचि स्वरूपें आत्मा तैसा |
| ११७८ | ।।ज्ञा.गा.नि.२७४.५।। | उगवला कळीं उल्हासु कमळीं। तैसा तो मंडळीं चंद्र देखा |
| ११७९ | ।।ज्ञा.गा.नि.२७४.६।। | निवृत्तिमंडळ अमृत सकळ। घेतलें रसाळ हरिनाम |
| ११८० | ।।ज्ञा.गा.नि.२७५.१।। | गगनीचि तारा वायो वसे सैरा। गगन गाभारा स्थिर होय |
| ११८१ | ।।ज्ञा.गा.नि.२७५.२।। | अवचित गगनीं वर्षे पैं संपूर्ण। आपणचि पतन तारा पावे |
| ११८२ | ।।ज्ञा.गा.नि.२७५.३।। | निवृत्ति तारा त्यापरी विचारा। रामनाम खरा तरावया |
| ११८३ | ।।ज्ञा.गा.नि.२७६.१।। | द्वैताची वाढी अद्वैत सुरवाडी। नामाची परवडी आम्हां घरीं |
| ११८४ | ।।ज्ञा.गा.नि.२७६.२।। | नाम थोर आम्हां जपूं पैं साचार। विठ्ठल विचार ह्रदया माजी |
| ११८५ | ।।ज्ञा.गा.नि.२७६.३।। | निवृत्ति स्वानंदें विठ्ठलीं आनंद। नित्य परमानंद ह्रदयामाजी |
| ११८६ | ।।ज्ञा.गा.नि.२७७.१।। | अचेत आत्मा चेतविला साचा। प्रबोध नामाचा रामनामीं |
| ११८७ | ।।ज्ञा.गा.नि.२७७.२।। | हें सुख साचार निरंतर सर्वी। एकतत्त्वीं भावीं आचरण |
| ११८८ | ।।ज्ञा.गा.नि.२७७.३।। | निवृत्ति म्हणे आत्मा हाचि पैं विठ्ठल। नाहीं बहुसाल कर्मकांड |
| ११८९ | ।।ज्ञा.गा.नि.२७८.१।। | रूप ध्यावो ध्यानीं आईकों पैं कीर्तनीं। पारणें श्रवणीं नयनाचिये |
| ११९० | ।।ज्ञा.गा.नि.२७८.२।। | ह्रदयीं विठ्ठलु ध्याता निरंतरु। वैकुंठ साचारु प्राणियांसी |
| ११९१ | ।।ज्ञा.गा.नि.२७८.३।। | अनंत जन्माचें प्रायश्चित्त हरी। विठ्ठल साजिरी ब्रीदावळी |
| ११९२ | ।।ज्ञा.गा.नि.२७८.४।। | निवृत्ति साधन रूप ध्यान ध्यानीं। मनाची उन्मनि हरिचरणीं |
| ११९३ | ।।ज्ञा.गा.नि.२७९.१।। | ध्यान धरा हरी विश्रांति नामाची । विठ्ठलीं साची मनोवृत्ति |
| ११९४ | ।।ज्ञा.गा.नि.२७९.२।। | ध्यानेंविण मन विश्रांतिविण स्थान। सूर्येविण गगन शून्य दिसे |
| ११९५ | ।।ज्ञा.गा.नि.२७९.३।। | नलगे साकार विठ्ठल मनोवृत्ति । प्रपंच समाप्ति ती अक्षरीं |
| ११९६ | ।।ज्ञा.गा.नि.२७९.४।। | निवृत्ति समता विठ्ठल कीर्तन । करितां अनुदिन मनमेळे |

| | | |
|---|---|---|
| ११९७ | ।।ज्ञा.गा.नि.२८०.१।। | हरिवीण भावो तो वायांचि संदेहो। हरिदेवा देवो आहे सत्य |
| ११९८ | ।।ज्ञा.गा.नि.२८०.२।। | हरिवीण वाचे ऐसें जया साचे। नाहीं त्या यमाचे मोहोजाळ |
| ११९९ | ।।ज्ञा.गा.नि.२८०.३।। | हरिवीण सार नाहीं पैं निर्धार। हरिवीण पार न पविजे |
| १२०० | ।।ज्ञा.गा.नि.२८०.४।। | निवृत्ति श्रीहरी चिंतिता निरंतरी। हरि एकु अंतरीं सर्वी नांदे |
| १२०१ | ।।ज्ञा.गा.नि.२८१.१।। | नाममंत्रसार नित्य निरंतर। येणेंचि संसार तरे जाणा |
| १२०२ | ।।ज्ञा.गा.नि.२८१.२।। | एकेवीण दुजें नाहीं नाहीं सहजें। नाम मुखें भोजे घेईजेसु |
| १२०३ | ।।ज्ञा.गा.नि.२८१.३।। | निवृत्ति म्हणे पारु विठ्ठलीं उच्चारु । तयाचा संसारू मोक्षरूप |
| १२०४ | ।।ज्ञा.गा.नि.२८२.१।। | मोक्षाचेनि देठें मोहपाशा गिळी। कैसेनि गोपाळीं सत्ता होय |
| १२०५ | ।।ज्ञा.गा.नि.२८२.२।। | मोहाचें मोहन चिंतिता श्रीहरि। बाहिजु भीतरीं अवघा होय |
| १२०६ | ।।ज्ञा.गा.नि.२८२.३।। | दिननिशीं नाम जपतां श्रीहरीचें। मग या मोहाचें मोहन नाहीं |
| १२०७ | ।।ज्ञा.गा.नि.२८२.४।। | निवृत्ति आगम मोहन साधन । सर्व नारायण एकातत्त्वें |
| १२०८ | ।।ज्ञा.गा.नि.२८३.१।। | प्रवृत्ति निवृत्ति या दोन्ही सहज। जनीं वनीं काज करूनी असती |
| १२०९ | ।।ज्ञा.गा.नि.२८३.२।। | नारायणनाम जपतांचि दोन्ही। एकतत्वींकरणीं सांगिजे गुज |
| १२१० | ।।ज्ञा.गा.नि.२८३.३।। | आशेचे विलास गुंफोनि महिमा। तत्त्वीं तत्त्व सीमा निजज्ञानें |
| १२११ | ।।ज्ञा.गा.नि.२८३.४।। | निवृत्ति तत्त्वता मनाचें मोहन। नित्य समाधान रामनामें |
| १२१२ | ।।ज्ञा.गा.नि.२८४.१।। | सम सुखाचें विषम मोहाचें। द्वैत पापाचें घेसी झणीं |
| १२१३ | ।।ज्ञा.गा.नि.२८४.२।। | समसेज बाज सर्वत्र रे भोगी। एकरूप जगीं हरी नांदे |
| १२१४ | ।।ज्ञा.गा.नि.२८४.३।। | स्वरूप सुलभु हरि माझा लाठा। नामेंचि वैकुंठा नेतु असे |
| १२१५ | ।।ज्ञा.गा.नि.२८४.४।। | निवृत्ति दिवटा सर्वकाळ जपे। वैकुंठ सोपें एक्यानामें |
| १२१६ | ।।ज्ञा.गा.नि.२८५.१।। | नामामृत पिक हेंचि घेई सुख। नलगती शोक जन्ममृत्यूचे |
| १२१७ | ।।ज्ञा.गा.नि.२८५.२।। | रामनामकथा साधि कां परमार्था। पावसील पैं हिता नाम घेतां |
| १२१८ | ।।ज्ञा.गा.नि.२८५.३।। | विश्व हें पैं अंध मायेचें विशद। नेणे अर्थभेद तरुणोपाय |
| १२१९ | ।।ज्ञा.गा.नि.२८५.४।। | निवृत्ति म्हणे रूप तें प्रकाशलें दीप। पंढरिसमीप भीमातीरीं |
| १२२० | ।।ज्ञा.गा.नि.२८६.१।। | हरिवीण भाव तो सर्वचि व्यर्थ। हरि हा समर्थ भाव थोर |
| १२२१ | ।।ज्ञा.गा.नि.२८६.२।। | रामकृष्णनाम हाचि थोर उच्चार। भावा भाव सार एका नामें |
| १२२२ | ।।ज्ञा.गा.नि.२८६.३।। | नित्य नाम घोष उच्चारितां वाचे। यम काळ साचे वंदी तया |

| | | |
|---|---|---|
| १२२३ | ।।ज्ञा.गा.नि.२८६.४।। | निवृत्ति स्मरतु रामनाम भाव। सर्व एक देव चाड आम्हां |
| १२२४ | ।।ज्ञा.गा.नि.२८७.१।। | मन गेलें देवीं ध्यान गेलें रूपीं। राहिलें स्वरूपीं तल्लीन देखा |
| १२२५ | ।।ज्ञा.गा.नि.२८७.२।। | सुखदु:ख नाहीं सुखद:ख नाहीं। नाम मात्र पाहीं हरी वोळे |
| १२२६ | ।।ज्ञा.गा.नि.२८७.३।। | एकतत्त्व सार रामनाम सुख। नलगे ते भूक प्रपंचाची |
| १२२७ | ।।ज्ञा.गा.नि.२८७.४।। | निवृत्ति सत्वर उच्चारण नाम। वैकुंठधाम तया देहीं |
| १२२८ | ।।ज्ञा.गा.नि.२८८.१।। | एक तत्त्व हरि असे असे पैं सर्वत्र। ऐसें सर्व शास्त्र बोलियेलें |
| १२२९ | ।।ज्ञा.गा.नि.२८८.२।। | हरिनामें उद्धरे हरिनामें उद्धरे । वेगीं हरि त्वरें उच्चारी जो |
| १२३० | ।।ज्ञा.गा.नि.२८८.३।। | जपतां पैं नाम यम काळ कांपे। हरी हरी सोपें जपिजेसु |
| १२३१ | ।।ज्ञा.गा.नि.२८८.४।। | निवृत्ति म्हणे हरि नामपाठ जपा। जन्मांतर खेपा अंतरती |
| १२३२ | ।।ज्ञा.गा.नि.२८९.१।। | जपतां कुंटिणी उतरे विमान। नाम नारायण आलें मुखा |
| १२३३ | ।।ज्ञा.गा.नि.२८९.२।। | नारायण नाम तारक आम्हां। नेणों पैं महिमा अन्य तत्त्वीं |
| १२३४ | ।।ज्ञा.गा.नि.२८९.३।। | तारिले पतीत नारायण नामें। उद्धरिलें प्रेमें हरिभक्त |
| १२३५ | ।।ज्ञा.गा.नि.२८९.४।। | निवृत्ति उच्चार नारायणनाम। दिननिशीं प्रेम हरी हरी |
| १२३६ | ।।ज्ञा.गा.नि.२९०.१।। | उपरति मनाची साधन विदेही। तारिजेल बाही रामनामें |
| १२३७ | ।।ज्ञा.गा.नि.२९०.२।। | हरिवीण सुटिजे ऐसें नाहीं बोलिलें । सर्वही शोधिलें शास्त्र आम्हीं |
| १२३८ | ।।ज्ञा.गा.नि.२९०.३।। | द्वैताची हे वाढी प्रपंचाच्या घरीं। अद्वैत कामारी भोगिजेसु |
| १२३९ | ।।ज्ञा.गा.नि.२९०.४।। | निवृत्तीचें सार हरी हरी निर्मळ। साधन केवळ हरिपाठें |
| १२४० | ।।ज्ञा.गा.नि.२९१.१।। | एकेवीण दुजें नाहीं पैं सृष्टी। हें ध्यान किरिटी दिधलें हरी |
| १२४१ | ।।ज्ञा.गा.नि.२९१.२।। | नित्यता श्रीहरी जनीं पैं भरला। द्वैताचा अबोला तया घरीं |
| १२४२ | ।।ज्ञा.गा.नि.२९१.३।। | हरीविणें देवो नाहीं नाहीं जनीं। अखंड पर्वणी हरि जपतां |
| १२४३ | ।।ज्ञा.गा.नि.२९१.४।। | निवृत्ति साकार हरिनाम पाठ। नित्यता पैं वाट हरिपाठें |
| १२४४ | ।।ज्ञा.गा.नि.२९२.१।। | हरिमार्ग सार येणेंचि तरिजे। येऱ्हवीं उमजे संसार रया |
| १२४५ | ।।ज्ञा.गा.नि.२९२.२।। | जपतां श्रीहरी मोक्ष नांदे नित्य। तरले पैं सत्य हरिनामें |
| १२४६ | ।।ज्ञा.गा.नि.२९२.३।। | काय हें ओखद रामनाम अमृत। हरिनामें तृप्त करी रया |
| १२४७ | ।।ज्ञा.गा.नि.२९२.४।। | निवृत्ति साचार हरिनाम जपतु। नित्य हृदयांतु हरी हरी |
| १२४८ | ।।ज्ञा.गा.नि.२९३.१।। | संसार सुफळ हरिनाम उच्चारितां। येऱ्हवीं मरतां अधोगति |

| | | |
|---|---|---|
| १२४९ | ।।ज्ञा.गा.नि.२९३.२।। | संसार असारु श्रीपति साचारू। नामेंवीण पारू न पविजे |
| १२५० | ।।ज्ञा.गा.नि.२९३.३।। | हरिहरि म्हणतां उतरले पार। दुर्धर संसार तरले रया |
| १२५१ | ।।ज्ञा.गा.नि.२९३.४।। | निवृत्तीचा जप हरी हा उच्चार। संसारसागर तारक हरी |
| १२५२ | ।।ज्ञा.गा.नि.२९४.१।। | राम नाम वाचे तोचि एक धन्य। त्याचेंचि शुद्ध पुण्य इये जनीं |
| १२५३ | ।।ज्ञा.गा.नि.२९४.२।। | रामनामांकित नित्य मंत्र ज्याचे। दहन पापाचें एका नामें |
| १२५४ | ।।ज्ञा.गा.नि.२९४.३।। | ऐसा जो नित्यता पढतसे नाम। नाहीं तया सम दुजें कांहीं |
| १२५५ | ।।ज्ञा.गा.नि.२९४.४।। | निवृत्ति अव्यक्त रामनाम जपे। नित्यता सोहपें रामनाम |
| १२५६ | ।।ज्ञा.गा.नि.२९५.१।। | सर्वरूपें हरी ऐसें मन करी। वासना प्रहरी नामपाठें |
| १२५७ | ।।ज्ञा.गा.नि.२९५.२।। | रामकृष्ण वाड सर्व हें वैकुंठ। दिसेल प्रकट निजरूपें |
| १२५८ | ।।ज्ञा.गा.नि.२९५.३।। | व्रत तप तीर्थ नाम हें अनंत। माजि सामवत आत्मनार्थी |
| १२५९ | ।।ज्ञा.गा.नि.२९५.४।। | निवृत्ति म्हणे तें नाम रामवदे जप। फळलें संकल्प रामनामें |
| १२६० | ।।ज्ञा.गा.नि.२९६.१।। | विश्वीं हा विश्वात्मा क्षरला असे आत्मा। अहं बोध रामा दूर करी |
| १२६१ | ।।ज्ञा.गा.नि.२९६.२।। | भाव घरीं जनीं विचरे जनार्दनीं। हरिनाम कीर्तनीं सुख भोगी |
| १२६२ | ।।ज्ञा.गा.नि.२९६.३।। | येथुनि हें सर्व आकारलें भाव। रोहिणीची माव ऐसी आहे |
| १२६३ | ।।ज्ञा.गा.नि.२९६.४।। | निवृत्ती सागर सेवी पांडुरंग। रंगे हा श्रीरंग सर्वरंगें |
| १२६४ | ।।ज्ञा.गा.नि.२९७.१।। | शांति क्षमा दया सर्वभावें करुणा। तोचि नारायणा आवडे दासु |
| १२६५ | ।।ज्ञा.गा.नि.२९७.२।। | तोचि एक साधु बोलिजे पैं जनीं। निरंतर ध्यानीं कृष्णमूर्ति |
| १२६६ | ।।ज्ञा.गा.नि.२९७.३।। | जीवशिव एक सर्वत्र चैतन्य। ऐसें जया कारुण्य तोचि धन्य |
| १२६७ | ।।ज्ञा.गा.नि.२९७.४।। | तोचि एक भक्तु हरिहरि म्हणे। नित्य नारायणें तारिजे त्यासी |
| १२६८ | ।।ज्ञा.गा.नि.२९७.५।। | येउनी जनीं सदा पैं तो विदेही। तारकु सबाहीं सप्रेमळु |
| १२६९ | ।।ज्ञा.गा.नि.२९७.६।। | निवृत्ति सांगतु भक्तीचा महिमा। करी शांति क्षमा तो विरळा असे |
| १२७० | ।।ज्ञा.गा.नि.२९८.१।। | हरिदास संगें हरिरूप खेळे। ब्रह्मादिक सोहळे भोगिताती |
| १२७१ | ।।ज्ञा.गा.नि.२९८.२।। | संत मुनिदेव सनकादिक सर्व। तींहीं मनोभाव अर्पियेला |
| १२७२ | ।।ज्ञा.गा.नि.२९८.३।। | पुंडरिकफळ वोळलें सफळ। शंकर सोज्वळ प्रेमें डुले |
| १२७३ | ।।ज्ञा.गा.नि.२९८.४।। | निवृत्ति लोळत चरणरजीं लाठा। माजि त्या वैकुंठा आत्मलिंगीं |
| १२७४ | ।।ज्ञा.गा.नि.२९९.१।। | सोपान संवगडा स्वानंद ज्ञानदेव। मुक्ताईचा भाव विठ्ठलराज |

| | | |
|---|---|---|
| १२७५ | ।।ज्ञा.गा.नि.२९९.२।। | दिंडी टाळघोळ गाती विठ्ठलनाम। खेचरासी प्रेम विठ्ठलाचें |
| १२७६ | ।।ज्ञा.गा.नि.२९९.३।। | नरहरि विठा नारा ते गोणाई। प्रेमभरित डोहीं वोसंडती |
| १२७७ | ।।ज्ञा.गा.नि.२९९.४।। | निवृत्ति प्रगट ज्ञानदेवा सांगे। पुंडलिकसंगें हरी खेळे |
| १२७८ | ।।ज्ञा.गा.नि.३००.१।। | वोळलें दुभतें सर्वांसि पुरतें। प्रेमाचें भरतें वैष्णवांसी |
| १२७९ | ।।ज्ञा.गा.नि.३००.२।। | लोळती चरणीं वैष्णव गोमटे। पुंडलिकपेठे हरी आला |
| १२८० | ।।ज्ञा.गा.नि.३००.३।। | सोपान खेचर ज्ञानदेव लाठा। देताती वैकुंठा क्षेम सदा |
| १२८१ | ।।ज्ञा.गा.नि.३००.४।। | निवृत्तीनें ह्रदयीं पूजिलें तें रूप। प्रत्यक्ष स्वरूप विठ्ठलराज |
| १२८२ | ।।ज्ञा.गा.नि.३०१.१।। | धन्य हा खेचर धन्य हा सोपान। भक्तीचें जीवन जनक हेतु |
| १२८३ | ।।ज्ञा.गा.नि.३०१.२।। | धन्य याचें कूळ पवित्र कुशळ। नित्य या गोपाळ जवळी असे |
| १२८४ | ।।ज्ञा.गा.नि.३०१.३।। | याचेनि स्मरणें नाशती दारुणें। कैवल्य पावणें ब्रह्यामाजि |
| १२८५ | ।।ज्ञा.गा.नि.३०१.४।। | निवृत्ति ह्मणे परब्रह्म हें साकार। तेथील अंकूर उमटले |
| १२८६ | ।।ज्ञा.गा.नि.३०२.१।। | कमळाच्या स्कंधी गुणी गुढारलें। वरी आकारलें फूल तया |
| १२८७ | ।।ज्ञा.गा.नि.३०२.२।। | सुमनाचेनि वासें भ्रमर भुलले। मार्ग पैं विसरले इंद्रियांचा |
| १२८८ | ।।ज्ञा.गा.नि.३०२.३।। | तैसे हे संत विठ्ठलीं तृप्त। नित्य पैं निवांत हरिचरणीं |
| १२८९ | ।।ज्ञा.गा.नि.३०२.४।। | नाठवे हे दिन नाठवे निशीं। अखंड आम्हांसि हरिराजा |
| १२९० | ।।ज्ञा.गा.नि.३०२.५।। | तल्लिन प्रेमाचें कल्लोळ अमृतांचे। डिंगर हरीचें राजहंस |
| १२९१ | ।।ज्ञा.गा.नि.३०२.६।। | टाहो करूं धोरु विठ्ठल कीर्तनें। मनाच्या सुमनें हरी पुजूं |
| १२९२ | ।।ज्ञा.गा.नि.३०२.७।। | निवृत्ति निवांत तल्लीन पैं जाला। प्रपंच अबोला हरिसंगें |
| १२९३ | ।।ज्ञा.गा.नि.३०३.१।। | गयनि गहिवरु कृपेचा उद्गारु। वरुषला उदारु अमृतमय |
| १२९४ | ।।ज्ञा.गा.नि.३०३.२।। | तोचि ओघ साचा मुक्ताईसी लाठा। चालिलों वैकुंठा समारंभें |
| १२९५ | ।।ज्ञा.गा.नि.३०३.३।। | कुंचे गरुडटके टाळ श्रुति हरी। चालिलें गजरीं हरिसंगें |
| १२९६ | ।।ज्ञा.गा.नि.३०३.४।। | निवृत्ति वैष्णव सोपान खेचर। करिताती गजर हरिनामाचा |
| १२९७ | ।।ज्ञा.गा.नि.३०४.१।। | देहाच्या दीपकीं एकी वस्तु चोख। असोनियां शोक कां करितोसी |
| १२९८ | ।।ज्ञा.गा.नि.३०४.२।। | देहभरी आत्मा नांदे निरंतर। असतां हा विचार कां धांवतोसी |
| १२९९ | ।।ज्ञा.गा.नि.३०४.३।। | तुझें तूं पाहीं आहे तें घेई। एकरूप होईं गुरुखुणें |
| १३०० | ।।ज्ञा.गा.नि.३०४.४।। | निवृत्तीचें सार हरिरूप सदा। नित्य परमानंदा रातलासे |

| | | |
|---|---|---|
| १३०१ | ।।ज्ञा.गा.नि.३०५.१।। | समता धरा आधीं टाका द्वैतबुद्धी। आपेआप शुद्धि गोविंदीं रया |
| १३०२ | ।।ज्ञा.गा.नि.३०५.२।। | शम नांदे हरि विषम अघोरीं। निवृत्ति चराचरीं सांगतुसे |
| १३०३ | ।।ज्ञा.गा.नि.३०५.३।। | शमशेजबाज शम केशिराज। शमेतुष्टे भोज आत्मराज |
| १३०४ | ।।ज्ञा.गा.नि.३०५.४।। | निवृत्तीचें धन अखंड परिपूर्ण। आपणचि नारायण तुष्टे सदा |
| १३०५ | ।।ज्ञा.गा.नि.३०६.१।। | देहीं देव आहे हें बोलती वेद। परि वासनेचें भेद न दवडिती |
| १३०६ | ।।ज्ञा.गा.नि.३०६.२।। | वासना पैं चोख तेथेंचि वैकुंठ। भावोचि प्रगट होये जनां |
| १३०७ | ।।ज्ञा.गा.नि.३०६.३।। | न लगती सायास करणें उपवास। नाममात्रें पाश तुटे जनां |
| १३०८ | ।।ज्ञा.गा.नि.३०६.४।। | निवृत्ति पहातु देहामाजि प्रांतु। देवोची दिसतु सर्वांघटीं |
| १३०९ | ।।ज्ञा.गा.नि.३०७.१।। | सर्व हरि दिसे जनींवनीं वसे। भवदृश्य भासे भक्तजनां |
| १३१० | ।।ज्ञा.गा.नि.३०७.२।। | ऐसें कांहीं करा सहज तें आचरा। जन्मभरोवरा पडों नका |
| १३११ | ।।ज्ञा.गा.नि.३०७.३।। | भावना श्रीधर भाविक हरिहर। भजनीं श्रीवर सर्व तुष्टे |
| १३१२ | ।।ज्ञा.गा.नि.३०७.४।। | निवृत्ति निधान आत्मा हाचि जीवन। भवयुक्त धन भावें पावे |
| १३१३ | ।।ज्ञा.गा.नि.३०८.१।। | परासी परते परनिंदा नको। सर्व विष्णु एको हेंचि ब्रह्म |
| १३१४ | ।।ज्ञा.गा.नि.३०८.२।। | यातें पैं निंदितां न पवसी अच्युता। हरिहरि म्हणतां उद्धरसी |
| १३१५ | ।।ज्ञा.गा.नि.३०८.३।। | जन ब्रह्म हरि यातें झणें निंदितां। ब्रह्मसायोज्यता न पविजे |
| १३१६ | ।।ज्ञा.गा.नि.३०८.४।। | निवृत्ति तत्पर सर्व लेखी आप। वासना संकल्प रामकृष्ण |
| १३१७ | ।।ज्ञा.गा.नि.३०९.१।। | दुजियाची निंदा दुजेपण सदा। द्वैत तें गोविंदा नावडे रया |
| १३१८ | ।।ज्ञा.गा.नि.३०९.२।। | दुजेपणा भिन्न सर्व जनार्दन। ब्रह्म सनातन पावसी रया |
| १३१९ | ।।ज्ञा.गा.नि.३०९.३।। | वाया द्वैतभाव दुजिया छळणें। ब्रह्म हें येसणें ठाव नेदी |
| १३२० | ।।ज्ञा.गा.नि.३०९.४।। | निवृत्ति म्हणे तो नर येथें गुंफला। द्वैताचा गोविला योनिमाळे |
| १३२१ | ।।ज्ञा.गा.नि.३१०.१।। | अपशब्द कानीं पडतांचि द्वैत। नाम हें अच्युत नये रया |
| १३२२ | ।।ज्ञा.गा.नि.३१०.२।। | परनिंदा पीडा करितांचि मूढा। पडिलासि वेढा योनिमाळें |
| १३२३ | ।।ज्ञा.गा.नि.३१०.३।। | आपस्तुति नको आपपर एको। विष्णुपणें लोपो भान तुझें |
| १३२४ | ।।ज्ञा.गा.नि.३१०.४।। | निवृत्ति सत्वर द्वैत हें निरसी। अद्वैत समरसीं दिधला असे |
| १३२५ | ।।ज्ञा.गा.नि.३११.१।। | आपपर शून्य आपीं करी लीन। आपपर जाण हरी असे |
| १३२६ | ।।ज्ञा.गा.नि.३११.२।। | करितां उपाधि द्वैत तें उपजे। तया अधोक्षजें नुद्धरिजे |

| | | |
|---|---|---|
| १३२७ | ।।ज्ञा.गा.नि.३११.३।। | दुजिया सौजन्य दुजेपण सांडी। अद्वैत पैं मांडी सुखगोष्टी |
| १३२८ | ।।ज्ञा.गा.नि.३११.४।। | निवृत्ति साकार परासि अद्वैत। परे परमामृत गोपवेषें |
| १३२९ | ।।ज्ञा.गा.नि.३१२.१।। | वासनेचें द्वैत सांडुनि परतें। अद्वैता अरुतें भोगी हरी |
| १३३० | ।।ज्ञा.गा.नि.३१२.२।। | दुजियाची सृष्टि नाहीं नाहीं भिन्न। सर्व नारायण बिंबलासे |
| १३३१ | ।।ज्ञा.गा.नि.३१२.३।। | आत्मरूपें जन मानी कारे मूढा। होसी माजिवडा ब्रह्मामाजि |
| १३३२ | ।।ज्ञा.गा.नि.३१२.४।। | निवृत्ति म्हणे द्वैत सांडी सांडी कथा। अद्वैत अच्युता नित्य सेवी |
| १३३३ | ।।ज्ञा.गा.नि.३१३.१।। | पितृ मातृ निंदिता द्वैत हेंचि खोटें। अर्चन गोमटें एको विष्णु |
| १३३४ | ।।ज्ञा.गा.नि.३१३.२।। | निंदिता पितरांसि न पवे हृषीकेशी। योनीचे माळेसि गुंफसील |
| १३३५ | ।।ज्ञा.गा.नि.३१३.३।। | वित्त शाठ्य करी प्रपंचाचरण। पितृ जनार्दन न पावसी |
| १३३६ | ।।ज्ञा.गा.नि.३१३.४।। | निवृत्ति म्हणे नरु द्वैताचा पामरु। अद्वैतीं सुरवरु नाहीं रया |
| १३३७ | ।।ज्ञा.गा.नि.३१४.१।। | कल्पना मासोळी भवजाळ जळीं। पाशाचिये जाळीं गुंतताहे |
| १३३८ | ।।ज्ञा.गा.नि.३१४.२।। | मायाजाळ गोंवी भवसिंधु दावी। मन हें माधवीं गोंवी जनां |
| १३३९ | ।।ज्ञा.गा.नि.३१४.३।। | विषयाचें पोखणें पाहातां तेथ शून्य। झणीं हें तूं मन जाऊं देसी |
| १३४० | ।।ज्ञा.गा.नि.३१४.४।। | निवृत्ति साधन मन हें आवर। गुरुचरणीं स्थिर बिढार धरी |
| १३४१ | ।।ज्ञा.गा.नि.३१५.१।। | भवार्णव हेतु काय सांगो मातु। कल्पना हे तंतु छेदीयेला |
| १३४२ | ।।ज्ञा.गा.नि.३१५.२।। | नाहीं आम्हां ठावो नाहीं आम्हां गांवो। वासना संदेहो बुडलासे |
| १३४३ | ।।ज्ञा.गा.नि.३१५.३।। | मनाचें सुमन हरिचरण स्थान। जन जनार्दन यया हेतु |
| १३४४ | ।।ज्ञा.गा.नि.३१५.४।। | निवृत्ति निरोपण ब्रह्म हें साधन। गुरुकृपा खूण हिता आली |
| १३४५ | ।।ज्ञा.गा.नि.३१६.१।। | आगम निगम सर्व सर्वोत्तम। दिननिशी राम सेवीतसे |
| १३४६ | ।।ज्ञा.गा.नि.३१६.२।। | आत्मा गोड हरि आम्हां चाड धरी। अरिते संहारी आम्हांमाजी |
| १३४७ | ।।ज्ञा.गा.नि.३१६.३।। | नेघो हरिविण दुजें तेथें भिन्न। सांगितली खूण गुरुराजें |
| १३४८ | ।।ज्ञा.गा.नि.३१६.४।। | निवृत्ति गयनि प्रसाद उन्मनी। निरंतर ध्यानीं रामनाम |
| १३४९ | ।।ज्ञा.गा.नि.३१७.१।। | कल्पना काजळी कल्पिलें कवळी। कैसेनि जवळी देवो होय |
| १३५० | ।।ज्ञा.गा.नि.३१७.२।। | टाकीं हे कल्पना दुरित वासना। अद्वैत नारायणा भजकारे |
| १३५१ | ।।ज्ञा.गा.नि.३१७.३।। | मोहाच्या जीवनीं नको करूं पर्वणी। चिंती कां आसनीं नारायण |
| १३५२ | ।।ज्ञा.गा.नि.३१७.४।। | निवृत्ति अरुवारु कृष्णनाम पैं सारु। कल्पना साचारु हरी जाला |

| | | |
|---|---|---|
| १३५३ | ।।ज्ञा.गा.नि.३१८.१।। | भाग्येविण नसे जनां भाव वसे। तेथें सर्व दिसे हरि माये |
| १३५४ | ।।ज्ञा.गा.नि.३१८.२।। | फळलें अमूप कृष्णनाम तप। उच्चारितो खेप हरे जना |
| १३५५ | ।।ज्ञा.गा.नि.३१८.३।। | नंद ते यशोदा देवकी मुकुंदा। वसुदेव सदा भाग्यनिधी |
| १३५६ | ।।ज्ञा.गा.नि.३१८.४।। | निवृत्ति संपूर्ण गुरुमुखें खुण। भाग्येंविण जाण नये मुखा |
| १३५७ | ।।ज्ञा.गा.नि.३१९.१।। | नि:संदेह हरि भावयुक्त करी। भजन निर्धारी सत्वशीळ |
| १३५८ | ।।ज्ञा.गा.नि.३१९.२।। | रज तम खंडी वासना हे मुंडी। चित्त हें अखंडी हरिपंथी |
| १३५९ | ।।ज्ञा.गा.नि.३१९.३।। | साधन हरिपंथु हाचि निज हेतु। गुरु मुखें मातु ऐशी असे |
| १३६० | ।।ज्ञा.गा.नि.३१९.४।। | निवृत्तीचें धन हरि आत्मा जाण। हरि हाचि पूर्ण जनकु रया |
| १३६१ | ।।ज्ञा.गा.नि.३२०.१।। | सुखदु:ख कांहीं भजनप्रवाहीं। मायामोह पाही हरि रया |
| १३६२ | ।।ज्ञा.गा.नि.३२०.२।। | हरिरूपीं सुख हरिरूपीं दु:ख । हरिरूप शोक आत्मा माझा |
| १३६३ | ।।ज्ञा.गा.नि.३२०.४।। | साकार निराकार सर्व हा आचार। हरिरूप सार भजनभाव |
| १३६४ | ।।ज्ञा.गा.नि.३२०.५।। | निवृत्तीचें ज्ञान हरिरूप ध्यान। मनाचें उन्मन हरिरूपीं |
| १३६५ | ।।ज्ञा.गा.नि.३२१.१।। | पितृपिता हरि पूर्वज पुरातनु। नाम नारायणु पांडुरंग |
| १३६६ | ।।ज्ञा.गा.नि.३२१.२।। | तो ध्यायिजे जनां अद्वैत वासना। द्वैताची भावना दुरी करी |
| १३६७ | ।।ज्ञा.गा.नि.३२१.३।। | वेदार्थाचा अर्थ पहातां समर्थ। तोचि हा भरींत कृष्णराजु |
| १३६८ | ।।ज्ञा.गा.नि.३२१.४।। | निवृत्तीचा जपु गयनी समीप। सर्व कृष्णरूप गुरु माझा |
| १३६९ | ।।ज्ञा.गा.नि.३२२.१।। | द्वेषितां अच्युता द्वेषता पूर्णता। न पवे अनंता भाव त्याचा |
| १३७० | ।।ज्ञा.गा.नि.३२२.२।। | भावेंशील काज भावें अधोक्षज। भावें सकळ काज सफळ होय |
| १३७१ | ।।ज्ञा.गा.नि.३२२.३।। | भाविक भजन भाविक पूजन। तेथें जनार्दन तुष्टतसे |
| १३७२ | ।।ज्ञा.गा.नि.३२२.४।। | निवृत्ति करुणा भाव नारायणा। सर्व जनार्दना अर्पियेलें |
| १३७३ | ।।ज्ञा.गा.नि.३२३.१।। | पितृगोत माता भजन स्वभावता। जन्मोनि अनंता प्रिय होसी |
| १३७४ | ।।ज्ञा.गा.नि.३२३.२।। | तोचि भजनपंथ सुगम समर्थ। नित्यता अनंत तृप्त असे |
| १३७५ | ।।ज्ञा.गा.नि.३२३.३।। | पितृमाता विष्णु एक भाव प्रश्नु। दिननिशीं कृष्णु न विसंबे रया |
| १३७६ | ।।ज्ञा.गा.नि.३२३.४।। | निवृत्ति सादर कृष्ण परात्पर। माता पिता सार आम्हां होये |
| १३७७ | ।।ज्ञा.गा.नि.३२४.१।। | कैवल्य देहीं आत्मा असोनि हिंडसी। गर्भवासा येशी नाना जन्मीं |
| १३७८ | ।।ज्ञा.गा.नि.३२४.२।। | मन करीं एकट आत्मा करीं सुभट। आपेंआप वैकुंठ एकातत्त्वें |

| | | |
|---|---|---|
| १३७९ | ।।ज्ञा.गा.नि.३२४.३।। | या रूपें चिंतितां आत्मरूपें पाहतां। तत्त्वींतत्त्व समता मिळोनि जाये |
| १३८० | ।।ज्ञा.गा.नि.३२४.४।। | निवृत्ति सधर एकतत्त्वीं विचार। मन मार्ग साचार हारपला |
| १३८१ | ।।ज्ञा.गा.नि.३२५.१।। | क्षेमाचा विस्तार क्षेत्रज्ञ वृत्ति। अवघीं हे क्षिती एकरूपें |
| १३८२ | ।।ज्ञा.गा.नि.३२५.२।। | शांति दया पैसे क्षमा जया रूप। अवघेंचि स्वरूप आत्माराम |
| १३८३ | ।।ज्ञा.गा.नि.३२५.३।। | निंदा द्वेष चेष्टा या अभिमान भाजा। सांडुनियां भजा केशवासी |
| १३८४ | ।।ज्ञा.गा.नि.३२५.४।। | निवृत्ति तिष्ठतु एकरूप चित्त। अवघींच समस्त गिळियेलीं |
| १३८५ | ।।ज्ञा.गा.नि.३२६.१।। | तिमिर पडलें प्रपंच भासे। झाकोळला दिसे आत्मनाथ |
| १३८६ | ।।ज्ञा.गा.नि.३२६.२।। | हरिवीण दुजें चिंतितां निभ्रांत। अवघेंचि दिसत मायाभ्रम |
| १३८७ | ।।ज्ञा.गा.नि.३२६.३।। | सांडूनि तिमिर सर्व नारायण। हेंचि पारायण नित्य करीं |
| १३८८ | ।।ज्ञा.गा.नि.३२६.४।। | निवृत्ति सज्जन अवघा आत्माराज। एकतत्वबीज जपा लाहो |
| १३८९ | ।।ज्ञा.गा.नि.३२७.१।। | दिसे वरिवरि नाम अवघें वैकुंठधाम। जपतो शिव वर्म रामनाम |
| १३९० | ।।ज्ञा.गा.नि.३२७.२।। | तें रूप समरस गोकुळीं हृषीकेश। नंदाघरीं गोपवेषें हरि खेळे |
| १३९१ | ।।ज्ञा.गा.नि.३२७.३।। | समाधिधनधाम वैकुंठ हरिसम। योगियां पूर्ण काम हृदयीं सदा |
| १३९२ | ।।ज्ञा.गा.नि.३२७.४।। | निवृत्तीनें कथिलें गुरुगयनी प्रसादें । सकळ हा गोविंद आत्माराम |
| १३९३ | ।।ज्ञा.गा.नि.३२८.१।। | भक्तिज्ञान वैराग्य तिहीचें शोधन। जनीं जनार्दन हेंचि खरें |
| १३९४ | ।।ज्ञा.गा.नि.३२८.२।। | भक्तीविण देव न पवे सावेव। रोहिणीची माव तैसा दिसे |
| १३९५ | ।।ज्ञा.गा.नि.३२८.३।। | वैराग्यें तापलें ब्रह्मांड देखिलें। वासनें मुंडिलें निःसंदेहें |
| १३९६ | ।।ज्ञा.गा.नि.३२८.४।। | निवृत्ति ज्ञानार्क विज्ञान सम्यक। भावशीळ देख जनीं इये |
| १३९७ | ।।ज्ञा.गा.नि.३२९.१।। | लटिका संसार वाढविसी व्यर्थ। विषयाचा स्वार्थ झणें करीं |
| १३९८ | ।।ज्ञा.गा.नि.३२९.२।। | नको शिणों दुःखे कां भरसि शोकें। एकतत्त्वें एके मना लावीं |
| १३९९ | ।।ज्ञा.गा.नि.३२९.३।। | लावीं उन्मनी टाळी टाळिसी नेईं बाळी। अखंड वनमाळी हृदयघटीं |
| १४०० | ।।ज्ञा.गा.नि.३२९.४।। | निवृत्ति चपळ राहिला अचळ। नाहीं काळ वेळ भजतां हरी |
| १४०१ | ।।ज्ञा.गा.नि.३३०.१।। | गगनीं अभ्र चाले चंद्र असे निश्चळ। पृथ्वीतळीं बाळ चाले म्हणे |
| १४०२ | ।।ज्ञा.गा.नि.३३०.२।। | भ्रमाचें भुलीव आलेंसे पडळ। प्रत्यक्ष केवळ डोळियांसी |
| १४०३ | ।।ज्ञा.गा.नि.३३०.३।। | असे तें न दिसे नसे तें अभासे। विषयांच्या विषें घारलेंसे |
| १४०४ | ।।ज्ञा.गा.नि.३३०.४।। | निवृत्ति कवळ भ्रमाचा सांडिला। अखंड ध्यायिला हृषीकेश |

